## [illegible] आवृत्तीची प्रस्तावना.

या व्याकरणाची पहिली आवृत्ति शके १७५८ नांत ह्मणजे इंग्रजी सन १८३६ सांत छापून प्रसिद्ध झाली, ती [illegible] कृष्ण, यांच्या छापखान्यांत शिळाछापा वर छापिली होती. नंतर सुमारें आठ नऊ वर्षांत ती संपून तिच्या दुसऱ्या आवृत्तीचें अगत्य पडल्या वर बोर्ड आव् एज्युकेशन या नामानें जी एतद्देशीय लोकांत विद्याप्रसरण करण्याचें काम पाहण्या करतां त्या काळीं सरकारानें सभा स्थापित केली होती, तिणें त्या काळचे मोठे प्रसिद्ध विद्वान् गृहस्थ परलोकवासी बाळ गंगाधर शास्त्री यांच्या शिफारशीनें ती दुसरी आवृत्ति तयार करण्याचें काम मी सुरतेंत असतां मला फर्माविलें. त्या वरून मीं मोठ्या संतोषानें फार श्रम घेऊन इतर आपलीं सरकारी कामें संभाळून जो थोडा वेळ सांपडे त्यांत सुरतेंत व पुढें मुंबईस आल्या वर एथें सिद्ध केली, [illegible] ग्रंथाची निराळीच नवीच रचना करावी लागली; कारण, ती पहिली आवृत्ति मीं फारच अल्पवयांत असतां रचिली होती; ह्मणोन ती मला त्या काळीं निर्वाहास केवळ अपुरीशी वाटली. [illegible] सन १८४६ सांत बाळ गंगाधर शास्त्री परलोकवासी झाले. आणि त्यांच्या जागे वर सरकारानें माझी योजना केली, तेव्हां मीं मुंबईस आल्या नंतर सन १८५० सांत ती दुसरी आवृत्ति छापून प्रसिद्ध केली. हा जुना इतिहास अलिकडच्या लोकांस माहीत नसल्या मुळें त्यां मध्यें परोत्कर्षासहिष्णु स्वभावाच्या काहीं मंडळीनें अलिकडेस आमच्या विषयीं अशी कंडाळी उठविल्याचें आह्मीं ऐकलें कीं मयत बाळशास्त्री याचेंच कागदपत्र आमच्या हातीं लागल्या वर त्या वरून हें आह्मीं व्याकरण रचिलें, आणि आपल्या नावानें प्रसिद्ध केलें. वस्तुतः या विषया वर लिहिलेला त्या गृहस्थाच्या किंवा कोणाच्याही हातचा एक कागदाचा चिठोराही

आम्हीं पाहिलें नाहीं. त्यांत आमच्या लोकांचे कान तर अशा, एकादे परनिंदापर गप्प ऐकण्यास आ करूनच असतात, त्यांत हें विरजण पडतांच तिचे ते गटागट घोट घेऊन मनांत जिरवूं लागले आहेत. तेव्हां अशा लोकांच्या शिफारशींत सांपडलें असतां जर आम्हीं आत्मसंरक्षण न केलें तर हा आमचा दुर्लक्षतेचा दोष पुढें आम्हांसच उलटा मोठा बाधक होईल. म्हणोन अशा लोकां मुखें स्तब्ध करून आत्मसंरक्षण करणें हा स्वधर्म जाणून परम संकटानें हें पुढील परलोकवासी बाळशास्त्री यांचाच आम्हां विषयीं साधारण, त्यांत विशेषेंकरून आमच्या या ग्रंथाच्या प्रथमावृत्ती विषयींचा कसा स्वाभिप्राय होता तो त्यांनीच आपल्या स्वहस्त लिखित आम्हास दिलेल्या मानपत्रांत कळविला आहे; तो एथें प्रकट करण्याचें आतां अगत्य दिसल्यावरून प्रकट करितों;—

'I have known Dadoba Pandurang for many years. In the knowledge of the English language, general literature, and science, I consider him equal to the best educated natives of Bombay, while no one among them that I know of, is so well acquainted with the grammatical structure of the Marathi language. He is the author of a grammar of that language, which is deservedly esteemed as the best work on the subject. His writing is correct and idiomatic, and is such as has not been equalled by any translator of English works, perhaps with one or two exceptions.' * * * *

30th April 1840. (Signed) BAL. G SHASTRI

आतां बहुतेक लोक इंग्लिश भाषा समजतात; म्हणोन यावरील लेखाचें भाषांतर करण्याचें एथें मला तादृश अगत्य दिसत नाहीं.

हे सरळमनाचे विद्वान गृहस्थ जर आजकाळ पर्यंत जिवंत असते तर ती सन १८५० सांतली प्रसिद्ध झालेली दुसरी आवृत्ति, आणि प्रस्तुतची आवृत्ति पाहून तेणेंकरून त्या काळ-

---

*This was the 1st lithographed edition of the grammar herein referred to, which contained 192 pages only.

च्या आपल्या अभिप्रायास आतां किती बळकटी आली आहे या विचारानें त्यास फारच संतोष झाला असता यांत आम्हांस तिलमात्र संशय वाटत नाहीं. अस्तु, या गोष्टीस नुकतीं तीस किंवा पसतीस वर्षे मात्र झालीं असावीं, इतक्यांत असें म्हणणें भागास आलें आहे कीं, तो आतां परीक्षेचा काळही गेला, आणि ते सुरस भाषेचे व सरळ मनाचे परीक्षक व गुणग्राही पुरुषही गेले.

मागें ज्या पांच आवृत्त्या झाल्या, त्यांत जी विस्तीर्ण रूपानें प्रस्तावना प्रकट केली होती, तिची पुनरावृत्ति करणें हालीं सोईवार नसल्या मुळें तसें या आवृत्तींत केलें नाहीं. तथापि तिची अनुवृत्ति एथें समजली पाहिजे. दहा हजार विद्यार्थ्यां मध्यें कोणा एकास कदाचित् ती वाचण्याची इच्छा झालीच तर त्याणें मागल्या आवृत्तींत वाचावी.

या खेपेस मागली सहावी आवृत्ति फार बारकाईनें शब्दशः तपासून, ठिकठिकाणीं शोध घालून, नवे नवे अगत्याचे नियम, व अर्थांचीं प्रकाशनें, व एक दोन नवीं प्रकरणें प्रविष्ट करून, पन्नास पृष्ठांनीं हा ग्रंथ अधिक वाढविला आहे. मागली आणि ही आवृत्ति ताडून पाहिली असतां वाचकांच्या हें सहज लक्षांत येईल.

अलिकडेस मागल्या पंचवीस वर्षां पासून सर्व लोकांचा भर इंग्लिश भाषा शिकण्यांत फार वाढत चालल्या मुळें स्वभाषे विषयीं त्याच मानानें मोठी अनास्था वाढत चालली आहे; ही उघड अत्यंत शोचनीय गोष्ट माझ्या दृष्टी पुढें असतां, हा असा स्वभाषा सुधारण्या विषयीं व्यर्थ परिश्रम करणें हा माझा शुद्ध वेडेपणा आहे असें जरीं मला हस्तामलका सारखें ढळढळीत दिसत आहे, तरीं जीस मीं जननी प्रमाणें मानितों, त्या आपल्या स्वभाषेची शेवटपर्यंत सेवा केल्या वांचून माझ्यानें राहवत नाहीं.

मुकाम मुंबई, श्रावण शु ॥ ५,
शके १८०१, प्रमाथिनामसंवत्सरे.
ता० २४ वी जुलै, इसवी सन १८७९.

दा० पां०

# अनुक्रमणिका.

# महाराष्ट्र भाषेचें व्याकरण.

## खंड १.

### व्याकरणशास्त्राची व्याख्या आणि त्याचा उपयोग यां विषयीं.

१. व्याकरण ह्मणून एक शास्त्र आहे, जेणेंकरून भाषेचें तत्त्वज्ञान होतें, ह्मणजे तिचे आंतील नियम कळतात, तेणेंकरून शुद्ध कोणतें आणि अशुद्ध कोणतें, हें यथायोग्य समजतें.

या वरून जर कोणी पुसेल कीं, ' काय व्याकरण जाणल्या वांचून शुद्ध बोलतां येत नाहीं?' तर याचें उत्तर असें आहे कीं, आपली भाषा शुद्ध बोलण्यास जरीं व्याकरणशास्त्राचें विशेष अगत्य लागत नाहीं, तरीं जो त्याज विषयीं अज्ञान असतो, तो यद्यपि बहुवक्ता असला, आणि जरीं स्वतां अशुद्ध बोलत नसला, तथापि इतरांचें भाषण शुद्ध आहे किंवा अशुद्ध आहे, हें त्यास नीट दाखवितां येत नाहीं; त्या वेळेस तो गोंधळांत पडतो. तुह्मींच पहा कीं ज्या कोणास व्याकरणाचें ज्ञान नाहीं, त्यास जर कोणी त्याच्या भाषेंत एकादें अशुद्ध वाक्य ह्मणून दाखविलें आणि विचारिलें कीं, हें वाक्य शुद्ध आहे किंवा अशुद्ध आहे, तर तो अशुद्ध म्हणून सांगेल; परंतु ' कां अशुद्ध!' असा जर त्यास कोणी पुनः प्रश्न केला तर त्याच्यानें त्या पुसणाराचें समाधान करवणार नाहीं. घटकाभर पहा, ज्याची स्वभाषा मराठी आहे, परंतु ज्यास व्याकरण म्हणून काय वस्तु आहे हें अगदीं ठाऊक नाहीं, अशा एका मनुष्यास पुसलें, कीं ' तीं. मुलें

थें खेळतो,' हें वाक्य शुद्ध किंवा अशुद्ध? तर तो ह्मणेल की, अशुद्ध, परंतु कां अशुद्ध असें विचारलें असतां त्याच्यानें यथायोग्य उत्तर देववणार नाहीं; कदाचित् ह्मटलें तर तो असें ह्मणेल कीं, 'कां ह्मणजे तें कानासच वाईट लागतें, असें कोणी बोलत नाहीं;' परंतु अशा उत्तरानें विद्वान् लोकांचें समाधान व्हावयाचें नाहीं. अहो, व्याकरण ह्मणजे शास्त्र होय, आणि भाषा बोलणें ही केवळ व्यावहारिक आणि स्वाभाविक गोष्ट होय, म्हणोन या उभय गोष्टीं मध्यें फार अंतर आहे. शास्त्र हें व्यवहाराचें नियामक होय. या शिवाय स्वभाषेंत व्याकरणाचा एक मोठा उपयोग असा आहे कीं, त्याच्या योगानें सर्वांची भाषा, व लिहिण्याची पद्धति, एक पडून एतद्विषयक बहुतेक संशय दूर होतात. तसेंच, एकाद्या कठिण वाक्याचा अर्थ कोणा एकाच्या ध्यानांत यथास्थित आला किंवा नाहीं, हें जाणावयाचें असल्यास त्याज कडून त्या वाक्याचा व्याकरणरूपानें पदच्छेद करवावा, म्हणजे जर त्यास यथास्थित अर्थ समजला असला, तर तो अर्थास अनुकूल असा पदच्छेद करील, नाहींतर चुकेल; सारांश, व्याकरण हें अर्थाचेंहि मोठेंच सूचक होय. आणखी स्वभाषे शिवाय इतर भाषा शुद्ध रीतीनें व त्वरित शिकायास या व्याकरणशास्त्राचा तर फारच आवश्यक उपयोग आहे.

२. व्याकरणाचे मुख्य भाग तीन आहेत; **वर्णविचार, शद्बविचार,** आणि **वाक्यरचना.**

---

# खंड १.

## वर्णविचार.

३. वर्णविचांत वर्णसंबंधी विचार सांगितला आहे, ह्मणजे वर्णांचें लक्षण, त्यांचा संयोग, त्यांचीं स्थानें, आणि त्यांचे संधि, यांचें विवेचन या भागांत केलें आहे.

४. वर्ण म्हणजे अपासून ज्ञ पर्यंत जीं मूळाक्षरें तीं प्रत्येक.

५. वर्णां मध्यें दोन भेद आहेत—स्वर आणि व्यंजनें.

६. स्वर म्हणजे ज्यांच्या आश्रया वांचून अक्षर सिद्ध होत नाहीं, व ज्यांचा उच्चार व्यंजना वांचून करतां येतो, असे जे वर्ण ते. हे स्वर सोळा आहेत.

स्वर.

अ*, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए ऐ, ओ, औ, अं, अः.

यांत ऋ ॠ ऌ ॡ हे स्वर केवळ संस्कृत भाषेंतच येतात.

अं, अः, यांस स्वरांत लेखणें कित्येक पंडितांस प्रशस्त दिसत नाहीं, कारण ते असें म्हणतात कीं, अं, अः यांस जर निराळे स्वर मानावें तर मग इं, इः, उं, उः, इ० यांस निराळे स्वर कां मानूं नये? हा त्याचा पूर्वपक्ष खरा आहे. परंतु एथें यांस स्वरांत गणलें आहे, या वरून त्यांहीं इतकेंच समजावें कीं, अनुस्वार आणि विसर्ग म्हणून बे स्वरांच्या उच्चारणांत भेद आहेत, त्यांचे सूचक हे वर्ण होत.

७. कोणताहि वर्ण उच्चारायास जो काळ लागतो त्यास मात्रा असें म्हणतात.

८. या मात्राभेदा वरून मराठींत स्वरांचे दोन भेद आहेत—ऱ्हस्व आणि दीर्घ.

९. ऱ्हस्व स्वर उच्चारायास एक मात्रा लागत्ये, आणि दीर्घ स्वर उच्चारायास दोन मात्रा लागतात; अर्थात् जितका काळ ऱ्हस्व स्वर उच्चारायास लागतो, त्याच्या दुप्पट काळ दीर्घ स्वर उच्चारायास लागतो.

१०. अ, इ, उ, ऋ, ऌ, हे ऱ्हस्व स्वर.

११. आ, ई, ऊ, ॠ, ॡ, ए, ऐ, ओ, औ, हे दीर्घ स्वर.

---

*अ याची आकृति आमचा अ अशीही आढळते.

१२. ऌ या वर्णास दीर्घत्व नाहीं असा संस्कृत व्याकरणांत नियम आहे.

१३. ए, ऐ, ओ, औ, यांस कोणी संयुक्तस्वराहि ह्मणतात.

१४. अ पासून ऌ पर्यंत जे दहा स्वर, त्यांस मुख्य स्वर ह्मणतात.

१५. अं, अः, यांची वास्तविक पाहतां स्वर ह्मणून निराळी गणना नसावी, व मूळ संस्कृतांतही ती नाहीं, परंतु बाळबोध लिपि शिकवणारे पंतोजी मुलांस अनुस्वार आणि विसर्ग यांचें ज्ञान व्हावें ह्मणून यांसही स्वरांत लेखितात. यांत अक्षरां वर जो बिंदु देतात त्यास अनुस्वार, आणि पुढें जे दोन बिंदु देतात त्यांस विसर्ग, असें ह्मणतात.

१६. अनुस्वार ह्मणजे नाकांतून जो उच्चार होतो तो; हा उच्चार जाणावया करितां वर्णाच्या माथ्या वर ँ असा एक बिंदु देतात, आणि ज्या वर्णाच्या माथ्या वर हा अनुस्वार असतो, त्यास अनुनासिक अथवा सानुस्वार ह्मणावें. मराठींत अनुनासिक वर्णाचा उच्चार करायाचा असतां कोठें तो वर्ण केवळ नाकांतून मात्र उच्चारावा लागतो; जसें—कां, आंत, कांटा, तीं, इत्यादि. आणि कित्येक ठिकाणीं संस्कृता प्रमाणें या अनुस्वारा पुढें जो वर्ण असेल त्याशीं सवर्ण असे जे—ङ, ञ, ण, न, म, यांचा उच्चार करायाचा असतांहि अनुस्वाराची योजना करितात; जसें—

रंक, अंग, यांचा उच्चार रङ्क, अङ्ग, असा होय.
यांचा, भंजन, यांचा उच्चार याञ्चा, भञ्जन, असा होय.
पंडु, तंटा, धिंड, यांचा उच्चार पण्डु, तण्टा, धिण्ड,—होय.
संतान, पंतोजी, मंथन, धंदा, संधि यांचा उ० सन्तान, पन्तोजी, मन्थन, धन्दा, सन्धि होय.

आंबा, रंभा, अंमा, यांचा उच्चार आम्बा, रम्भा, अम्मा, असा होय.

(अ) आतां मराठी भाषेंत बहुधा असा नियम आहे कीं, कित्येक मराठी शब्दांत आद्य अक्षरा वर आणि बहुधा सर्वत्र अंत्य अक्षरा वर अनुस्वार असतां, आणि अनुनासिक जे आ, ओ, यां पुढें च, ज, झ, हे वर्ण असतां, त्याचें उच्चारण केवळ नाकांतून करावें लागतें; व हा भेद जाणवायाचा असतां क्वचित् त्या अनुस्वारा खालीं अशी अर्धचंद्राकार कुंडली करितात; जसें—काँ, कीँ, तूँ, आँत, तेँ, काँच, साँज, खोँच, ओँजळ, कोँझट इ०.

(इ) परंतु मराठींत वर सांगितला नियम आहे, ह्मणोन शब्दांच्या शेवटीं ँ हें असें चिन्ह करण्याची कांहीं आवश्यकता राहत नाहीं. तसेंच, सर्व सप्तम्यंत शब्दांचा उपांत्य याच प्रमाणें अनुनासिक जाणावा; जसें—घरांत, भिंतींत, वायूंत इ०.

सानुनासिक वर्णा पुढें च, ज, झ, हे वर्ण आले तर अनुस्वाराचा कोंकण आणि देश यां परत्वें विकल्पें अनुनासिक उच्चार होतो; जसें—चेंच, झांज, इ०.

(उ) परंतु जेथें उच्चारणांत विकल्प असून अर्थभेद होत असेल, तेथें हा भेद अवश्य दाखविला पाहिजे; जसें—**सर्वांत** एथें सर्व शब्दाच्या सप्तमीचें रूप, आणि **सर्व** आणि अंत यांचा संधि होऊन जो **सर्वांत** शब्द होतो त्याचें रूप, हीं सारखीं असतां स्पष्ट रीतीनें लिहिणें झाल्यास पूर्व शब्द **सर्वांत** असा लिहावा, आणि दुसरा शब्द **सर्वान्त** असा लिहावा.

पुढं या ग्रंथात अकारान्त, इकारान्त, इ० प्रत्ययान्त शब्द याच प्रकारें लिहिले आहेत.

(ऋ) आणखी अनुस्वारा पुढें य, र, ल, व, श, ष, स,

ह हे वर्ण असतां, अनुस्वाराच्या उच्चारणांत कांहीं भेद पडतो; तो असा—पूर्ण वर्णा वर अनुस्वार असून, तो वर्ण जर अनुनासिक असला, आणि पुढें जर य आणि ल हे वर्ण असले, तर त्यांस द्वित्व होतें; जसें—सयोग संय्योग, संलग्न संल्लग्न, इ०. आणखी र, व, श, ष, स, ह, हे वर्ण पुढें असले तर प्रथम वर्ण अनुनासिक उच्चार्यमाण असून त्यास किंचित् दंतौष्ठ्य ह्मटलें पाहिजे; जसें—संरक्षक, संवाद, संशय, दष्टा, संसार, कंस, संहार, सिंह, इ०

१७. ज्या अक्षरा पुढें विसर्ग असतो, त्या अक्षराचा अंत्यस्वर उच्चारून तो मुखांत वायू वर किंचित् आदळावा लागतो. जसें—छिः, अः, दुःख, अंतःकरण, इ०.

हा अनुस्वारा विषयींचा आणि विसर्गा विषयींचा विचार विशेषेंकरून संस्कृत व्याकरणाचा होय; त्यांत तो फार सूक्ष्म व विस्तारानें केला आहे. मराठींत इतकेंच सांगणें पुरे कीं, शब्दाच्या अंत्य वर्णा वर अनुस्वार असतां त्या वर्णाचा सर्वत्र सानुनासिक म्हणजे नाकांतून उच्चार होतो. तसाच सप्तमीविभक्त्यंत शब्दांचाही सर्वत्र सानुनासिकच उच्चार होतो. सारांश, मराठींत सानुनासिक उच्चाराचें विशेष प्राबल्य दिसतें. संस्कृता प्रमाणें अनुस्वारा पुढील वर्णाच्या वर्गांतील अनुनासिक वर्णाचें तितकें प्राबल्य तींत दिसत नाहीं.

१८. यांत ऋ, ॠ, ऌ, ॡ, अः, इतके स्वर संस्कृत शब्दां वांचून इतर प्राकृत शब्दांत येत नाहींत, परंतु हे स्वर ज्यांत असतात असे संस्कृत शब्द, मराठी भाषेंत कोठें कोठें बरेच येतात ह्मणोन यांस एथं स्वरांत अवश्य गणिलें पाहिजे.

१९. व्यंजन ह्मणजे स्वरा वांचून ज्याचा उच्चार स्पष्ट होत नाहीं असा जो वर्ण तें. हीं व्यंजनें चोत्तीस आहेत.

## व्यंजनें.

क्, ख्, ग्, घ्, ङ्,
च्, छ्, ज्, झ्, ञ्,
ट्, ठ्, ड्, ढ्, ण्*,
त्, थ्, द्, ध्, न्,
प्, फ्, ब्, भ्*, म्,
य्, र्*, ल्, व्, श्,
ष्, स्, ह्, ळ्.

यांतून प्रत्येक व्यंजनाची अर्ध मात्रा जाणावी.

१०. दुसरें यांत च्, ज्, झ्, या व्यंजनांचा उच्चार मराठी भाषेंत दोन प्रकारचा होतो, एक तर मूळ संस्कृता प्रमाणें शुद्ध तालव्य; जसें—चंद्र, चार, चित्त, चौर्य, जन, जाया, जीर्ण, झल्लरी, झंझा, इ०; आणखी दुसरा दांतांशीं जीभ आणून जो दंततालव्य उच्चार होतो तो; याचीं उदाहरणें—चणें, चार, जासूद, जो, झांज, झुकणें, इ०.या वर्णांचा दंततालव्य उच्चार असतां त्यांच्या वरल्या रेघेच्या डावे कडेस एक बिंदु देण्याचा कोठें परिपाठ आहे.

या वर्णांच्या तालव्य आणि दंततालव्य उच्चारा विषयीं मराठींत बहुधा असा नियम आहे कीं—

( अ ) शुद्ध संस्कृत, अरबी, अथवा फारसी शब्द, अथवा यां वरून साधलेले जे शब्द, त्यांत च, ज, झ, या वर्णांचा उच्चार तालव्य जाणावा.

( आ ) जे शुद्ध मराठी शब्द, अथवा परभाषेंतून येऊन जे केवळ मराठी होऊन गेलेले शब्द, यांतील च, ज, झ, यां वर्णांच्या अंतीं जर अ, आ, उ, ऊ, ऐ, ओ, औ, ह्मणजे, इ, आणि ए, हे स्वर वर्ज करून अव-

*ण, भ, र, यांची आकृति कधीं ण, भ, र, अशीहि आढळते.

शिष्ट राहिलेले स्वर असले, तर बहुधा त्यांचा दंततालव्य उच्चार होतो.

( इ ) यांत ए असतां देश आणि कोंकण यां परत्वें, विकल्पें दंततालव्य उच्चार होतो;–जसें, त्याचें अ० त्याचें, माझें अ० माझें, खाजें अ० खाजें, इ०.

यांत बहुधा आरंभीं असल्या पेक्षां शेवटीं **एकार** असतां दंततालव्य उच्चार विशेष आढळतो.

ही बिंदु देण्याची रीति अलिकडेस निघाली आहे. आणखी यद्यपि महाराष्ट्र लोकांस या चिन्हाची मोठी आवश्यकता आहे असें मला वाटत नाहीं, तथापि सामान्यतः सर्वांसच या वर्णांचें उच्चारण, आणि कोठें अर्थग्रहणही निःसंशय व्हावें, ह्मणोन हें चिन्ह लिहिणें मला कांहींसें आवश्यक वाटतें. परंतु हें जोडिते वेळेस सर्वांहीं अनुस्वारा प्रमाणें याज विषयीं फार सावध असावें; या चिन्हाची आवश्यकता पुढें विभक्तिप्रकरणीं यथास्थित प्रतिपादिली आहे.

ङ, ञ, आणि ष, हीं अक्षरें संस्कृत शब्दांत मात्र येतात.

२१. ड, या वर्णाचा उच्चार मराठींत दोन प्रकारचा आहे; त्याचा नियम असा आहे कीं, हा वर्ण शब्दाच्या आरंभीं असतां याचा उच्चार शुद्ध ड सारखा होतो; परंतु शब्दाच्या मध्यें, अथवा शेवटीं असला तर, शुद्ध ड उच्चारते वेळेस जितकी जीभ टाळ्या वर दाबावी लागत्ये तितकी न दाबतां मध्येंच किंचित् पसरावी लागत्ये; **डाग** आणि **बडबड**, अ० **भडाभडा**, या दोहों शब्दांत डचा उच्चार सारखा नाहीं.

( अ ) शेवटीं द्वित्त ड असला, अथवा उपांत्य वर्ण जर अनुनासिक असला, तर डच्या शुद्ध उच्चारांत कांहीं फेर पडत नाहीं, जसें–**अड्डा, सांड**, इ०.

या उच्चारणा विषयीं, कित्येकांस संशय आहे; ते ह्मणतात, डचे दोन उच्चार कोठेंही नाहींत; मुंबई प्रांतांत कोळी, मुसलमान, पारशी, आदिकरून लोकां मध्यें मात्र असा हा डच्या उच्चारणांत फेर पडतो. परंतु मला वाटतें, हें त्यांचें म्हणणें बराबर नाहीं. कोळी आदिकरून लोक तर केवळ डचा र सारखाच उच्चार करितात, तो तर केवळ भ्रमशस्त; परंतु मराठी शब्दांत शेवटल्या व मधल्या डच्या उच्चारांत आणि आद्य डच्या उच्चारांत किंचित् फेर असतो, यांत संशय नाहीं. **गडबड भडभड्या**, यांत, आणि **डाग, डुकर**, यांत डच्या उच्चारणांत कांहीं फेर आहे, या विषयीं मला तर अगदीं संशय वाटत नाहीं.

२२. क्ष, आणि ज्ञ, हीं अक्षरें बहुधा सर्व व्यजनांत लेखितात, परंतु हें ठीक नाहीं; हीं संयुक्त व्यंजनें होत; तीं कशीं हें पुढें लौकरच समजण्यांत येईल.

यांस वर्णानुक्रमांत धरिलें ह्मणोन चिंता नाहीं, परंतु व्याकरणा मध्यें मात्र त्यांचा या प्रमाणें भेद दाखवला पाहिजे.

२३. आतां व्यंजनांशीं स्वर मिळाल्यानें विशेष काय होतो तो सांगतों; व्यंजनांस जेव्हां अ मिळतो तेव्हां त्याचें ् असें जें अपूर्णपणाचें चिन्ह असतें तें मात्र जातें, आणि त्याचा पूर्ण उच्चार होतो, परंतु आ मिळाला असतां तें जाऊन पुढें ा अशी खूण लिहितात, ईस **काना** ह्मणतात. स्वर, यांच्या खुणा, आणि त्या खुणांच्या संज्ञा, खालीं लिहून दाखविल्या आहेत.

| स्वर. | खुणा. | संज्ञा. |
|---|---|---|
| आ | ा | काना. |
| इ | ि | ऱ्हस्व वेलांटी. |
| ई | ी | दीर्घ वेलांटी. |
| उ | ु | ऱ्हस्व उकारचिन्ह. |
| ऊ. | ू | दीर्घ उकारचिन्ह. |

| स्वर. | खुणा. | संज्ञा. |
|---|---|---|
| ऋ | ृ | ऱ्हस्व ऋकारचिन्ह. |
| ॠ | ॄ | दीर्घ ॠकारचिन्ह. |
| ऌ | ॢ | ऱ्हस्व ऌकारचिन्ह. |
| ॡ | ॣ | दीर्घ ॡकारचिन्ह. |
| ए | े | मात्रा. |
| ऐ | ै | दुमात्रा. |
| ओ | ो | कानामात्रा. |
| औ | ौ | द्विमात्रकाना. |
| अं | ं | अनुस्वार. |
| अः | ः | विसर्ग. |

व्यंजनास स्वर मिळविल्यानें अक्षरें कशीं होतात, व ते मिळाले असतां व्यंजनांस विशेष काय होतो, हें स्वरांच्या अनुक्रमानें खालीं लिहून दाखविलें आहे.

क् या व्यंजनास अ स्वर मिळतो, तेव्हां क असें अक्षर सिद्ध होतें.

क्..................आ..............................का..
क्.................. इ ..............................कि..
क्.................. ई ..............................की..
क्.................. उ ..............................कु. .
क्.................. ऊ ..............................कू..
क्.................. ऋ . ............................कृ. .
क्.................. ॠ ..............................कॄ. .
क्.................. ऌ ..............................कॢ. .
क्.................. ॡ ..............................कॣ. .
क्.................. ए ..............................के..
क्.................. ऐ ..............................कै..

क्...............ओ...........................को ....
क्...............औ..........................कौ ....
क्...............अं ..........................कं ....
क्...............अः..........................कः ....

२४. या प्रमाणें कोणत्याहि व्यंजनास अनुक्रमें स्वर मिळवले ह्मणजे त्या पंक्तीस **बाराखडी** ह्मणतात.

(अ) यांत बहुधा ऋ, ॠ, ऌ, ॡ, हे स्वर व्यंजनांशीं मिळवून पंतोजी सांगत नाहींत.

(आ) उच्या खुणा दोन सांगितल्या, त्यांत ा ही शेवटली खूण, ज्या वर्णास स्वाभाविक काना असतो त्यांतून कितीएकांस मात्र विकल्पें लिहितात जसें—स॥ श॥, ध॥. र यास निरंतर उची ही शेवटलीच खूण लिहितात; जसें—रु; व दीर्घ रू या प्रमाणें काढितात.

## भाग १.

### जोडाक्षरविचार.

२५. **जोडाक्षर** ह्मणजे जोडलेलें अक्षर, हा अर्थ तर उघडाच आहे, परंतु अर्थविस्तार केला असतां असा होतो कीं, दोन किंवा अधिक व्यंजनांस पुढें एकादें अक्षर जोडल्यानें, अथवा दोन किंवा दोहों पेक्षां अधिक व्यंजनें एकत्र जोडून मग त्यांस स्वराचा योग केल्यानें, जोडाक्षरें घडतात; जसें—क्क् यास अ मिळवल्यानें क्क, आ मिळवल्यानें क्का, इ मिळविल्यानें क्कि, इ०.

२६. हीं जोडाक्षरें काढायाची रीति अशी आहे कीं, जें जोडाक्षर लिहावयाचें असेल त्याचा पहिला वर्ण अर्धा काढून पुढें दुसरें अक्षर लिहावें. ग्ला म जोडायाचा आहे असें मनांत आणा; आतां पहा—पहिला ग् हा ग्अ: सा अर्धा काढून नंतर त्यास म जोडला ह्मणजे या प्रमा-

णें ग्म असें जोडाक्षर सिद्ध होतें; याच प्रमाणें क्ण, ग्ण, ग्म्य, क्त्य, त्स्र्यू, इत्यादि दोन, तीन, चार वर्णांचीं जोडाक्षरें जाणावीं. ज्या वर्णास स्वाभाविक काना असतो, त्याचा तो काढून टाकला ह्मणजे त्या वर्णाचा आकार अर्धा होतो.

२७. कोणत्याही व्यंजनास र जोडणें तर त्यास ् हें चिन्ह जोडितात; परंतु ज्या व्यंजनास स्वाभाविक काना असतो त्यास र जोडणें तर त्याच्या कान्यास डावे कडे ⁄ ही अशी रेघ ओढितात;—जसें—क्र, प्र, म्र, स्र, इ०. परंतु ज्यास तो स्वाभाविक काना नसतो, त्यास खालीं ् असें चिन्ह लिहिल्यानें र जोडिला जातो; जसें—छ्र, ट्र, ठ्र, ड्र, द्र, इ०. तात्पर्य हेंच कीं, र या वर्णाची दुसऱ्या प्रकारची आकृति ॢ अशी आहे, तिचा हा अंश जोडितात.

२८. ज्यास स्वाभाविक काना नसतो, त्यास जर कोणतेंही अक्षर जोडणें तर, जें जोडायाचें तें अक्षर त्याच्या खालीं लिहावें, ही उत्तम रीति; परंतु कधीं त्याच्या शेजारींही लिहितात. परंतु अक्षरां वरील जी स्वाभाविक रेघ ती त्यांस एकच असली पाहिजे; जसें—ट्म टम, ट्क टक, ड्न डन, क्ल क्ल, इ०.

२९. जोडाक्षरांत र अंमळ विलक्षण आहे; पहा, त्यास कोणतेंही अक्षर किंवा अक्षरें जोडणें तर, त्याच अक्षरांवर ᳚ अशी खूण करावी लागत्ये; या चिन्हास रेफ असी संज्ञा आहे; उदाहरण—र्क, र्म, र्गा, र्चि, र्श्य, इ०.

३० कित्येक जोडाक्षरें दोन रीतींनीं लिहितात, त्यांत जीं विपरीत असतात, तीं लिहिण्यांत फार, दुसरीं क्वचित्, तीं शिकणारांनीं ध्यानांत धरिलीं पाहिजेत. त्र हें त्र होय; क्र हें क्र; क्त हें क्त; त्त हें त्त; स्न हें स्न; स्थ हें स्थ; ह्य हें ह्य; ह्म हें म्ह अ० ह्म; द्य हें द्य होय.

२१. श या अक्षरास र, ल, व, न, आणि च, हीं अक्षरें जोडायचीं असलीं तर, त्याचें बहुतकरून श्‍ अ-सें रूपांतर होतें; जसें—श्री, श्ला, श्वा, श्न, श्च.

---

## भाग २.

### स्थानविचार.

२२. ज्या वर्णाचें उच्चारण मुखाच्या ज्या भागापासून घडतें, तें त्या वर्णाचें स्थान होय.

अ, आ, क, ख, ग, घ, ङ, ह, यांचें कंठस्थान. हे वर्ण कंठ्य जाणावे.

इ, ई, च, छ, ज, झ, ञ, य, श, यांचें तालुस्थान. हे वर्ण तालव्य जाणावे.

ऋ, ॠ, ट, ठ, ड, ढ, ण, र, ष, ळ, यांचें मूर्द्धा-स्थान. हे वर्ण मूर्द्धन्य जाणावे.

ऌ, ॡ, त, थ, द, ध, न, ल, स, यांचें दंतस्थान. हे वर्ण दंत्य जाणावे.

उ, ऊ, प, फ, ब, भ, म, यांचें ओष्ठस्थान. हे वर्ण ओष्ठ्य जाणावे.

ए, ऐ, यांचें कंठतालुस्थान. हे वर्ण कंठतालव्य.

ओ, औ, यांचें कंठौष्ठस्थान. हे वर्ण कंठौष्ठ्य. व याचें दंतौष्ठस्थान. हा वर्ण दंतौष्ठ्य. च, छ, ज, झ, यांचें दंततालुस्थान. हे वर्ण दंततालव्य. अनुस्वाराचें नासिकास्थान जाणावें. विसर्गाचें कंठस्थान जाणावें.

ङ्, ञ्, ण्, न्, म्, यां वर्णांचीं पूर्वोक्त तीं तीं स्थानें असून, आणखी यांचें नासिकास्थानहि होय. हे वर्ण अनुनासिक जाणावे.

---

# भाग ३.

## संधिविचार.

३३. दोन वर्ण जेथें एकरूपानें मिळतात, अथवा, दोन वर्ण जेथें अत्यंत निकट असल्यानें त्यांतून एकाचें अथवा दोहोंचें रूपांतर होतें, त्या स्थळीं त्यांचा **संधि** आहे असें ह्मणतात.

३४. दोन **स्वर** जेथें एकरूपानें मिळतात त्या संधीस **अच्संधि*** अथवा **स्वरसंधि** ह्मणतात.

३५. दोन व्यंजनें जेथें एकरूपानें अथवा रूपांतरानें मिळतात त्या संधीस **हल्संधि** अथवा **व्यंजनसंधि** ह्मणतात.

वास्तविक पाहिलें असतां, हें संधिप्रकरण संस्कृत व्याकरणाचा भाग होय; शुद्ध मराठी शब्दांचा संधि होत नाहीं. तथापि या भाषेंत संधि जाणण्यास अथवा करण्यास विरळा प्रसंग येतो असें नाहीं; कांकीं या भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा फार आहे, म्हणोन संस्कृताच्या नियमा प्रमाणें **संधि** करण्याचा वारंवार प्रसंग पडतो, या करितां या प्रकरणीं उपयुक्त नियम सांगणें आवश्यक आहे.

संस्कृत व्याकरणांत हा संधि साधण्या करितां वर्णांची कृत्रिम रचना केली आहे, त्या सारखी कांहींशी रचना करून एथें हल्संधिप्रकरणीं दाखवली आहे.

---

* संस्कृत व्याकरणांत स्वरांस बहुतकरून **अच्** ह्मणतात, आणि व्यंजनांस **हल्** ह्मणतात. हीं नांवें, त्यांत प्रत्याहार ह्मणून हा संधि करण्या करितां जी वर्णरचना करून दाखवली आहे, त्या वरून पडलीं आहेत. संस्कृत व्याकरणांत याच संज्ञा फार प्रसिद्ध आहेत; ह्मणोन एथेंही यांचें ग्रहण केलें आहे.

# विभाग १.

## अच्संधि अ० स्वरसंधि.

३६. मुख्यस्वरांतून एकजातीय दोन स्वर अत्यंत निकट असले तर त्या दोहोंचा संधि दीर्घ होतो;–अ किंवा आ आदीं असून, पुढें लागलाच अ किंवा आ आला, तर त्या दोहों स्वरांच्या स्थानीं आ असा दीर्घ आदेश होतो. तसेंच इ किंवा ई यांच्या पुढें इ किंवा ई आला तर त्यांच्या स्थानीं ई आदेश होतो. या वरून पुढें जाणावें.

### उदाहरणें.

| | |
|---|---|
| वस्त्र + अन्न = वस्त्रान्न. | हरि + इच्छा = हरीच्छा. |
| धर्म + आश्रय=धर्माश्रय. | करी + इंद्र = करींद्र. |
| गंगा + अर्पण = गंगार्पण. | भानु + उदय = भानूदय. |
| रंभा + आज्ञा = रंभाज्ञा. | भू + उत्तर = भूत्तर. |

पितृ+ऋण=पितृण.

३७. अ किंवा आ, आणि दुसरा विजातीय स्वर, यांचे संधि येणेंप्रमाणें होतात;–ह्मणजे, पूर्वी अ किंवा आ असून पुढें लागलाच जर इ किंवा ई असला, तर या उभय स्वरांच्या स्थानीं ए आदेश होतो; उ किंवा ऊ असला तर ओ; ऋ किंवा ॠ असला तर अर्; ऌ असला तर अल्; ए किंवा ऐ असला तर ऐ; आणि ओ किंवा औ असला तर औ; असे आदेश होतातः—

### उदाहरणें.

| | |
|---|---|
| मुख + इंदु = मुखेंदु. | हिम + ऋतु = हिमर्तु. |
| सुर + ईश्वर= सुरेश्वर. | एक + एक = एकैक. |
| शीत+ उष्ण= शीतोष्ण. | देव + ऐश्वर्य= देवैश्वर्य. |
| गंगा + उदक= गंगोदक. | गंगा + ओघ = गंगौघ. |

माया + औपधिक=मायौपाधिक.

३८. मुख्य स्वरांतले अ आ यां शिवाय इतर जे स्वर, त्यांचा मुख्यस्वरांशीं अथवा संयुक्तस्वरांशीं या प्रमाणें संधि होतो:—इ ई यांच्या स्थानीं य्; उ ऊ यांच्या स्थानीं व्; ऋ ॠ यांच्या स्थानीं र्; ऌच्या स्थानीं ल्; एच्या स्थानीं अय्; ऐच्या स्थानीं आय्; ओच्या स्थानीं अव्; आणि औच्या स्थानीं आव्; असे आदेश होतात:—

उदाहरणें.

| | |
|---|---|
| इति + अर्थ = इत्यर्थ. | मातृ + अर्थ = मात्रर्थ. |
| प्रति + उत्तर = प्रत्युत्तर. | पितृ + आदेश = पित्रादेश. |
| गौरी + आनंद = गौर्यानंद. | ऌ + अनुबंध = लनुबंध. |
| मनु + अंतर = मन्वंतर. | ने + अनं = नयनं. |
| गो + उत्साह = गवुत्साह. | नौ + इक = नाविक. |

३९. या अच् संधि मध्यें दोन प्रकार आहेत;—एक गुण आणि एक वृद्धि.

४०. जेव्हां इचा ए होतो, उचा ओ, ऋचा अर्, आणि ऌचा अल् होतो, तेव्हां त्या विकारास गुण ह्मणतात.

४१. जेव्हां अचा आ, इ आणि ए यांचा ऐ, उ आणि ओ यांचा औ, ऋचा आर्, आणि ऌचा आल् होतो, तेव्हां त्या विकारास वृद्धि ह्मणतात.

---

## विभाग २.

### हल्संधि अ० व्यंजनसंधि.

४२. व्यंजनांचे संधि स्पष्ट कळाया करितां अगोदर प्रत्याहार सांगतो.

अ, इ, उ;—ऋ, लृ;—ए, ओ;—ऐ, औ;—
ह, य, व, र;—ल;—ञ, म, ङ, ण, न;—झ, भ;—
घ, ढ, ध;— ज, ब, ग, ड, द;—ख, फ, छ,
ठ, थ, च, ट, त;—क, प;—श, ष, स;— ह.

यां मध्यें असा नियम आहे कीं, या वरल्या चौदा विभागांत कोणतेहि दोन वर्ण ह्मटले ह्मणजे त्यांत त्यां सुद्धां त्यां दोहों मधल्या सर्व वर्णांचा समावेश जाणावा; जसे— अ—लृ ह्मटलें ह्मणजे अ, इ, उ, ऋ, लृ, इतक्या वर्णांचा प्रत्याहार जाणावा; तसेंच अ-ष ह्मटले ह्मणजे त्यांत अ पासून ष पर्यंत जितके वर्ण आहेत त्यां सर्वांचा समावेश होतो; तसेंच ज—द ह्मटलें ह्मणजे यांत ज, ब, ग, ड, द, इतके वर्ण येतात, असें जाणावें.

४३. आतां व्यंजनांच्या संधी विषयीं सामान्य नियम असा आहे कीं, पदाच्या अथवा शब्दाच्या अंतीं झ—ह (एथें शिकणारानें लक्षांत ठेवावें कीं झ—ह ह्मटलें ह्मणजे झ पासून ह पर्यंत जितके वर्ण ते सारे) असतां पुढें कोणताहि वर्ण येऊ, अथवा न येऊ, तथापि विवक्षा असता त्याच्या स्थानी ज—द होतो; ह्मणजे क् अ० ख् यांच्या स्थानीं ग्; च् अ० छ् यांच्या स्थानीं ज्; ट् अ० ठ् यांच्या स्थानीं ड्; त् अ० थ् यांच्या स्थागी द्; आणि प् अ० फ् यांच्या स्थानीं ब् आदेश होतो:—

## उदाहरणें

| | |
|---|---|
| वाक्+वर =वाग्वर. | षट्+रिपु = षड्रिपु |
| वाक्+ईश=वागीश. | तत्+आश्रय= तदाश्रय |
| अच्+अंत =अजंत. | अप्+द =अब्द. |
| इ० | इ०. |

यांत नियम हाच कीं, पुढें वर्ण नसतां विकल्पें ज—द् होतो, आणि पुढें वर्ण असल्यास ज—द् केलाच पाहिजे.

४४. यांत आणखी असा नियम आहे कीं, पूर्वी त्, थ्, द्, ध्, न्, असून जर पुढें च् छ्, ज्, झ्, ञ्, अथवा ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, हे वर्ण आले, तर त्यांच्या स्थानीं पुढल्या वर्णांचा आदेश होतो; परंतु छ्, अ० झ्, आणि ठ् अ० ढ् यांच्या स्थानीं सवर्णाचा आदेश न होतां च् अ० ज्, आणि ट् अ० ड्, याच वर्णांचा अनुक्रमें आदेश होतोः-

उदाहरणें.

| | |
|---|---|
| तत् + चारित्र = तच्चारित्र. | सत् + जन = सज्जन. |
| तत् + छत्र = तच्छत्र. | तत् + टीका = तट्टीका. |

भगवत् अ० द् + डमरु=भगवड्डमरु.

४५. तवर्गा पुढें ल् आला असतां तवर्गाच्या स्थानीं ल आदेश होतो; असें—भगवत् + लीला = भगवल्लीला.

४६. तवर्गा पुढें श् असतां तवर्गाच्या स्थानीं चवर्ग आणि श्च्या स्थानीं छ् असे आदेश होतातः—

उदाहरणें.

सत्+शास्त्र=सच्छास्त्र. । तद्+ श्लोक=तच्छ्लोक.

४७. झ—प पुढें जर ह् असला, आणि त्यांचा संधि कर्तव्य आहे, तर ह्च्या स्थानीं विकल्पें पूर्व वर्णाच्या वर्गांतील जे चतुर्थ वर्ण झ्, भ्, घ्, ढ्, ध, यांचा त्याच्या त्याच्या सवर्णाप्रमाणें आदेश होतोः—

उदाहरणें.

वाक् अ० ग् + हरि =वाग्हरि अ० वाग्घरि.

अच् अ० ज् + हल् =अज्हल् अ० अज्झल्.

षट् अ० ड् + हृदय=षड्हृदय अ० षड्ढृदय.

एतत् अ० द् + हविः = एतद्हविः अ० एतद्धविः.
इ० इ०

४८. य—स जर शब्दाच्या अंतीं आहेत, आणि त्यां पुढें ञ्, म्, ङ्, ण्, न्, यांतून कोणताही अनुनासिक वर्ण आला, तर पूर्व वर्णाच्या स्थानीं विकल्पें त्याच्या सवर्ण अनुनासिकाचा आदेश होतोः—

उदाहरणें.

वाक् + मन = वाङ्मन अ० वाग्मन.
षट् + मास = षण्मास अ० षड्मास.
चित् + मय = चिन्मय अ० चिद्मय.
तत् + नयन = तन्नयन अ० तद्नयन.

यां विकल्पांत पहिलीं रूपें विशेष ग्राह्य जाणावीं. हा संधिविचार संस्कृतांत फार मोठा आहे, ह्मणोन त्यांतले जे मुख्य मुख्य नियम, ज्यांचा मराठींत उपयोग पडतो, ते एथें सांगितले आहेत. त्यांत या हल्संधीचे जे नियम एथें सांगितले आहेत त्यांस कित्येक बाधकही नियम आहेत, परंतु तितक्या बारकाईत जाण्याचें एथें कांहीं विशेष प्रयोजन दिसत नाहीं. या इतक्या नियमां वरून मराठींत बहुधा सर्वत्र निर्वाह होईल असा मला भरंवसा आहे. न झाल्यास संस्कृत व्याकरण आहेच.

---

## खंड ३.

### शब्दविचार.

४९. या विचारा मध्यें भाषेस मूलरूप जे शब्द, त्यांची उत्पत्ति, साधन, जाति, आणि इतर शब्दांशीं त्यांचा संबंध, यां विषयीं विचार सांगितला आहे.

५०. भाषा ह्मणजे मनुष्यांस व्यवहारांत परस्परांचे मनोभाव समजावे ह्मणोन परंपरागत शब्दांचें अवलंबन करून मुखानें जी बोलतात ती होय. या वरून अनुमान

केलें असतां होईल, कीं भाषे मध्यें शब्दमात्रास नियम असावेत; हे नियम कसकसे याचा विचार या पुढल्या भागांत केला आहे.

कदाचित् कोणी शिकणारानें पहिल्यानेंच पुसलें कीं, भाषेंत नियम आहेत काय? तर त्याणें या प्रश्नाच्या उत्तरांत असें समजावें कीं, जर भाषेंत नियम नसते तर भाषाच नसती; कांकिं जेव्हां मुलें लहान असतात, त्या काळीं 'बाबा आला,' 'आई आली,' 'पोर आलें,' असें ह्मणतात; नियम नसता तर या तिघांस **आला, आली, आलें,** अशीं निराळीं रूपें कां असतीं? बाबा पुरुष आहे म्हणोन त्यास **आला,** आई स्त्री आहे ह्मणोन तीस **आली;** आणि पोर लहान, हलकें, अथवा तेथें मुलगा किंवा मुलगी अशी विवक्षा नाहीं, ह्मणोन त्यास **आलें** असें ह्मणतात; यासच नियम ह्मणावें; जर हा नियम नसता, तर एक मूल 'बाबा आली,' दुसरें मूल 'आई आला,' 'वाघ्या आलें,' आणि तिसरें मूल या परीस विलक्षण ह्मणतें; कांकिं मग कोणत्याही गोष्टीचा नियमच न राहता; परंतु पुरुषाला पुरुषा प्रमाणें, स्त्रीला स्त्री प्रमाणें म्हणावें, हा त्यांच्या वडिलांचा परंपरागत नियम आहे, ह्मणोन पुढें मुलेंही यासच अनुसरून बोलतात.

९१. शब्द ह्मणजे ज्यापासून अर्थ निष्पन्न होतो असा जो मुखांतून एकवर्णात्मक अथवा बहुवर्णात्मक ध्वनि निघतो तो; अथवा, त्या ध्वनीस दाखवणारा जो लिहिलेला वर्णसमुच्चय त्यासही शब्द ह्मणावें; जसें—**तो, हा, घोडा, मनुष्य, खटपट,** इत्यादि प्रत्येक शब्द जाणावे

या प्रमाणें वैयाकरणांची शब्दाची व्याख्या होय. वेदांती व नैयायिक हे तर श्रोत्रेंद्रियविषयक जो ध्वनि त्यास **शब्द** म्हणतात, मग तो सार्थ अथवा व्यर्थ कां असेना.

**९२. शब्द दोन प्रकारचे—सिद्ध आणि साधित.**

**९३. सिद्ध शब्द** ह्मणजे जे शब्द इतर शब्दांपासून व्युत्पन्न नसून, स्वतःसिद्ध असतात ते; जसें—घोडा, लांकूड, डोळा, नाक, तोंड, इ०.

**९४. साधित शब्द** ह्मणजे जे इतर शब्दांपासून व्युत्पन्न झाले असतात ते; जसें—डोळस, खादाड, भांडखोर, लांकूडतोड्या, वाघनख्या, शास्त्री, विद्वान्, याज्ञिक, नैयायिक इ०.

वास्तविक विचार केला असतां असें ध्यानांत येतें कीं, कोणत्याही भाषेंत केवळ सिद्ध शब्द म्हटले तर फार थोडे निघतील; कांकिं भाषेंत जे शब्द वाढतात, ते बहुधा प्रत्ययांच्या, उपसर्गांच्या, अथवा समासांच्या योगेंकरून घडलेले असतात. तेव्हां केवळ मूळ प्रकृतीलाच जर सिद्ध शब्द म्हटलें तर असे सिद्ध शब्द फारच थोडे निघतील. त्यात आणखी बहुतेक शब्दांच्या व्युत्पत्तीचें ज्ञान सर्वांस फार दुर्घट असतें. तेव्हां अर्थात् तें ज्ञान यथायोग्य होई तों पर्यंत त्यांस सिद्धच शब्द ह्मटलें पाहिजे; यास उदाहरणः—**माती** म्हटलें असतां सामान्यतः सर्वांस पहिल्या दृष्टीस सिद्ध शब्दसा दिसतो; परंतु अंमळ विचार करून पाहिलें असतां लागलेंच समजतें कीं, हा संस्कृत शब्द जो **मृत्तिका** त्याचा अपभ्रंश होय. परंतु पुनः मनांत आशंका उपन्न होत्ये कीं, **मृत्तिका** हा तरीं मुळचा सिद्ध शब्द आहे काय? तर नाहीं. मूळ **मृत्** शब्दा वरून स्वार्थीं **तिकन्** प्रत्यय होऊन पुढें त्यास स्त्रीलिंगीं **टाप्** प्रत्यय होऊन **मृत्तिका** शब्द संस्कृतांत सिद्ध झाला आहे. तेव्हां अशा विचाराच्या जाळांत सर्व पडले असतां निर्वाह लागणार नाहीं; ह्मणोन असा विवाद न करितां सामान्यतः व्याकरणाचा व्यवहार चालवण्या करितां ज्या कोणास एकाद्या

शब्दाची व्युत्पत्ति माहित नसेल त्याणें त्यास सिद्ध शब्द म्ह-टलें असतां त्यांत दोष आहे असें कोणी मानूं नये.*

५५. या साधित शब्दां मध्यें सामासिक शब्द असा आणखी एक भेद आहे. दोन अथवा अधिक शब्दांचा संयोग होऊन त्यांचा एक शब्द होतो तो सामासिक शब्द जाणावा; जसें—आईबापें, बहिणभावंडें, आजे-सासू, रावरंक, भक्तिरस, कृपावलोकन, चक्रपाणि इ०.

---

## भाग

## सविभक्तिकशब्दविचार.

५६. आणखी प्रक्रिये वरून व्याकरणांत शब्दांचे मुख्य दोन भेद मानले आहेत; एक सविभक्तिक, आणि दुसरा अविभक्तिक अ० अव्यय.

५७. सविभक्तिक शब्द ह्मणजे ज्यां वरून विभक्ति-कार्यें होतात असे शब्द; जसें—राम, घर, मी, बरा, जाणें, येणें इ०.या शब्दांस अनेक प्रत्यय लागून अनेक रूपांतरें होतात.

५८. अविभक्तिक अ० अव्यय ह्मणजे ज्यां वरून विभक्तिकार्यें होत नाहींत असे शब्द; जसें—आणि, परंतु, जर, खालीं, सटकन, छी इ०.

५९. महाराष्ट्र भाषेत शब्दांचे आठ वर्ग अथवा जाति आहेत; त्यांत सविभक्तिकांत चार—नाम, सर्वनाम, विशे-षण, क्रियापद; आणि अविभक्तिकांत अथवा अव्ययांत चार—क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी, आणि केवलप्रयोगी अ० उद्गारवाची, मिळून आठ.

या व्याकरणाच्या पहिल्या आवृत्तींत शब्दाच्या जाति पांच केल्या होत्या, परंतु त्यात सविभक्तिकादि मुख्य भेद दर्शविले नव्हते; हे भेद दर्शविल्या वर या आठ जाति पृथक् कल्पि-

णें कांहीं अप्रशस्त दिसत नाहीं, असें माझ्या एका विद्वान् मित्राचें मत पडलें, व तें मला नीट दिसलें, या वरून या आठ जाति एथें दर्शविल्या आहेत.

तथापि या शब्दांच्या जातीं विषयीं निरनिराळ्या पंडितांचीं निरनिराळीं मतें पडलीं असतां नवल नाहीं. अव्ययांत जे चार भेद सांगितले आहेत त्यांचा अंतर्भाव एका अव्ययांत करून पांच जाति मानल्या असतां चालतील; कोणी नुसतें क्रियाविशेषण अव्यय मात्र निराळें मानून सहा गणितात. या प्रमाणें भिन्न भिन्न मतांचा संभव आहे; परंतु विचारपूर्वक पाहिलें असतां या भाषेंत शब्दांच्या पूर्वोक्त आठ जाति मानणें हेंच प्रशस्त दिसतें.

६०. **नाम** ह्मणजे पदार्थ मात्राचें नांव, मग ते पदार्थ प्रत्यक्ष दिसोत, अथवा त्यांचा नुसता संस्कार मनाच्या ठायीं होऊ; जसें—मनुष्य, पोथी, लेखणी, अहंकार, राग, इ०.

६१. **सर्वनाम** ह्मणजे नामाचा वारंवार उच्चार न व्हावा, ह्मणोन समयविशेषीं त्याच्या स्थानीं जे शब्द येतात ते प्रत्येक; जसें—मी, तूं, हा, जो, ती, तें, इ०.

६२. **विशेषण** ह्मणजे नामाच्या गुणाचा दर्शक जो शब्द तो; जसें—काळा, गोरा, बरा, वाईट, लंगडा, शहाणा, मूर्ख, इ०.

६३. **क्रियापद** ह्मणजे ज्या शब्दानें कोणत्याहि क्रियेचा अथवा स्थितीचा बोध होतो तो; जसें—करणें, बोलणें, चालणें, निजणें, असणें, इ०.

६४. **क्रियाविशेषण** ह्मणजे ज्या शब्दानें क्रियेच्या गुणाचा अथवा प्रकाराचा बोध होतो तो शब्द; जसें—हळू, झटकन्, त्वरित, सटासट, खदखदां, इ०.

६५. **उभयान्वयी अव्यय** ह्मणजे ज्या शब्दांच्या यो-

णेंकरून दोन शब्द अथवा दोन वाक्यें यांचा अन्वय हो-
तो ते; जसें—आणि, व, जर, तर, परंतु, तथापि, इ०.

६६. **शब्दयोगी अव्यय** ह्मणजे ज्या शब्दांचा योग नामवाचक शब्दांशींच होतो, व ज्या शब्दांशीं यांचा संबंध असतो, त्यांचें यांच्या योगानें सामान्यरूप होतें; जसें—वर, खालीं, कडे, मध्यें, पुढें, मागें, इ०. यांत **शुद्धशब्दयोगी** अव्यय ह्मणून एक उपभेद आहे त्याच्या योगानें हें सामान्यरूप होत नाहीं.

६७. **केवलप्रयोगी अव्यय**, अ० **उद्गारवाची अव्यय** ह्मणजे जेणेंकरून मानसिक विकारांचा उद्बोध होतो असे जे उद्गाररूप शब्द ते; जसें—छी, वाहवा, अः, बबब, इ०.

---

## विभाग १.

### नामविचार.

६८. **नाम** ह्मणजे पदार्थमात्राचें नांव, मग ते पदार्थ प्रत्यक्ष दिसोत, अथवा त्यांचा नुसता संस्कार मनाच्या ठायीं असो; जसें—मनुष्य, पोथी, लेखणी, हेवा, अहंकार, राग, इ०.

६९. या नामांत **सामान्य**, **विशेष**, आणि **भाववाचक**, असे तीन भेद आहेत.

७०. नामास **लिंग**, **वचन**, आणि **विभक्ति**, हीं असतात.

७१. **सामान्य नाम** ह्मणजे जातिबोधक संज्ञा, ज्यांत त्या नामजातीचा धर्म अनेकां वर राहतो; जसें—मनुष्य, झाड, पशु, घर, इ० यांत मनुष्य या शब्दाचा प्रयोग सर्व मनुष्यजाती वर होतो.

यांत मनुष्य, झाड, इ० सामान्य नामांतलि एक एक निराळी

जाति घेतली तथापि तेंहि सामान्य नाम होतें; जसें ब्राह्मण, आंबा, गाय, इ०. यांत ब्राह्मण हेंहि सामान्य नाम; कारण, ब्राह्मण्यरूप जो कांहीं त्याज वर आरोपित धर्म तो एका वरच आहे असें नाहीं, जेवढे ब्राह्मण तेवढ्यां वर तो आहे, ह्मणोन हेंहि **सामान्य नाम** होय. तसेच आणखी शब्द जाणावे.

७२. **विशेष नाम** ह्मणजे व्यक्तिबोधक संज्ञा, ज्यांत या नामाचा धर्म एका वरच राहतो; जसें—कृष्ण, काशी, भागीरथी, खंडु, इ०.

विशेष नामाचें मुख्य लक्षण असें आहे कीं, तें एका अधिकरणास धरून राहतें; या वरून जितकीं ठेविलेलीं अथवा दिलेलीं नांवें तितकीं सारीं विशेष नामें जाणावीं; जसें-मनुष्य, नदी, डोंगर, इत्यादिकांचीं जीं नांवें तीं सारीं विशेष नामें; जसें रामा, हरि, दादा, तात्या, मनी, गंगा, सह्याद्रि, इ०.

कदाचित् कोणी असा आक्षेप घेईल कीं विशेष नामा मध्येंहि सामान्य नामाचें लक्षण उभगतें; जसें-**मनी** ह्मटली असतां एकच मनी आहे असें नाहीं, या नांवाच्या व्यक्ति पुष्कळ असतात; तर असें नव्हे;—ठेविलेलीं जितकीं नांवें तितकीं सारीं विशेष नामें होत; कारण जरीं मनी एकच नाहीं असें दिसतें, तरीं वस्तुत: पाहिलें असतां उक्त जी मनी ती एकच होय; हें कांहीं जातिबोधक नांव नव्हे; एका मनीचें जें कांहीं लक्षण तेंच दुसऱ्या मनींत असतें असें नाहीं; अथवा, एका मनीच्या लक्षणाप्रमाणें दुसरी स्त्री असली ह्मणजे तिला मनीच नांव देतात असेंही नाहीं; हें केवळ स्वेच्छे प्रमाणें एका व्यक्तीस ओळखायाकरितां नांव दिलें असतें, ह्मणोन मनी हें विशेष नाम.

आतां 'तो रावण आहे,' 'तो कर्ण आहे,' 'सर्व बाया लक्ष्मी नसतात,' अशा ठिकाणीं विशेष नामाचा प्रयोग सामान्य

नामा प्रमाणें करितात; तथापि वस्तुतः हें विशेष नामच होय. 'तो कर्ण आहे,' ह्मणजे कर्णनामा कोणी दातृत्वगुणविशिष्ट प्रख्यात पुरुष होऊन गेला त्या सारखा दाता आहे असा अर्थ. असा बोलण्याचा प्रकार एक वाक्यालंकार होय, ज्यास उपमा असें ह्मणतात. अथवा एथें **कर्ण** या शद्बाचा विशेषणा सारखा प्रयोग केला आहे असें मानलें तरीं चालेल.

७३ ज्या नामां वरून कोणत्याहि व्यक्तीचा शुद्ध भाव अथवा धर्म यांचा उद्बोध होतो, तीं सारीं भाववाचक नामें जाणावीं; जसें—माणुसपण, काळेपणा उधळेपणा, मैत्री, इष्टत्व, औदार्य, इ०.

---

## वर्ग १.

### लिंगविचार.

७४ नाममात्रास लिंग असतें. तीं लिंगें तीन आहेत—**पुल्लिंग**, **स्त्रीलिंग** आणि **नपुंसकलिंग**.

७५ ज्यां नामां वरून प्राणिवाचक नामाच्या अथवा अप्राणिवाचक पदार्थांच्या पुरुषत्वाचा बोध होतो त्यांस, अथवा त्यांचें, **पुल्लिंग** ह्मणतात; जसें—रामा, मुलगा, वाघ, बैल, आंबा, बडगा, गुडघा, इ०.

७६ ज्यां नामां वरून प्राणिवाचक अथवा अप्राणिवाचक पदार्थांच्या स्त्रीत्वाचा बोध होतो त्यांस, अथवा, त्यांचें, **स्त्रीलिंग** ह्मणतात. जसें—जानकी, मुलगी, वाघीण गाय, चिंच, काठी, इ

७७ ज्यां नामां वरून प्राणिवाचक अथवा अप्राणिवाचक पदार्थांच्या पुरुषत्वाचा अथवा स्त्रीत्वाचा बोध होत नाहीं, परंतु जीं सामान्येंकरून सर्व जातीचीं अथवा त्या जातींतल्या एकाद्या क्षुद्र व्यक्तीचीं वाचकें असतात त्यां-

स, अथवा त्यांचें, **नपुंसकलिंग** ह्मणतात; जसें—माणूस, ढोर, कुत्रें, लांकूड, तेल, इ०.

७८ ज्यां नामां वरून वर सांगितल्या कोणत्याहि लिंगाचा ज्या काळीं एकाद्या वाक्यामध्यें निश्चय करितां येत नाहीं, त्या काळीं त्याचें **सामान्यलिंग** ह्मणावें; जसें—मित्र, मी, तूं, पक्षी, इ०.

७९ हा नामाचा लिंगभेद समजायास मुख्य साधन असें आहे कीं, ज्यां नामां मागें **तो** हें सर्वनाम लागतें, तीं सारीं पुल्लिंग नामें जाणावीं; जसें—**आंबा** ह्मटला ह्मणजे '**तो** आंबा' असें लागतें, '**ती** आंबा' अथवा 'तें आंबा' असें जुगत नाहीं; ह्मणोन **आंबा** या नामाचें पुल्लिंग जाणावें. याच प्रमाणें **चिंच** ह्मटली ह्मणजे 'ती चिंच' असें जुगतें, ह्मणोन **चिंच** या नामाचें स्त्रीलिंग जाणावें. आणि **लांकूड** ह्मटलें ह्मणजे 'तें लांकूड', असें जुगतें, ह्मणोन याचें नपुंसकलिंग जाणावें.

आतां जे प्राणिवाचक शब्द आहेत (जसें पुरुष, बायको, घोडा, गाय, मांजर, इ०.) त्यांचें लिंगविवेचन करणें अगदीं अवघड नाहीं, कांकीं त्या मध्यें जे पुरुषजातीचे प्राणी असतात ते पुल्लिंग, स्त्रीजातीचे ते स्त्रीलिंग, आणि ज्याचें लिंगविवेचन करतां येत नाहीं (जसें-माणूस, कुत्रें, मूल, ढोर, इ०.) ते नपुंसकलिंग जाणावे. परंतु अप्राणिवाचक अथवा निर्जीवपदार्थवाचक जीं नामें (जसें-आंबा, चिंच, शार्क, पेरू, घर, इ०.) यांचेंहि पुंस्त्व, स्त्रीत्व, मानणें हें विचारपूर्वक राहिलें असतां या देशांतील भाषांत आश्चर्या सारखें आहे. या लिंगभेदा वर नियम चालत नाहीं; एथें लोकव्यवहार हाच काय तो मुख्य नियम; ह्मणोनच परदेशीय मनुष्यांस एकाएकीं शुद्ध बोलतां येत नाहीं. आपण नित्यशः ऐकतों तैलंग लोक कसें बोलतात तें; ते 'लांकूड

मोडला," आह्मांस एवढाच दक्षिणा दिला' इत्यादि लिंगाच्या अज्ञानेंकरून अशुद्ध बोलतात.

८० या लिंगानुशासना विषयीं असें अनुमान होतें कीं कोणत्याहि भाषेंत मुळीं नामांस लिंगें पडायास मुख्य तीन कारणें असतात;—एक तर त्यांचा अर्थ, दुसरें शब्दाचें शेवटील अक्षर अथवा प्रत्यय, आणि तिसरें शुद्ध लोकव्यवहार.

ज्यांत अर्था वरून लिंगविवेचन करितात—तें असें कीं, जीं, नामें पुंस्त्ववाचक, अथवा बल, प्रताप, तेज, स्थूलपणा, इत्यादि पुरुषधर्माचीं प्रदर्शक असतात, तीं पुंल्लिंग जाणावीं. जीं नामें स्त्रीत्ववाचक, अथवा सौंदर्य, मार्दव, कोमलता, इत्यादि स्त्रीधर्माचीं प्रदर्शक असतात, तीं स्त्रीलिंग जाणावीं. आणि जीं नामें पुल्लिंग स्त्रीलिंग नसून सूक्ष्मता निर्बलता, लाघव, इत्याद्यर्थप्रदर्शक असतात, तीं नपुंसक जाणावीं. यांत बहुधा लोकांच्या कल्पने वर हा नियम राहतो. कोणा देशांत समुद्र मोठा पराक्रमी व बलवान् वाटतो, तेथील लोक त्याचें पुल्लिंग ह्मणतात; कित्येकांस शांत व स्थिर वाटतो, ते लोक त्याचें स्त्रीलिंग ह्मणतात. ह्मणोनच एका अर्थाच्या नामाचीं निरानिराळ्या भाषांत निरनिराळीं लिंगें असतात. आतां कित्येक भाषांत या लिंगविवेचना विषयीं फार सुलभ नियम आहेत; ते असे कीं,—प्राणिवाचक नामांत जे पुरुषवाचक शब्द ते पुल्लिंग, जे स्त्रीवाचक शब्द ते स्त्रीलिंग; आणि कृमिकीटकादि ज्यांचें लिंगज्ञान होत नाहीं त्यांचे वाचक, सर्व व अप्राणिवाचक जे शब्द, ते नपुंसकलिंग. कित्येक भाषांत दोनच लिंगें असतात; कित्येक भाषांत मुळीं लिंगेंच नसतात; तेव्हां या भाषांत हें लिंगविवेचन तारतम्यभावेंकरून

सुलभ होय. परंतु संस्कृत, महाराष्ट्र, गुर्जर, आदिकरून कित्येक भाषांत तसा कांहीं नियम नसून आणखी त्यांत तीन लिंगें; तेव्हां यांत हें लिंगविवेचन सहज फार कठिण असतें.

८१ या निर्जीव पदार्थवाचक अथवा अप्राणिवाचक नांमांच्या लिंगां वर कांहीं नियम आहेत ते कळविण्या-च्या अगोदर अकारान्त, आकारान्त, इकारान्त, इत्यादि शब्द एथें सांगितले पाहिजेत.

### पुल्लिंग.

अकारान्त–खांब, भोग, बेत, नाद, इ०. आकारान्त–आंबा, फाडा, रस्ता, लाखोटा, इ०. इकारान्त–हरि, कवि, कोळी, धोबी, तांबोळी, इ०. उकारान्त–भानु, वेणु, लाडू, पेरू, चेंडू, इ०. ऋकारान्त–(संकृत) पितृ, भ्रातृ, इ०. ओकारान्त–टाहो, लाहो, इ०. मराठी भाषेंत एकारान्त पुल्लिंग व स्त्रीलिंग शब्द आढळत नाहींत.

### स्त्रीलिंग.

अ–कंड, खरूज, गाय, म्हैस, इ०. आ–जागा, गंगा, रेवा, इ०. इ–रीति, रुचि, साडी, नदी, खोली, लेखणी, इ०. उ–धेनु, जळू, सासू, जाऊ, इ०. ऋ–(संस्कृत) मातृ, स्वसृ, इ०. ओ—बायको, इत्यादि.

### नपुसकलिंग.

अ–नाक, तेल, ताक, पेर, मूल, इ०. इ–दधि, पाणी, लोणी इ०. उ–मधु, किरडूं, मेंढरूं, इ०. ए–भांडें, आंडें, तळें, सोनें, बोलणें, इ०.

८२ या प्रसंगीं शिकणारांनीं उपांत्य काय तें माहीत करून घ्यावें; कांकीं पुढें या विषयीं कांहीं सांगायाचें पडेल. उपांत्य ह्मणजे शब्दाच्या अंत्य अक्षराच्या शेजार-

चा जो वर्ण तो; जसें—दर्उत यांत ऊ हा उपांत्य; **बाईल** यांत ई हा उपांत्य; **बुरूड** यांत ऊ हा उपांत्य होय.

८३ आणखी इ ई, उ ऊ, ऋ ॠ, आणि ऌ, यांचा, आणि य्, व्, र्, ल्, यांचा जो अन्योन्य आदेश, ह्मणजे इच्या स्थानीं य्, अथवा य्च्या स्थानीं इ, उच्या स्थानीं व्, अथवा व्च्या स्थानीं उ, इत्यादि, त्यास **संप्रसारण** ह्मणतात.

संस्कृत व्याकरणांत तर य्, व्, र्, यांच्या स्थानीं जे अनुक्रमें इ, उ, ऋ, आदेश होतात त्या आदेशांस मात्र **संप्रसारण** अशी संज्ञा आहे; परंतु तिचा एथें अतिदेश करून य्, व्, र्, या आदेशांसही ही संज्ञा दिली आहे; कारण, प्राकृतांत इ, उ, इ० यांच्या स्थानीं य्, व्, इ० जे आदेश त्यांची व्याप्ति विशेष आहे.

८४ तथापि अर्था वरून, आणि शब्दाच्या शेवटील वर्णा वरून, अथवा प्रत्यया वरून, या लिंगविवेचना विषयीं कित्येक अबाधित नियम आहेत, त्यांतून मुख्य एथें सांगतों.

## अर्था वरून नामांचा लिंगनिर्बंध.

८५ प्राणिवाचक नामांत जे पुरुषवाचक शब्द ते पुल्लिंग जाणावे; जसें—रामा, माधव, कृष्ण, इंद्र, हत्ती, बैल, वाघ, परीट, शास्त्री, तेली, न्हावी, इ०.

८६ प्राणिवाचक नामांत जे स्त्रीवाचक शब्द ते स्त्रीलिंग जाणावे; जसें—रमा, सरस्वती, गंगा, रंभा, गाई, परिटीण, तेलीण, न्हावीण, कुत्री, इ०.

८७ प्राणिवाचक नामांत सामान्यजातिवाचक जे शब्द त्यांचें, अथवा जेथें लिंगाची विवक्षा नसत्ये तेथें, नपुंसकलिंग जाणावें; जसें—माणूस, मुलगें, मोर, घोडें, कुत्रें, इ०.

८८ कृमिकीटकादि जे क्षुद्र जंतु असतात, त्यांच्या जातीचा निर्देश एका शब्दानें होत असतो; आणि त्या शब्दाच्या लिंगाची उपलब्धि व्यवहारा वरून होत्ये; जसें—माशी, मुंगी, भुंगा, पोपट, ऊ, ढेकूण, पिसू, मुरकूट, इ०. यांत बहुधा इकारान्त, उकारान्त, जे शब्द ते स्त्रीलिंग जाणावे; आणि आकारान्त पुल्लिंग जाणावे.

८९ प्रवाहीपदार्थवाचक जीं नामें तीं नपुंसक जाणावीं; जसें—पाणी, लोणी, चिंचवणी, कालवण, तेल, तूप, एरंडेल, इ०.

यांत नदी, ओढा, काढा, सडा, शाई, काकवी, मध, लस, कढी, बासुदी, आमटी, ताकतई, इ०. किती एक शब्द अपवादक होत; यांत आकारान्ता शिवाय इतर सर्व शब्द स्त्रीलिंग जाणावे.

यांतही आणखी असा नियम आढळतो कीं, जे णकारान्त प्रवाहीपदार्थवाचक शब्द ते निरंतर नपुंसक असतात.

९० सुवर्णादिधातुवाचक जीं नामें तीं नपुंसक जाणावीं; जसें—सोनें, रुपें, तांबें, कथील, पितळ, जस्त, लोखंड, इ०.

## २. अंत्यवर्णा वरून अथवा प्रत्यया वरून लिंगनिर्बंध.

९१ शुद्ध मराठी जीं आकारान्त नामें तीं पुल्लिंग जाणावीं; जसें—सोटा, गोटा, बडगा, मठा, वांसा, भाला, बरेपणा, भलेपणा, इ०.

९२ 'तें ज्यास आहे' अथवा 'तत्संबंधी' अशा अर्थीं ईप्रत्यय लागून जे शब्द सिद्ध होतात, त्यां शिवाय जे शुद्ध ईकारान्त मराठी शब्द, ते बहुधा स्त्रीलिंग जाणावे; जसें—नदी, आई, काकी, काकवी, कसोटी, भाकरी, पाटीलकी, मुलुखगिरी, सावकारी, इ०.

१०६ आकारान्त जे संस्कृत शब्द ते सारे स्त्रीलिंग जाणावे; जसें—गंगा, श्रद्धा, मृत्तिका, इच्छा, स्पृहा, निद्रा, तंद्रा व्याख्या, टीका, इ०.

एथें शिकणारांनीं लक्षांत ठेवावें कीं, संस्कृतांत स्त्रीलिंगीं जो टाप् प्रत्यय होतो, त्यांतील टकार पकार जाऊन जो आ ह्मणोन स्त्रीप्रत्यय अवशिष्ट राहतो तदंत जे शब्द त्यांचें विधान केलें आहे; नाहींतर आत्मा, ब्रह्मा, राजा, चंद्रमा, प्रेमा, पिता, इ० शब्द अपवादक होतील. हे संस्कृतांत मूळचे आकारान्त शब्द नाहींत.

१०७ भावार्थी जे ताप्रत्ययान्त संस्कृत शब्द ते सारे स्त्रीलिंग जाणावे; जसें—दक्षता, मधुरता, व्याकुलता, विद्वत्ता, इ०.

१०८ भावार्थी जे त्वप्रत्ययान्त शब्द ते नित्य नपुंसकलिंग जाणावे; जसें—ब्राह्मणत्व, मनुष्यत्व, पटुत्व, स्त्रीत्व, पुंस्त्व, इ०.

१०९ भावार्थी जे किती एक प्रत्यय लागून पूर्व स्वरास वृद्धि होऊन जे शब्द सिद्ध होतात ते सारे नपुंसकलिंग जाणावे; जसें—माधुर्य, क्षात्र, वैभव, चांचल्य, स्थैर्य, धर्य, क्रौर्य, धौर्त्य, इ०.

११० इमा* प्रत्ययान्त जे संस्कृत शब्द ते महाराष्ट्रांत विकल्पें पुल्लिंग अथवा स्त्रीलिंग जाणावे; जसें—महिमा, अणिमा, गरिमा, इ०.

॥'जो न गाय हरिचे महिमेला ॥ तो असे जितचि या महिं मेला'॥
वामन.

या नियमां शिवाय आणखी आदि, उपांत्य, आणि अंत्यवर्ण, यां वरून कांहीं या लिंगविवेचना विषयीं नियम शोधूं गेलें असतां सांपडतील असें मला वाटतें; परंतु जरीं सांपडले तरीं

*मुळीं संस्कृतांत भावार्थी हा इमनच् (इमन्) प्रत्यय होतो आणि एतदन्त जे शब्द ते संस्कृतांत निरंतर पुल्लिंग असतात.

ते केवळ सर्वव्यापक होणार नाहींत; यास्तव, त्यांचा विस्तार एथें केला नाहीं.—

### ३ लोकव्यवहारा वरून लिंगनिर्बंध.

१११ पूर्वोक्त नियमा शिवाय जे शब्द राहिले त्यांचें लिंगविवेचन बहुधा लोकव्यवहारा वरून जाणावें.

११२ प्राणिवाचक कित्येक स्त्रीत्वबोधक शब्द असून त्यांचें ग्रहण क्वचित् व्यवहारांत नपुंसकलिंगानें होत असतें; जसें—कुटुंब, कलत्र, लांडोर, बटकूर, रांडरूं, रांडमाणूस, इ०. तसेंच—दार, सखिजन, कबीला, इ०. कित्येक थोडे शब्द स्त्रीत्वबोधक असून नित्य पुंल्लिंग जाणावे.

११३ द्वंद्वसमास होऊन जीं कित्येक शुद्ध मराठी नामें सिद्ध होतात तीं नपुंसकलिंग जाणावीं; जसें—आईबापें, बहीणभावंडें, दादलाबायलें, इ०.

११४ अकारान्त जीं झाडांचीं नांवें तीं बहुधा स्त्रीलिंग असतात; जसें—भोंकर, बकूळ, नारळ, पोफळ, जांबूळ, जासवन, गुलबास, इ०.

यांत—माड, ताड, देवदार, फणस, वड, पिंपळ, इ० शब्द पुल्लिंग जाणावे.

११५ तेच जर फळ अथवा फूल यांचे वाचक शब्द असले तर त्यांचें बहुधा नपुंसकलिंग जाणावें; जसें—भोंकर, बकूळ, पोफळ, जांबूळ, इ०.

यांत नारळ, फणस, गुलाब, जांब इ० पुल्लिंग जाणावे.

११६ कित्येक शब्द कोंकण, देश, इत्यादि स्थानपरत्वें भिन्न भिन्न लिंगीं वर्त्ततात; जसें—तपकीर, तंबाखू, गुडाखू, मध, इ०

११७ प्राणिवाचक नामाचें कोणतें एक लिंग समज-

त्यानें त्याज वरून दुसरीं लिंगें साधितां येतात. अकारान्त, इकारान्त, आणि उकारान्त प्राणिवाचक पुंल्लिंग नामास पुढें ईण प्रत्यय लावल्यानें त्याच नामाचा स्त्रीलिंगवाचक शब्द होतो; परंतु हा प्रत्यय लावते समयीं शब्दाच्या अंत्य स्वराचा लोप होतो; आणि त्या पुंल्लिंग शब्दाचा उपांत्य जर इकार किंवा उकार आहे, तर त्यांस हा स्त्रीत्वबोधक प्रत्यय लावते समयीं त्या उपांत्य स्वराच्या स्थानीं अ आदेश होतो; अन्यपक्षीं ते उपांत्यस्वर दीर्घ असल्यास ऱ्हस्वही होतात; उदाहरणें—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| वाघ | वाघीण | तेली | तेलीण |
| सिंह | सिंहीण | न्हावी | न्हावीण |
| सोनार | सोनारीण | तांबोळी | तांबोळीण |
| सुतार | सुतारीण | रामोशी | रामोशीण |
| लोहार | लोहारीण | परभू | परभीण |
| ठाकूर | ठाकरीण | परीट | परिटीण |

११८ शुद्ध मराठी शब्दांत, अथवा मराठींत मिसळलेल्या इतर भाषेंतील शब्दांत, जर उपांत्य स्वर दीर्घ ई अथवा ऊ असला, आणि त्यांस कोणताहि प्रत्यय लागून जर त्या मूळ उपांत्याचा पुढील वर्ण दीर्घ होत असला, तर त्यास हा स्त्रीप्रत्यय लावते समयीं त्या उपांत्य स्वराच्या स्थानीं अ आदेश होतो; अन्य पक्षीं हे उपांत्य स्वर ऱ्हस्वही होतात.

(अ) यांत आणखी उपांत्य स्वराचा मागला वर्ण जर दीर्घ असला, तर ई आणि ऊ या उपांत्यांच्या स्थानीं अच आदेश करावा हें बरें.

## उदाहरणें.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| परीट | परटीण, परिटीण. | बेडूक | बेडकीण. |
| बुरूड | बुरडीण, बुरुडीण. | ठाकूर | ठाकरीण. |
| इ०. | | | इ०. |

यांत बहुधा असा नियम आहे कीं, ई अथवा ऊ, या उपांत्याच्या मागील अक्षर जर दीर्घ असलें तर अ हाच आदेश होतो; तेथें वैकल्पिक रूपांचा संभव बहुधा दिसत नाहीं; कारण, या भाषेंत मागें पूर्ण अक्षर असतां त्यांत विशेषेंकरून दीर्घ अक्षर असतां, पुढील र्‍हस्व अक्षराचें, आणि विशेषेंकरून अकारान्त अक्षराचें अर्धोच्चारण होत असतें, असा स्वाभाविक नियम आढळण्यांत येतो; तेव्हां मात्रांची गणना केली असतां दीर्घ अक्षरापुढील उपान्त्याच्या स्थानीं अकारच आदेशकरणें सयुक्तिक दिसतें.

११९ परंतु शुद्ध मराठी ह्मटलें या वरून जर ते शब्द संस्कृत, अथवा यवनी, अथवा कोणत्येहि इतर भाषेचे, अथवा उपनामवाचक असले, तर उपांत्य स्वरास कांहीं विकार होत नाहीं. परंतु हेच शब्द जर मराठी भाषेंत फार रूढींत आलेले असले, तर विवक्षा असतां त्यांचा उपांत्य र्‍हस्व करणें हा उत्तम पक्ष.

## उदाहरणें.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| अतीत. | अतीतीण, अतितीण. | वकील. | वकीलीण, वकिलीण. |
| गरूड. | गरूडीण, गरुडीण. | फडनीस. | फडनीशीण, फडनिशीण. |
| फकीर. | फकीरीण. फकिरीण. | रजपूत. | रजपूतीण, रजपुतीण. |
| अमीर. | अमीरीण, अमिरीण. | गाडगीळ. | गाडगीळीण, गाडगिळीण. |

**१२० असेंच जर ते उपांत्य स्वर हकारयुक्त असले तर त्यांसहि वर सांगितलाच नियम लागतो; जसें—**

३०० तो, ती, तें, या सर्वनामांचीं विभक्तिरूपें चालवून दाखवितों.

### तो.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | तो. | ते. |
| द्वि० | त्याला, त्याजला, त्यास, त्यातें. | त्यांना, त्यांला, त्यांजला, त्यांस, त्यांतें. |
| तृ० | त्याणें, त्यानें, त्याशीं, त्याजशीं. | त्यांहीं, त्यांनीं, त्यांशीं, त्यांजशीं. |
| च० | ( द्वितीये प्रमाणें ). | |
| पं० | त्याहून, त्याजहून, त्याच्याहून. | त्यांहून, त्यांजहून, त्यांच्याहून. |
| ष० | त्याचा-ची-चें. | त्यांचा-ची-चें. |
| स० | त्यांत, त्याच्यांत. | त्यांत, त्यांच्यांत. |
| वि०सा० | त्या. | त्या, त्यां. |

### ती.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | ती. | त्या. |
| द्वि० | तिला, तीस, तिजला, तितें. | त्यांना, त्यांला, त्यांजला, त्यांस, त्यांतें. |
| तृ० | तिणें, तिनें, तिशीं, तिजशीं, तिच्याशीं. | त्यांहीं, त्यांनीं, त्यांशीं. त्यांजशीं, त्यांच्याशीं. |
| च० | ( द्वितीये प्रमाणें ). | |
| पं० | तिहून, तिजहून, तिच्याहून. | त्यांहून, त्यांजहून, त्यांच्याहून. |
| ष० | तिचा-ची-चें. | त्यांचा-ची-चें. |
| स० | तींत, तिच्यांत. | त्यांत, त्यांच्यांत. |
| वि०सा० | त्या. | त्या, त्यां. |

३०१ तें या पुरुषवाचक सर्वनामांचीं विभक्तींचीं रूपें प्रथमे शिवाय पुल्लिंगा प्रमाणें होतात.

३०२ **तो**, **हा** आणि **जो**, या सर्वनामां पुढें तृतीया संबंधी **नें** आणि **नीं** यांस विकल्पें **णें** आणि **णीं** आदेश होतात; जसें—**त्याणें**, **तिणें**, **याणें**, **इणें**, **ज्याणें**, **जिणें**, **त्यांणीं**, **यांणीं**, इ०.

बहुतेकांचें असें मत आहे कीं या तीन शब्दां पुढेंच हा तृतीयेचा अपवाद कांहीं इष्ट नाहीं; **त्यानें**, **यानें**, **इनें**, **ज्यांनीं**, इ० अशीं रूपें लिहावीं; व या प्रमाणें बोलण्याची प्रवृत्तिही देशस्थ लोकां मध्यें आहे. त्यास मलाही हें मत पहिल्या दृष्टीस ग्राह्य दिसतें, कांकिं लोकव्यवहारा वरून, व्याकरणा वरून, आणि प्राचीन ग्रंथां वरून पाहिलें असतां **नें** आणि **नीं** यांच्या स्थानीं जो **णें** आणि **णीं** आदेश होतो हा कांहींसा व्यभिचार होय. तथापि अलिकडेस या वैकल्पिक रूपांची पुणेंप्रांतीं व साऱ्या कोंकणांत प्रवृत्ति विशेष झाली आहे, आणि हीं जीं मूळचीं रूपें तीं बहुधा अक्षरशत्रु अशा गंगथड्यांच्याच मुखांतून येतात, ह्मणोन त्यां वर अलीकडेस निंद्यपणाची छाया आली आहे. त्यांत आणखी जर कुलीन व प्रतिष्ठित अशा नागरिक लोकांचा वाग्व्यवहार सोडून केवळ व्याकरणनियमासच अनुसरलें, तर जसें **नें**च्या स्थानीं **णें** आदेश करणें हा व्यभिचार त्याज्य, तसाच **हा**, **ही**, यांच्या स्थानीं **या**, **ई**, हा आदेशही त्याज्य होय; (कोंकणांत **ह्यास**, **ह्याणें**, इ० रीतीनें बोलण्याची प्रवृत्ति विशेष आहे) अतएव **ह्यानें**, **हिनें**, **ह्यांनीं**, अशीं रूपें लिहिणें प्राप्त होईल. ह्मणोन मला वाटतें एथें लोकव्यवहारास अनुसरून **याणें**, **इणें**, इ० रूपांचें ग्रहण करणें प्रशस्त दिसतें. कित्येक प्रसंगीं सर्वमान्य अशा लोकव्यवहारासच अनुसरलें पाहिजे. नाहींतर राजापूरप्रांतीं **मस**, **तूस**, तसें मुंबईंत कित्येक जातीच्या

लोकांच्या बोलण्यांत **मिनें, तुनें,** इ० रूपें आढळतात; हीं व्याकरणदृष्ट्या शुद्ध होत; मग यांचें ग्रहण कां करूं नये? तेव्हां ज्या कारणा स्तव यांचें ग्रहण प्रशस्त दिसत नाहीं, त्याच कारणा स्तव **त्यानें, हिनें, त्यांनीं,** यांचेंही ग्रहण प्रशस्त दिसत नाहीं.

**तो, हा, जो, तें, हें, जें,** यांचीं काव्यांत आणि प्रौढ लिहिण्यांत व भाषणांत तृतीयेचीं एकवचनीं **तेणेंकरून, येणेंकरून, जेणेंकरून**; आणि अनेकवचनीं-**त्यांहींकरून** अ० **तिहींकरून, यांहींकरून** अ० **इहींकरून; ज्यांहींकरून,** अ० **जिहींकरून;** अशीं रूपेंहि बहुत आढळतात.

३०३ **म्यां, त्वां,** हीं जीं **मीं,** आणि **तूं,** या शब्दांचीं तृतीयेचीं रूपें, त्यांचा प्रयोग देशस्थां मध्यें फार आढळतो. व्याकरणरीतीनें पाहिलें असतां जसें **तो** या सर्वनामाचें **त्याणें** हें तृतीयेचें रूप होतें, तशीं **मीं,** आणि **तूं,** या सर्वनामांचींही तृतीयेचीं निराळीं रूपें असावीं, व या प्रमाणें सर्वांच्या बोलण्यांत आलें असतां फार बरें आहे; परंतु महाराष्ट्रदेशरूप वर्तुळाचा मध्यबिंदु जें पुणें त्यांत व सारा कोंकणप्रांत यांत **मीं, तूं,** या सर्वनामांचीं तृतीयेचीं रूपें फिरत नाहींत, ह्मणोन म्यां या व्याकरणांत त्याच रीतीस अनुसरून **मीं, तूं,** या तृतीयेच्या रूपांस पाहिलें स्थान दिलें आहे.

वरकड **म्यां, त्वां,** या रूपांचा प्रचार या प्रांतीं बोलण्यांत तर एव्हां पडावयाचा नाहीं, परंतु लिहिण्यांत तरीं पडावा अशी माझी इच्छा आहे.

राजापुरप्रांतीं विशेषेंकरून कऱ्हाडे ब्राह्मणांत **मस, मज, तूस, तूज, मांत, तूंत** इ०; व घांटी लोक **मजपासून, तूजपासून,** यांचा अपभ्रंश करून **मपासून, मपून, तुपासून, तुपून,** असें बोलतात, तसेंच मुंबईंत कित्येक जातींचे लोक,

माला, मिनीं, मिजून, तुनीं, तुजून, त्याजून, तिजून, असें बोलतात. परंतु आता आपणास भरंवसा आहे कीं जीं मुलें व्याकरण शिकतात, व पुढें शिकूं लागतील, त्यांस असल्या शंभर तऱ्हा टाकून सर्वत्र प्रसिद्ध, व कुलीन आणि विद्वान् ज्या रीतीनें भाषण करितात, अशी एकच रीत सर्वांहीं घ्यावी हें चांगलें दिसेल.

---

## वर्ग २.

### दर्शक सर्वनाम.

३०४ **तो** आणि **हा** हीं दर्शक सर्वनामें होत; जसें–'तो मनुष्य चालतो आहे त्याला बलावा,' 'हा घोडा चांगला आहे', अशा स्थळीं ज्या नामांच्या मागें हीं सर्वनामें लागतात तीं या सर्वनामांनीं दाखविलीं जातात; ह्मणोन यांस **दर्शक** सर्वनामें ह्मणतात.

३०५ यांचीं वचनें आणि लिंगें पूर्वीं पुरुषवाचक सर्वनामप्रकरणीं दाखविलीं आहेत.

३०६ **हा** याचा प्रयोग जवळचे पदार्थ दाखवायाचे असतां करितात; व **तो** याचा प्रयोग दूरचे पदार्थ दाखवायाचे असतां करितात.

**तो** या सर्वनामास मागें पुरुषसर्वनामप्रकरणीं विभक्ति लावून दाखविल्या आहेत.

३०७ **हा**, **हें**, आणि **ही**, या दर्शक सर्वनामांस प्रथमे शिवाय इतर विभक्ति असतां **या** आणि **इ** हे आदेश होतात. यांस विभक्ति लावून दाखवितों.

**हा.**

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | हा. | हे. |

| | | |
|---|---|---|
| द्वि० | याला, यांजला, यास, यातें. | यांनां, यांला, यांजला, यांस, यांतें. |
| तृ० | याणें, यानें, याशीं, याजशीं, याच्याशीं. | यांहीं, यांणीं, यांनीं, यांशीं, यांजशीं, यांच्यांशीं |
| च० | ( द्वितीये प्रमाणें ) | |
| पं० | याहून, याजहून, याच्याहून. | यांहून, यांजहून, यांच्याहून. |
| ष० | याचा-ची-चें. | यांचा-ची-चें. |
| स० | यांत, याच्यांत. | यांत, यांच्यांत. |
| वी० सा० | या. | या, यां. |

ही.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | ही. | या, ह्या. |
| द्वि० | ईस, इला, इजला, इतें. | —— |
| तृ० | इणें, इशीं, इजशीं, इच्याशीं. | —— |
| च० | ( द्वितीये प्रमाणें ). | —— |
| पं० | इहून, इजहून, इच्याहून. | —— |
| ष० | इचा-ची-चें. | —— |
| स० | ईत, इच्यांत. | —— |
| वि० सा० | या. | —— |

स्त्रीलिंगीं अनेकवचनाचीं रूपें पुल्लिंगाच्या अनेकवचनांच्या रूपां प्रमाणें जाणावीं.

नपुंसकाचीं रूपें प्रथमा रहित करून पुल्लिंगा प्रमाणें होतात.

३०८ यांत हा, हें आणि ही, यांच्या स्थानीं **या**, आणि इ, हे जे आदेश होतात ते विकल्पें होतात, असें जाणिलें पाहिजे; **ह्याणें**, **हिणें**, हिचा, ह्याला, इ० अशींही रूपें अलीकडेस बरींच आढळूं लागलीं आहेत परंतु अशीं

रूपांची प्रवृत्ति केवळ कोंकणांतच आहे, ह्मणोन हीं एकदेशीय रूपें विशेष ग्राह्य नसावीं.

३०९ **आह्मीं, तुह्मीं.** यांचीं रूपें वर्ज करून पुरुषवाचक सर्वनामें, आणि **हा** व **तो** हीं दर्शक सर्वनामें, याचें सामान्यरूप आणि विभक्तिप्रत्यय यांच्या मध्यें **ज** हें विकरण उत्पन्न होतें; अथवा केव्हां षष्ठीच्या सामान्यरूपांस पुढें विभक्तिप्रत्यय लावितात. हें जेथें अगत्य पडेल तेथेंच केलें पाहिजे; या पेक्षां सर्वनामा पुढें जर नुसता विभक्तिप्रत्यय लागत असला तर त्या रूपाचें सर्वांहीं ग्रहण करणें माझ्या बुद्धीस अधिक योग्य दिसतें. **मजहून, माझ्याहून, तुजहून, तुझ्याहून,** अशा ठिकाणीं त्या विकरणा वांचून निर्वाह होत नाहीं; परंतु **त्याजला** या पेक्षां **त्याला** हें रूप ग्रहण करणें अधिक योग्य आहे. तथापि या अशा रूपांचा पृथक् संज्ञानिर्देश कर्तव्य असतां हीं त्या त्या विभक्तींचीं **सविकरण** रूपें ह्मणावीं; जसें **मजला** हें सविकरण द्वितीयेचें रूप; तसें **मज, तूज,** इ० हीं सविकरण सामान्यरूपें ह्मणावीं.

३१० आतां वर सांगितल्या दर्शक सर्वनामां शिवाय **इतका, इतकाला, तितका, तितकाला, एवढा, एवढाला, तेवढा, तेवढाला, असा, असला, असलाला, तसा, तसला, तसलाला,** व यांचीं लिंगवचनेंकरून जीं जीं रूपें होतात, तीं दर्शक सर्वनामें होत. हीं सर्वनामें पुल्लिंगीं **आंबा** शब्दा सारखीं चालतात, व स्त्रीलिंगीं **काठी** शब्दा प्रमाणें, व नपुंसकीं प्रथमा वर्ज करून पुल्लिंगा प्रमाणें चालतात.

३११ हीं जीं वर दर्शक सर्वनामें सांगितलीं त्यांत सर्वनामांचें लक्षण असून आणखी विशेषणांचेंही लक्षण

असतें, ह्मणून व्याकरणपदच्छेद करितेवेळेस कांहीं अडचण पडूं नये या करतां पुढें विशेष्याचा योग असतां हीं विशेषणें मानावीं, आणि तो योग नसतां सर्वनामें मानावीं ह्मणजे बरें.

३१२ प्रकार, स्वभाव, जाति, असे गुण दाखवायाचे असतां—**असा**, **तसा**, **कसा**, अशा सकारान्त सर्वनामांचा प्रयोग होतो; आणि कधीं कधीं त्यास स्वार्थी **ला** प्रत्यय लागतो. जसें—**असला**, **तसला**, **कसला**; उदाह०— '**असा** किं० **असला** चाकर तुला मिळायाचा नाहीं,' '**तसें** अ० **तसलें** बिऱ्हाड सोडूं नको,' '**ती कशी** अ० **कसली** गुणाची मुलगी होती,' इ०.

यांत हा स्वार्थी **ला** प्रत्यय कोंकणांत विशेष आढळतो. त्यांत आणखी **जसें** यास हा **ला** प्रत्यय लागतो फारच विरळा आढळतो.

३१३ **असा** या दर्शक सर्वनामाचीं विभक्तींचीं रूपें चालवून दाखवितों.

| **विभ०** | **एकव०** | **अनेकव०** |
|---|---|---|
| **प्र०** | असा. | असे. |
| **द्वि०** | अशाला-स. | अशांना-ला-स. |
| **तृ०** | अशानें-शीं. | अशांहीं.नीं-शीं. |
| **वि० सा०** | अशा. | अशां. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—**तसा**, **कसा**, **जसा**, **तसतसा**, **जसजसा**, इ०, या सर्वनामांचीं रूपें जाणावीं.

३१४ **कसा** याचें षष्ठीच्या योगानें विकल्पें पहिल्या प्रकारा प्रमाणें रूप होतें; जसें—कशाचा, कसचा; कशाची, कसची; कशाचें, कसचें.

## स्त्रीलिंग.

### अशी.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | अशी. | अश्या. |
| द्वि० | अशीला-स. | अश्यांना-ला-स. |
| तृ० | अशीनें-शीं. | अश्यांहीं-नीं-शीं. |
| वि० सा० | अशा. | अश्यां. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—तशी, कशी, जशी, तसतशी, जसजशी, इ० यांचीं रूपें जाणावीं.

असें, तसें, कसें, जसें, यांचीं प्रथमे शिवाय पुल्लिंगा प्रमाणें रूपें जाणावीं.

**असला, असलाला; तितका, तितकाला; तसला, तसलाला;** इत्यादि यांत बारीक अर्थभेद आहे तो असा कीं, **असला, तसला, तितकाला, इतकाला,** इ० हीं सर्वनामें एका वस्तूस लागतात; व **असलाला, तसलाला,** हीं समुदायांतून एक एकास, **असला, तसला, इतका, तितका,** इ० यांचा प्रयोग करून प्रकार दाखवायाचा असतां लागतात; जसें—'असलाला आंबा,' 'तसलाल्या डब्या' 'इतकाले पुरुष,' 'तितकाल्या पोरी'. एथें इतकाला, तितकाला, इत्यादि स्थळीं तो तो पदार्थ एक एक दाखविला जातो असा अर्थ होतो.

२१९ **इतका, तितका,** इ० आकारान्त सर्वनामांचीं विशेषणसामान्यरूपें आणखी **इतके, तितके,** अ० **इतक्या, तितक्या,** अशींही आढळतात; परंतु यांत ग्राह्य कोणतीं याचा निश्चय विशेषणप्रकरणीं केला आहे तो पहावा.

---

## वर्ग ३.

### संबंधी सर्वनाम.

३१६ **जो, जसा, जसला, जसलाला, जितका, जितकाला, जेवढा, जेवढाला,** हीं संबंधी सर्वनामें होत; कारण, हीं जेव्हां वाक्यांत असतात, तेव्हां निरंतर तज्जातीय दर्शक सर्वनामांशीं लिंगवचनविभक्तीच्या अनुरोधानें संबंध दाखवून जोडलींच असतात; ह्मणोन यांस परस्परनित्यसंबंधार्थी सर्वनामें असें ह्मटलें असतां साजेल. ज्या नामाशीं या सर्वनामांचा संबंध असतो तें त्यांचें **संबंधी** ह्मणावें; यांचीं उदाहरणं सांगतों. '**जो** चोरी करितो **तो** दंड पावतो,' '**जिला** काल स्वयंपाकास बलाविलेंस **तिला** आज बलाव,' '**जें** पाहावें **तें** लबाड,' '**जसें** करावें **तसें** भोगावें,' **जितकें** शिकवावें **तितकें** निष्फल,' या गांवांत **जेवढें ज्यास** द्यावें **तेवढें त्यास** थोडेंच वाटतें,' इ०. 'जो मनुष्य लबाडी बोलतो **तो** फसतो,' या वाक्यांत **मनुष्य** हें **जो** याचें संबंधी जाणावें; आणि **जो** या संबंधीसर्वनामाचें **तो** हें प्रतिसंबंधी दर्शक सर्वनाम, असें जाणावें.

३१७ **जो, जी, जें,** यांस विभक्ति लावून दाखवितों.

| **विभ०** | **एकव०** | **अनेकव०** |
|---|---|---|
| **प्र०** | जो० | जे, जे. |
| **द्वि०** | ज्याला-स-तें | ज्यांना-ला-स-तें. |
| **तृ०** | ज्याणें, ज्यानें, ज्याशीं, ज्याजशीं, ज्याच्याशीं, जेणें. | ज्यांणीं, ज्यानीं, ज्यांहीं, ज्यांशीं, ज्यांजशीं, ज्यांच्याशीं, जिहीं. |

**च०** (**द्वितीये प्रमाणें**).

| | | |
|---|---|---|
| पं० | ज्याहून, ज्याजहून, ज्याच्याहून. | ज्यांहून, ज्यांजहून. ज्यांच्याहून. |
| ष० | ज्याचा-ची-चें | ज्यांचा, ज्यांची, ज्यांचें. |
| स० | ज्यांत, ज्याच्यांत. | ज्यांत, ज्यांच्यांत. |
| वि० सा० | ज्या. | ज्या, ज्यां. |

विकल्पें **जाला, जाणें, जाहून, जाचा, जांत, जांनां, जांहीं, जांहून, जांचा, जांत,** इ० अशींहि रूपें लिहिण्यांत आढळतात. या रूपांचें उपपादन, पृ० १०६, नि० २७३, यांत सविस्तर केलें आहे. त्या वरून तर हींच रूपें विशेष ग्राह्य होतात. परंतु अलीकडेस ठशानें छापणें वाढलें आहे, तेव्हां **य** जोडून रूपें लिहिण्याचा प्रघात अधिक पडत चालला आहे म्हणून अशीं रूपें एथें घेतलीं आहेत.

स्त्रीलिंग.

जी.

| विभ० | एकव० | अनेक० |
|---|---|---|
| प्र० | जी. | ज्या. |
| द्वि० | जिला, जिजला, जीस, जितें. | — |
| तृ० | जिणें, जिनें, जिशीं, जिजशीं, जिच्याशीं. | — |
| च० | ( द्वितीये प्रमाणें ) | — |
| पं० | जिहून, जिजहून जिच्याहून. | — |
| ष० | जिचा—ची—चें. | — |
| सं० | जींत, जिच्यांत. | — |
| वि० सा० | ज्या. | ज्या, ज्यां. |

अनेकवचनांचीं रूपें पुल्लिंगाच्या अनेकवचनाच्या रूपां प्रमाणें जाणावीं.

जें याचीं रूपें पुंल्लिंग **जो** याच्या रूपां सारखीं जाणावीं.

# वर्ग ४.

## प्रश्नार्थक सर्वनाम.

३१८ **प्रश्नार्थक** सर्वनामें ह्मणजे प्रश्न करायाचा असतां ज्या सर्वनामांचा प्रयोग करितात तीं; जसें—**कोण, कोणता, कोणचा, काय कसा, केवढा, कितका, किती, कितीक** इ०.

३१९ **कितीक** हें प्रश्नार्थक, आणि **कित्येक** हें सामान्य सर्वनाम असा भेद जाणावा.

**कितीक, कित्येक,** आणि **कितीएक**, अशा तीन प्रकारें हा शब्द लिहितात. हा शब्द **किती** आणि **एक** हे दोन शब्द मिळून झाला आहे. या शब्दां वर स्वारस्य ठेवून बोलवयाचें असतां हे शब्द निराळे करून **कितीएक** असें लिहावें; नाहीं तर **कित्येक** असें लिहावें.

३२० **कोण** हें सर्वनाम मनुष्यास लागतें, व **काय** हें वस्तूस लागतें.

**कोण** याच्या प्रयोगा विषयीं हा वर नियम सांगितला परंतु कधीं कधीं तो नियम राहत नाहीं; जसें—'ही कोण वस्तु आहे'; परंतु या पेक्षां 'ही काय वस्तु आहे' हें शुद्ध. क्वचित् विलक्षण प्रकार दाखवायाचा असतां **कोण, काय,** यांच्या जागीं **काय, कोण** यांचा, उलट प्रयोग करितात' उ० 'काय हो मनुष्य हा'! 'कोण हो तांदूळ हे'! एथें कोणत्या विलक्षण प्रकारचा हा मनुष्य किंवा हे तांदूळ, असा अर्थ.

**कोण** या सर्वनामास विभक्ति लावून दाखवितों.

### कोण.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | कोण. | कोण. |
| द्वि० | कोणाला-स. | कोणांस-ला-तें. |

| | | |
|---|---|---|
| तृ० | कोणीं, कोणें, कोणाशीं. | कोणीं, कोणांशीं. |
| च० | ( द्वितीये प्रमाणें ). | |
| पं० | कोणाहून. | कोणांहून. |
| ष० | कोणाचा-ची-चें. | कोणांचा-ची-चें. |
| स० | कोणांत, कोणाच्यांत. | कोणांत, कोणांच्यांत. |

वि० सा० कोणा, कोणे, कोण्या.

३२१ **कोण** आणि **कोणता** यांत अर्थभेद इतका कीं एकजातीय अशीं अनेक मनुष्यें अथवा वस्तु असल्या, आणि त्यांतून एकास **कोण** अथवा **काय** हें सर्वनाम लावून,प्रश्न करायाचा असला, तर **कोणता**, **कोणती**, **कोणतें**, हीं सर्वनामें, जसें लिंग, वचन, असेल त्या प्रमाणें लागतात; जसें—'यांतून तुला **कोणता** आंबा पाहिजे;' परंतु जर ती मंडळी, किंवा तो समुदाय, अनेक प्रकारच्या मनुष्यांनी अथवा अनेक जातीच्या पदार्थांनीं मिश्रित असला, तर मनुष्यवाचकांस **कोण** अ० **कोणतें** हें, इतर प्राण्यांस **कोणतें**, आणि वस्तुमात्रांस **काय**, हीं सर्वनामें लागतात; जसें—'या मंडळींत **कोण** सुंदर आहे'? 'या घोड्यां मध्यें **कोणता** चांगला आहे?' 'त्यांतून तुला **काय** पाहिजे'? इ०.

वस्तु मात्रांसही **काय** आणि **कोणतें** हे दोन्ही शब्द लागतात;परंतु यांत सूक्ष्मभेद असा आहे कीं **काय** हें सामान्यतः अनेक जातीच्या अथवा अनेक प्रकारच्या वस्तूंत कोणत्याही एका अनियमित वस्तूस लागतें; आणि **कोणतें** हें ज्या निवडून ठेविलेल्या अनेक वस्तु त्यांतून नियमित एकीस लागतें. उदाह०—'या एथें पुष्कळ जिनसा आहेत, त्यांतून त्याला काय पाहिजे,' 'हे एथें दहा पेन आहेत त्यांतून तुला कोणता पाहिजे तो घे,' 'तुला

काय पुसायाचें तें पूस' 'आणि तुला कोणतें पुसायाचें तें पूस,' या दोन वाक्यांत पहिल्यांत अनियमपूर्वक आणि दुसऱ्यांत नियमपूर्वक प्रश्न आहे असें समजावें.

३२२ **कोणता, कोणचा**, यांचीं विशेषणसामान्यरूपें **कोणत्या, कोणच्या**, अशीं जाणावीं; जसें– '**कोणत्या** घोड्यानें तुला लात मारिली,' '**कोणच्या** माणसापासून हें असें क्रूर कर्म घडलें,' 'हें **कोणत्या** झाडाचें रेडूं,' '**कोणच्या** देवाला मी भजूं'? इ०.

३२३ **काय** या सर्वनामाचीं विभक्तींचीं रूपें **कसा** या सर्वनामाच्या विभक्तीच्या रूपां प्रमाणें होतात; तीं दाखवितों.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | काय. | काय. |
| द्वि० | कशाला-स-तें. | कशांनां-ला-स. |
| तृ० | कशानें-शीं. | कशांनीं-हीं-शीं. |
| च० | कशास-ला. | कशांस-नां-ला. |
| पं० | कशाहून | कशांहून. |
| ष० | कशाचा-कसचा-ची-चें. | कशांचा-ची-चें. |
| स० | कशांत. | कशांत. |
| वि०सा० | कशा. | कशां. |

विचारपूर्वक पाहिलें असतां हीं **काय** या सर्वनामाचीं रूपें होत, आणि **कसा** या सर्वनामाचींहि रूपें होत; जेव्हां **काय** यास विभक्ति लावण्याचें अगत्य पडतें, तेव्हां **कसा** याच्या रूपांचा प्रयोग करण्यांत येतो; जसें-' अहो पंतोजी, तुम्हीं या मुलाला **कशानें** मारिलें' म्हणजे काय वस्तूनें मारिलें, कोणत्या वस्तूनें मारिलें, असा अर्थ; 'त्याची कीर्ति **कशानें** झाली,' म्हणजे कोणत्या कर्मानें झाली, अथवा कशा प्रकारें झाली, 'हें लाकूड **कशाचें**, अ० **कसचें**, म्हणजे कोणत्या झाडाचें असा अर्थ.

३२४ केव्हां केव्हां **काय** याचा शुद्ध अव्यया प्रमाणें प्रयोग होतो; जसें—'तूं ही पोथी लिहिलीस **काय**,' 'तो **काय** मनुष्य आहे, पशु तसा पशु,' या वाक्यांत हें अव्यय जाणावें.

३२५ **प्रश्न** करायाचा असतां **काय** या अव्ययाचा प्रयोग निरंतर वाक्याच्या शेवटीं क्रियापदा नंतर होत असतो; जसें- 'तूं जातोस काय?' 'ही अशी सुंदर पोथी त्याणें लिहिली काय?' इ०.

३२६ **केवढा, कितका,** यांहींकरून पदार्थांचें महत्व अथवा मान दाखविलें जातें; यांचीं आकारान्त नामां प्रमाणें लिंगें, वचनें, आणि विभक्तींचीं रूपें होतात.

३२७ **किती, कितीक,** यांहींकरून संख्या दर्शविली जात्ये. **किती** या सर्वनामास विभक्ति लागत नाहींत; **कितीक** यास लागतात; जसें—'**कितीकांनीं** हें काम केलें,' अथवा, 'किती जणांनीं हें काम केलें?' यांचीं सामान्यरूपें **किती** आणि **कितीक** जाणावीं. जसें–'हें काम **किती** माणसांनीं अ० **कितीक** माणसांनीं मिळून केलें?'

**किती** यास विभक्तिप्रत्यय लावायाचे असतां पुल्लिंगीं, आणि स्त्रीलिंगीं **जण, जणी,** (जन याचा अपभ्रंश) हे शब्द त्याच्या पुढें जोडून मग त्या संयुक्तशब्दास ते प्रत्यय लावावे; उदाह०— 'किती जणांनीं मिळून हें काम केलें.' 'किती जणींनीं हें दळण दळिलें' इ०.

या वरून पाहता **किती** हें केवळ विशेषण होय, आणि **कितीक** हें सर्वनाम होय. लिंगभेदेंकरून याचीं **कितका, कितकी, कितकें,** अशींही रूपें होतात.

# वर्ग ५.

## सामान्य सर्वनाम.

३२८ सामान्य सर्वनामें ह्मणजे ज्या सर्वनामांचा अर्थ सामान्येंकरून असतो तीं; जसें—**कोण, कोणी, काय, अमुक, अमका, फलाणा, आपण, सर्व, अवघा, मगळा, भलता, भलतसा, कांहीं, कसा, स्वतां, एक, एकमेक, हरएक, हरकोणी, कईक,** अ० **कैक, वरकड, परस्पर, अन्योन्य** इ०.

३२९ **कोणी** या सर्वनामाचें विशेषणसामान्यरूप **कोण्या** असें जाणावें. उदाह०—'**कोण्या** पशूचा स्वभाव कसा असतो, आणि **कोण्या** पशूचा कसा असतो.' '**कोण्या** पाखराचा रंग काळा असतो, आणि **कोण्या** पाखराचा शुभ्र,' '**कोण्या** गाईला दूध फार असतें. आणि **कोण्या** गाईला थोडें.'

**कोण** आणि **कोणी** या शब्दांच्या विशेषणसामान्यरूपाविषयीं या भाषेत फार गोंधळ झाला आहे. प्रथम तर मला असें दिसतें कीं **कोण** हेंच मुख्य सामान्य सर्वनाम होय; आणि त्याचा सामान्येंकरून अर्थ असतां **कोणी** हें प्रथमेचें रूप होतें; कारण, **कोणी** हें जर पृथक् सामान्य सर्वनाम मानलें, तर यास विभक्तीच लागत नाहींत. **कोण** या सर्वनामाचीं जीं विभक्तींचीं रूपें तींच **कोणी** याचीं विभक्तीचीं रूपें मानणें प्राप्त होतें. त्यापक्षीं **कोणी** हें मुख्य सर्वनाम नव्हे; आतां–' जातीनें ब्राह्मण किंवा महार कोण कां असेना, ईश्वरास सर्व समान,' 'हें काम कोण कां करीनात, काम झालें ह्मणजे पुरे,' असा प्रथमेचा प्रयोग आढळतो; परंतु या पेक्षां–'कोणी कां असेना,' 'कोणी कां करीनात,' असा प्रयोगाचा विशेष प्रचार आहे ही गोष्ट केवळ निर्विवाद आहे; ह्मणून **कोण**, याचा सामान्येंकरून अर्थ

असतां **कोणी** असें प्रथमेचें व तृतीयेचें मात्र रूप होतें असें समजावें. अथवा **कोणी** हें पृथक् सर्वनाम मानून त्याचीं **कोण** शब्दा सारखीं विभक्तिचीं रूपें मानलीं, तथापि कांहीं मोठा दोष येतो असें नाहीं. आतां **कोण** आणि **कोणी** यांचे विशेषण-सामान्यरूप अनेक प्रकारचें आढळतें—**कोणा, काणे, कोण्या,** अशीं तीन प्रकारचीं विशेषणसामान्यरूपें आढळतात; जसें—'**कोणा** पशूंचा स्वभाव कसा असतो, **कोणे** पशूंचा स्वभाव कसा असतो, आणि **कोण्या** पशूंचा स्वभाव कसा असतो,' यांत पृ० ७०, नि० १८८, या नियमा प्रमाणें पाहिलें असतां **कोणा** हेंच विशेषणसामान्य रूप प्रशस्त होय; तथापि स्त्रीलिंगीं व बहुधा पुल्लिंगींहि याचा प्रचार फारसा नाहीं; '**कोणा** बायकोला तोरा फार असतो, आणि **कोणा** बायकोचा स्वभाव भोळा असतो,' असें फारसें कोणी बोलत नाहीं.' **कोण्या** बायकोला इ०' असें बोलण्याचा प्रघात फार आहे; म्हणून एकदेशीय, आणि रूढि आणि व्याकरण हीं दोन्हीं ज्यास अनुकूळ, असें **कोणा,** आणि ज्याची रूढिच फार आहे असें **कोण्या,** हीं दोन्ही **कोण** याचीं विशेषणसामान्यरूपें ठरविणें एथें भागास येतें.

३३० **कोण** याज वर नेट देऊन बोलायाचें असतां विकल्पें-**कोण्ही, कोण्हास, कोण्हाहून,** अशीं रूपें होतात; जसें—'तेथें कोण्ही नाहीं', ह्मणजे 'कोणीही अ० कोणी एक नाहीं,' असा अर्थ. अशा ठिकाणीं **कोण्ही** हें सामान्य सर्वनाम मानावें.

याचाच अपभ्रंश होऊन वर सांगितलें **कोणी** हें सामान्य-सर्वनाम मुळीं घडलें असावें असें बारीक दृष्टीनें दिसतें.

३३१ **अमुक**—कोणा एका मनुष्याचा अथवा वस्तूचा सामान्यरूपेंकरून निर्देश करायाचा असतां या सर्वनामाचा प्रयोग करितात; जसें—**अमुक** असें बोलतो,"अ-

मुक तसें करित्ये' इ० अमुक याचें सामान्यरूप अमका होतें; जसें—अमुकांनां, अमुकांहीं, इ०. याचें विशेषणसामान्यरूप अमुक असेंच होतें; जसें—अमुक गृहस्थानें मला सांगितलें', इ०.

याचा जर विशेषणा प्रमाणें प्रयोग केला, तर लिंगवचनंपरत्वें-**अमका, अमकी, अमकें, अमके, अमक्या, अमकी,** इ०. अशीं रूपें होतात; जसें—'मला अमका भेटला, अमकी असें बोलली, अमक्यांनीं अमकें जेवूं घातलें,' इ०.

३३२ **अमका अमकी** याचीं सामान्यरूपें अनुक्रमानें **अमक्या, अमकी,** अशीं होतात; जसें—**अमक्यानें, अमकीनें, अमक्याचा,** इ०. 'अमक्या ब्राह्मणानें अमक्या क्षेत्रीं यज्ञ केला,' 'अमकी बाई अमक्या बाईकडेस स्वयंपाकास गेली.'

३३३ याच प्रमाणें **अमुक, अमका,** यांचीं अनुगामी व अन्योन्याश्रयी **तमुक,** आणि **तमका,** हीं सर्वनामें होत; जसें—'या रामाची रात्रंदिवस घिसघीस, **अमुक** मला असें बोलतो आणि **तमुक** तसें करितो,' '**अमक्यानें** रांधिलें आणि **तमक्यानें** खालें,' '**अमकी** असें करित्ये आणि **तमकी** असें पाहत्ये' इ०. **तमुक, तमका,** यांचा नुसता प्रयोग बहुधा कोणी करित नाहीं.

३३४ केव्हां केव्हां हे दोन्ही शब्द एकत्र जोडून **अमुक तमुक, अमका तमका,** अशीं संयुक्त सामान्यसर्वनामेंहि होतात; जसें—'घरांत **अमुक तमुक** जिन्नस लागेल तो कोण आणील?' परंतु यास विभक्ति लागल्या असतां उभय पदांसहि विशेषणसामान्यरूप होतें; जसें—'**अमक्या तमक्यानें** येऊन घरांत काम केलें मग चाकर **ठेवण्याची काय गरज?'** इ०.

३३९ **आपण**, व लिंगवचनपरत्वें, **आपला**, **आपली**, **आपलें**, इ०.–या सामान्य सर्वनामांस विभक्ति लावून दाखवितों. **आपण** यास एकवचन नाहीं. **आपला** **आपली**, **आपलें**, यास अनेकवचन नाहीं.

**आपण.**

| विभ० | अनेकव० |
| --- | --- |
| प्र० | आपण. |
| द्वि० | आपणांला-स. |
| तृ० | आपण, आपणांहीं-शीं. |
| च० | आपणांला-स. |
| पं० | आपणांहून. |
| ष० | आपला-ली-लें. |
| स० | आपणांत. |
| वि० सा० | आपण, आपणा. |

**आपला, आपली, आपलें.**

| विभ० | एकव० |
| --- | --- |
| प्र० | आपला, आपली, आपलें. |
| द्वि० | आपल्यास,–ला. |
| तृ० | आपल्यानें-शीं. आपल्याच्यानें-शीं. |
| च० | ( द्वितीये प्रमाणें ). |
| पं० | आपल्याहून. |
| ष० | आपला-ली-लें. |
| स० | आपल्यांत. |
| वि० सा० | आपल्या. |

समयविशेषीं प्रथम, द्वितीय, आणि तृतीय पुरुषीं, आ-

दरार्थी बोलायाचें असतां, आणि केव्हां केव्हां स्वतांच्या अर्थी, **आपण** या सर्वनामाचा प्रयोग करितात. जसें-' **आपण** तेथें गेलों असतों, परंतु अलीकडेस त्या मंडळींत जाण्याची **आपली** शोभा नाहीं, '' **आपण** जर इतकें माझें कार्य क-राल, तर **आपणास** मोठें यश मिळेल, '' मग **आपण** निघून गेले. '' मीं आपण त्यास बोलवायास गेलों होतों.' ' त्यास सांगा कीं तुम्हीं आपला मुलगा तेथें पाठवा ' इ० स्थळीं इतरास वर्जून **आपण** याचा स्वतः असा अर्थ होतो.

**मीं** आणि **तूं** व **आह्मीं** आणि **तुह्मीं** मिळून, असा अर्थ असतांहि **आपण** या सर्वनामाचा प्रयोग करितात; जसें-' मीं दुजऱ्या व तूं मशालजी, पण **आपण** एका धण्याचे चाकर तर खरे, ' ' आह्मीं कारकून व तुह्मीं अम्मलदार, तरीं कचेरी बाहेर **आपण** सरकारची सारखी रयत ' इ०. अशा स्थळीं **आह्मीं** यांत केवळ प्रथम पुरुषाचेंच ग्रहण होतें, परंतु **आपण** यांत प्रथम आणि द्वितीय पुरुषाचें एकत्र ग्रहण होतें, इतका यांत अर्थभेद जाणला पाहिजे.

असा प्रयोग केला असतां यास क्वचित् एकवचनाचेहि विभ-क्तिप्रत्यय लागतात.

**आपला** याचा लिंगवचनपरत्वें केव्हां वाक्यपूरक अव्यया प्रमाणेंहि प्रयोग होतो; जसें-' मी **आपला** एथेंच बसेन त्यांत तुझें काय जातें, '' तो **आपला** गरीब, '' ती **आपली** कांहीं-तरी बोलत्ये, '' ते **आपले** उगीच बसतात, '' तीं **आपलीं** सालस माणसें, ' इ०.

**आपला, आपली, आपलें,** इ० हीं **आपण** या सामा-न्य सर्वनामाचीं षष्ठीचीं रूपें असून यांचा आणखी वक्त्याचें अंग, जात, अशा अर्थी एक निराळ्या प्रकारचा प्रयोग होत असतो, तो लक्षांत ठेवला पाहिजे. उदाहरण-' ती त्या घरांत आपली एकटी राहत्ये,' 'त्याणें अ० तिणें आपल्यास बांधून घेतलें,' इ०

३३६ **स्वतः** याचा अपभ्रंश होऊन **स्वतां**,–हें **रूप** होतें. तें केव्हां केव्हां सर्वनाम असतें, आणि केव्हां केव्हां अव्यय. जेव्हां सर्वनाम असतें तेव्हां यास विभक्ति लागतात; जसें–'हें मला स्वतांला पाहिजे,' 'ही माझी स्वतांची दौलत,' इ०. तृतीया विभक्तीचें निराळें रूप होत नाहीं. ह्मणोन ती असतां, **स्वतः** या अव्ययाचा प्रयोग करावा.

सर्वनाम असतां **स्वतां**, आणि अव्यय असतां किंवा तृतीया विभक्तीचे ठिकाणीं **स्वतः** अशीं निराळीं रूपें लिहावीं हें मला बरें दिसतें. कोणी प्रमादानें आणि दुर्लक्षानें **स्वतः** यास विभक्ति लावून **स्वतः**, **स्वतःला**, **स्वतःचें**,अशीं अपूर्व रीतीनें विसर्गासुद्धां रूपें लिहितात; परंतु हें केवळ अप्रशस्त.

३३७ **किती**, **कोण**, या सर्वनामांशीं आणि **दर**, **हर**, या अव्ययांशीं, **एक** हा शब्द जोडला असतां **कित्येक**, **कोणेक**, **दरेक**, **हरेक**, अशीं सामान्य सर्वनामें होतात. यांचीं विशेषणसामान्यरूपें **कित्येका**, **कोणेका**, **दरेका**, **हरेका**, अशीं होतात.

परंतु वक्त्याच्या मनांत जर अंमळ नेट देऊन बोलायाचें असलें, तर या शब्दांचें पृथक् उच्चारण करून पृथक् लिहिण्याचाहि परिपाठ आहे; जसें–**कितीएक**, **कोणीएक**, **हरएक**, आणि **दरएक**. आणि तसें नेट देऊन बोलायाचें असतां समयविशेषीं विभक्तींनीं पूर्व शब्दाचें विशेषणसामान्यरूप होतें; जसें–'**कोणाएकानें** मला येऊन सांगितलें कीं आतां मज जवळ पैका नाहीं ह्मणोन मला कोणीएक पुसत नाहींत,' 'इतकें गोपाळरावाचें कर्ज फिटलें ह्मणजे मग मला **कोण्याएकाचें** भय राहिलें नाहीं,' इ०

या सामान्य सर्वनामांमध्यें कित्येक सर्वनामांचा केवळ विशे-

पणा प्रमाणेंहि प्रयोग होतो, तेव्हां त्यांत **विशेषण सामान्य** सर्वनामें मानणें मला कांहीं अप्रशस्त दिसत नाहीं.

३३८ **एक**—जर **एक** हा शब्द समूह अथवा जाति यांचा वाचक असला तर त्यास सामान्य सर्वनामांत गणावें, तेव्हां त्याचा अनेकवचनींहि प्रयोग होतो; जसें—'**एक** असें ह्मणतो, आणि **एक** तसें ह्मणतो,' '**एक** ह्मणतात या शब्दाचें 'असें रूप लिहावें आणि **एक** ह्मणतात तसें,' 'ईश्वरानें जंगम प्राण्यां मध्येंहि भेद केले आहेत—**एक** पायांनीं चालतात, आणि **एक** पांखांनी उडतात,' इ०.

---

## विभाग ३.

### विशेषणविचार.

३३९ विशेषण ह्मणजे नामाच्या गुणाचा अथवा प्रकाराचा दर्शक जो शब्द तें; जसें—**बरा, शहाणा, मूर्ख, काळा, गोरा, आंधळा, लंगडा,** इ०.

३४० विशेषणांत मुख्य भेद दोन आहेत—एक **गुणविशेषण** आणि दुसरें **संख्याविशेषण**. वर सांगितलीं तीं गुणविशेषणें, आणि संख्यारूप प्रकाराचे वाचक जे शब्द तीं संख्याविशेषणें; जसें—**एक, दोन, पांच, दहा, शंभर,** इ०. हीं संख्याविशेषणें होत.

३४१ ज्या नामाचा गुण विशेषण दाखवितें, तें नाम त्या विशेषणाचें **विशेष्य** असें ह्मणतात. या वरून असें स्पष्ट होतें कीं विशेषण आणि विशेष्य यांचा नित्यसंबंध असतो, ह्मणजे जें विशेषण असतें त्याला विशेष्य असतेंच असतें. 'शहाणा मुलगा,' 'एथें **शहाणा** हें विशेषण मुलग्याचा गुण दाखवितें, ह्मणून **मुलगा** हें त्याचें विशेष्य होय.

३४२ नामास जशीं लिंगवचनादिकेंकरून कार्यें होतात, तशीं विशेषणासहि होतात.

३४३ या भाषेंत विशेष्याच्या' लिंगवचनाच्या अनुरोधानें विशेषणाचें रूप फिरतें.

## वर्ग १.

### गुणविशेषण.

३४४ अकारान्त विशेषणास लिंगाचीं कार्यें होत नाहींत, त्यांचीं तिन्हीं लिंगीं समान रूपें होतात; उदाहरण– तो पुरुष नष्ट, ती बायको नष्ट, तें पोर नष्ट इ०.

३४५ आकारान्त विशेषणांचा भरणा फार आहे, आणि त्याच्या आकाराच्या ठिकाणीं स्त्रीलिंगीं ई, आणि नपुंसकलिंगीं एँ, असे आदेश होतात; उदाहरण--**लंगडा** पुरुष, **लंगडी** गाय, **लंगडें** कुत्रें.

३४६ आकारान्त विशेषणा शिवाय दुसऱ्या विशेषणांस लिंगत्रयीं कांहीं विशेष होत नाहीं; जसें– सुंदर चित्र, तिखट भाजी, आंबट कढी, कडू भोंपळा, मऊ गोधडी, इ०.

३४७ यांचीं वचनें नामा प्रमाणें शब्दांच्या अंत्यस्वरां वरून होतात; जसें–तो **तांबडा**, ते **तांबडे**; **ती आंधळी**, त्या **आंधळ्या**; तें **लंगडें**, तीं **लंगडीं**; इ०.

३४८ महाराष्ट्र भाषेंत विशेषणाचा तारतम्यभाव असतां इतर भाषां प्रमाणें विशेषणास कांहीं विशेष होत नाहीं; ह्मणजे, अमुक अमक्या गुणानें दुसऱ्या पेक्षां, अथवा सर्वांपेक्षां, अधिक असा अर्थ असतां विशेषणास कांहीं विशेष कार्य होत नाहीं. परंतु क्वचित् संस्कृत शब्दांस त्या भाषेच्या नियमा प्रमाणें **तर** आणि **तम** हे प्र-

त्यय होऊन तदन्त शब्द प्राकृतांत आढळतात; जसें— पुण्य, पुण्यतर, पुण्यतम; विद्वान, विद्वत्तर, विद्वत्तम; लघु, लघुतर, लघुतम; इ०.

३४९ आकारान्त विशेषणाचें विशेष्य जर सविभक्तिक अथवा सशब्दयोगिक असलें, तर तें विशेषण न योजितां त्या विशेषणाचें जें सामान्यरूप तें योजिलें पाहिजे; जसें—'आंधळ्या माणसानें बहिऱ्या माणसास हांसूं नये.' 'चांगल्या प्रतिष्ठित गृहस्थानें हलक्या लोकांवर इतकें प्रेम ठेवूं नये', इत्यादि स्थळीं **माणसानें, माणसास,** या सविभक्तिक विशेष्याच्या योगानें **अधांळा, बहिरा,** या विशेषणाचीं **आंधळ्या, बहिऱ्या,** अशीं सामान्यरूपें प्रयोजिलीं जातात. तसेंच पुढल्या उदाहरणांत **लोक** या विशेष्या पुढें **वर** हें शब्दयोगी अव्यय आहे ह्मणून याच्या विशेषणाचेंहि सामान्यरूप झालें आहे.

३५० विकल्पें हें विशेषणाचें सामान्यरूप त्या विशेषणाच्या अंत्यास **ए** अथवा **ये** आदेश केल्यानेंहि सिद्ध होतें. 'आंधळ्या मनुष्यानें बहिरे मनुष्यांस हांसूं नये',' तांबड्ये चंद्रकळे वर हिरवे चोळीची शोभा विशेष,' इ०. परंतु यांत वरल्या नियमांत जें रूप सांगितलें आहे तें विशेष ग्राह्य होय. या विषयीं खालीं प्रांजळपणें उपपादन केलें आहे.

पहिल्या आवृत्तींत असा नियम केला होता कीं विशेषण जर पुल्लिंग असलें तर आकारान्त विशेषणाचें जें विभक्तिसामान्यरूप तें विशेषणसामान्यरूपाच्या स्थानीं योजावें; आणि विशेषण जर स्त्रीलिंग असलें, तर त्याच्या अंत्य स्वरास **ए** अथवा **ये** आदेश करून तें विशेषणसामान्यरूप योजावें. परंतु अलीकडेस या नियमा वर आणखी बारकाईनें विचार करितां माझ्या

बुद्धीस असें वागूं लागलें आहे कीं हा नियम केवळ स्वेच्छानुरूप होय, यास आधार म्हणोन नाहीं. कारण, विचारपूर्वक पाहिलें असतां असें ध्यानांत येतें कीं या भाषेंत आकारान्त विशेषणाचें जें विशेषणसामान्यरूप होतें तें कांहीं पुढल्या विशेष्याच्या लिंगाच्या अनुरोधानें होतें असें नाहीं; तसें जर असतें तर ' **बऱ्ये** मनुष्यानें,' '**हलक्ये** पुरुषानें,' ' **भल्या** बायकोनें,' ' **काळ्या** घोडी वर ,' इ० असा प्रयोग न होतां, '**भल्या** पुरुषानें,' आणि ' **भल्ये** स्त्रियेनें ,' असाच विशेष्याच्या लिंगानुसंधानेंकरून प्रयोग होता. तेव्हां मुळीं ही जी आशंका होती कीं विशेषणसामान्यरूप पुढल्या विशेष्याच्या लिंगा वरून होतें ती दूर झाली. आतां **भल्या, भले,** आणि **भल्ये,** अशीं जीं तीन प्रकारचीं रूपें होतात त्यांतून कोणतें रूप विशेष ग्राह्य ही आशंका राहिली. त्यास, पृ० ७० नि० १८८ वा, या नियमा प्रमाणें विशेषणाचें जें विभक्तिसामान्यरूप तेंच विशेषणसामान्यरूप होतें, असा बहुधा नियम आहे; तेव्हां आकारान्त पुल्लिंग व नपुंसकलिंग विशेषणानीं सामान्यरूपें जीं **बऱ्या, भल्या, तांबड्या,** इ० तींच त्यांचीं विशेषणसामान्यरूपें जाणावीं; **बरे,** अ० **बऱ्ये**, भले, अ० **भल्ये, तांबडे,** अ० **तांबड्ये,** हीं कांहीं पुल्लिंगाचीं, स्त्रीलिंगाचीं, अथवा नपुंसकांचीं सामान्यरूपें नव्हत. **बरी, भली**, इ० स्त्रीलिंगाचीं विभक्तिसामान्यरूपें एकवचनीं **बरी-भली,** आणि अनेकवचनीं **बऱ्यां, भल्यां,** अशीं होतात. परंतु **बरे**, अ० **बऱ्ये, भले,** अ० **भल्ये,** अशीं होत नाहींत. संबोधनीं मात्र विकल्पें **बरे** अ० **बऱ्ये, भले,** अ० **भल्ये,** अशीं रूपें होतात. परंतु सर्वव्यापक अशीं विभक्तिसामान्यरूपें टाकून केवळ एकदेशीय आणि वैकल्पिक अशा नुसत्या संबोधनाचें रूप ग्रहण करावें यास कांहीं आधार दिसत नाहीं. **बरी, भली,** हीं जीं विभक्तिसामान्यरूपें तीं तर विशेषणसामान्यरूपें होत नाहींत,

परंतु पुल्लिंगाचीं आणि नपुंसकाचीं विभक्तिसामान्यरूपें, आणि स्त्रीलिंगीं अनेकवचनाचीं विभक्तिसामान्यरूपें एकच होत, आणि तीं सर्वत्र लागतात; तेव्हां त्यांचेंच ग्रहण केलें असतां १८८ व्या नियमास बाध न येतां मान्ययानें सर्वव्यापक अशा रूपाचें ग्रहण होतें. अतएव, विशेष्याच्या लिंगा वर दृष्टि न देऊन **बरे** अ० **बऱ्ये**, भले, अ० **भल्ये**, अशा रूपाचें ग्रहण न करितां सर्वत्र आकारान्त पुल्लिंग विशेषणाचें विभक्तिसामान्यरूप जें **बऱ्या**, **भल्या** त्याचेंच ग्रहण करावें हें माझ्या बुद्धीस अधिक प्रशस्त दिसतें.

३९१ इतकी खटपट आकारान्त विशेषणा विषयींची. इतर विशेषणांस सविभक्तिक अथवा सशब्दयोगिक विशेष्याच्या योगानें कोणतेंच विशेष कार्य होत नाहीं; जसें- 'आईबापें **अशक्त** मुलांची अधिक चिंता घेतात.' '**कडू** औषधांनें उगीच सेवन करणें कोणास आवडत नाहीं', '**पैठणी** पागोट्याचा कलाबूत मात्र पाहून घ्यावा', 'या **लाजाळू** पोराच्यानें काय व्हावयाचें आहे', इ०.

३९२ विशेषणांचें जर सामान्येंकरून विधान करायाचें असलें तर नामां प्रमाणें त्यांस विभक्त्यादि कार्यें होतात; उदाहरण- '**बऱ्यांच्या** मंडळींत बसावें', '**चांगल्यांची** संगती धरावी', '**आंधळ्यांस पांगळ्यांस** सहाय होत असावें', **विद्वानाची** संगत केली असतां दोन अक्षरें सहज येतील', इ० स्थळीं ज्या विशेषणाचा प्रयोग विशेष्याची अपेक्षा न ठेवितां बहुधा होतो, अथवा ज्याच्या विशेष्याचा बोलण्याचा प्रचात नाहीं, अशा विशेषणास नामें मानिलीं असतां चिंता नाहीं; जसें—आंधळा, विद्वान्, पांगळा इ० या विशेषणां पुढें मनुष्यादि विशेष्यांचा प्रयोग न करितां शुद्ध नामा प्रमाणेंही

यांचा प्रयोग करितात, ह्मणोन हीं नामें ह्मणावीं. परंतु बरा, चांगला, इ० शब्दां पुढें विशेष्याचा अध्याहार क्वचित् होतो, ह्मणोन यांस विशेषणें मानून पुढल्या विशेष्याचा अध्याहार मानावा हें मला नीट दिसतें.

३५३ किती एक शब्द विशेषणा सारखे असून, किंबहुना विशेषणेंच असून, आणखी स्वजातीच्या विरुद्ध ज्या नामा पुढें अथवा शब्दा पुढें त्यांचा योग असतो त्यांचें शब्दयोगि अव्यया प्रमाणें सामान्यरूप करितात. तीं अशीं;–'**जोगा, सारखा, तुल्य, तोलीचा, समान, उलटा, विरुद्ध,**' इ०. उदाह०–'त्याच्या मुली जोगा नवरा आणि तिच्या मुला जोगी नवरी मिळाली,' 'घरा सारखें घर,' 'धन्या समान चाकर,' 'त्याच्या तोलीचा व्याही,' 'त्याच्या उलटें ह्याचें कृत्य,' 'त्या विरुद्ध ही करणी,' इ०.

---

## वर्ग २.

### संख्याविशेषणें.

३५४ संख्याविशेषण ह्मणोन जो विशेषणाचा भेद वर सांगितला, त्याचे **संख्यावाचक, संख्यापूरक, संख्यावृत्तिवाचक,** आणि **संख्यांशवाचक,** हे चार विभाग आहेत.

## प्रकरण १.

### संख्यावाचकें.

३५५ **एक** याचीं पुल्लिंगीं आणि नपुंसकलिंगीं अकारान्त नामा प्रमाणें विभक्तीचीं रूपें होतात. याचें विशेषणसामान्यरूप **एका** असें जाणावें; हा शब्द नित्य

एकवचनांत असतो. **एक्या, एके,** हीं विशेषणसामान्यरूपें व्याकरण रीतीवरून प्रशस्त नाहींत.

३५६ **एक** याचीं स्त्रीलिंगीं भिंतीच्या गणा प्रमाणें विभक्तींनीं रूपें होतात.

३५७ **दोन, तीन, चार,** यांस विभक्तीच्या योगानें **दोहों, तिहीं, चोहों,** असे आदेश होतात; नंतर प्रथम विभक्तिप्रकारा प्रमाणें यांचीं लिंगत्रयीं सामान्यरूपें होतात. हे शब्द निरंतर अनेकवचनांत वागतात. **चार** यास **चोहों** हा विकल्पें आदेश होतो.

| विभ० | अनेकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | दोन. | तीन. |
| द्वि० | दोहोंना-ला-स. | तिहींना-ला-स. |
| तृ० | दोहोंनीं-शीं. | तिहींनीं-शीं. |
| त्रि०सा० | दोहों, दोन. | तिहीं, तीन. |
| इ०. | इ०. | इ०. |

| विभ० | अनेकव० |
|---|---|
| प्र० | चार |
| द्वि० | चारांना-ला-स.—चोहोंना-ला-स. |
| तृ० | चारांनीं-हीं-शीं.—चोहोंनीं-शीं. |
| वि० सा० | चार, चारा.—चोहों. |
| इ०. | इ०. इ०. |

कोणी **दोंहला, चोंहला,** अशीं रूपें लिहितात. परंतु तीं व्याकरणदृष्टीनें अशुद्ध होत; कारण, **दोन, चार,** यांस **दोंह, चोंह,** असे जर आदेश केले तर यास पृ० ७४, नि० २०३ रा, या नियमा प्रमाणें सामान्यरूपीं दीर्घादेश केला पाहिजे; तेव्हां **दोंहांला, चोंहांनीं,** अशीं अनुपलब्ध रूपें होऊं लागतील; ह्मणोन **दोंहों, चोंहों,** हेच आदेश मानून पहिल्या

विभक्ती प्रकारा प्रमाणें यांचीं **दोहोंला**, **चोहोंशीं**, अशींच रूपें लिहिलीं पाहिजेत.

३५८ **पांचा** पासून पुढें अकारान्त संख्याविशेषणांचीं दुसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें सविभक्तिक रूपें जाणावीं.

३५९ **सहा**, **दहा**, **अकरा**, **सोळा**, इ० आकारान्त संख्याविशेषणांचीं विभक्तिसामान्यरूपें पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणें जाणावीं.

एथें आकारान्त पुल्लिंग नामाचीं सविभक्तिक रूपें तिसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें व्हावयाचीं त्या नियमाचा निषेध समजला पाहिजे.

३६० **दोन**, **तीन**, **चार**, हे शब्द जर मनुष्यवाचक नामाचीं विशेषणें असलीं, तर समुच्चय अर्थ असतां, अथवा ज्यां विषयीं कांहीं सांगितलें आहे तितके सारे, असा अर्थ असतां, यांच्या स्थानीं लिंगानुक्रमें **दोघे**, **तिघे**, **चौघे**; **दोघी**, **तिघी**, **चौघी**; आणि **दोघें**, **तिघें**, **चौघें**; हे आदेश होतात, पांचां पासून पुढें अशा अर्थी लिंगपरत्वें **जण**, **जणी**, **जणें**, हे शब्द लागतात; जसें— पांचजण, आठजण, वीसजण, बाराजणी, दहाजणें, इ०.

३६१ **दोघे**, **तिघे**, **चौघे**, यांचीं सहाव्या विभक्तिप्रकारा प्रमाणें सामान्यरूपें होतात; जसें —

| **विभ०** | **अनेकव०** |
|---|---|
| **प्र०** | दोघे. |
| **द्वि०** | दोघांना-ला-स. |

---

* हीं **साह**, **दाह**, या संख्येचीं वैकल्पिक रूपें समजलीं पाहिजेत; इतकेंच नाहीं, परंतु वर जो विरोध दाखविला त्या वरून हींच मुळचीं शुद्ध रूपें मानलीं असतां मग, त्या निषेधासाहि मानणें नको.

| | |
|---|---|
| तृ० | दोघांनीं-हीं-शीं. |
| वि० सा० | दोघां. |
| इ०. | इ०. |

याच प्रमाणें तिघे, चौघे, यांचीं रूपें जाणावीं.

३६२ **दोघी**, या स्त्रीलिंग शब्दाचें पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणें सामान्यरूप जाणावें.

| विभ० | अनेकव० |
|---|---|
| प्र० | दोघी. |
| द्वि० | दोघींना-स. |
| तृ० | दोघींनीं-हीं-शीं. |
| वि०सा० | दोहों, दोघीं. |
| इ०. | इ०. |

याच प्रमाणें तिघी, चौघी, यांचीं रूपें जाणावीं.

हा जो मध्यें घकारादेश होतो त्याचा प्रयोग बहुधा मनुष्यवाचक विशेष्य असतां फार, इतर प्राणिवाचक असतां क्वचित् जाणावा; जसें—‘या **दोघां** पुरुषांहीं मिळून ग्राम मारिलें’, आणि ‘हें दळण **दोघी** बायांनीं दळिलें’, ‘या **दोहों** घोड्यांनीं हे ‘चार मण हरबरे खाले’, ‘हें इतकें दूध या **तिहीं** गाईचें’, ‘यांत बहुधा जेथें समुच्चयार्थ असतो तेथें **दोघे**, **तिघे**, इत्यादि शब्दांचा प्रयोग विशेषेंकरून होतो;’ जसें—‘ आमच्या घरीं **तीन** गाई व्याल्या’, ह्मणजे सामान्यतः पुष्कळ गाई होत्या त्यांतून तीन व्याल्या; परंतु ‘आमच्या **तिघी** गाई व्याल्या’, ह्मणजे तिहीं गाईंचा समुच्चय, अथवा ज्या तीन, ह्मणोन सर्वांस माहित आहेत त्या तीन गाई, व्याल्या, इतका सूक्ष्म अर्थ निघतो; ‘कृष्णंभटास दोन मुलगे झाले, मग ते महायात्रेस गेले, पुढें तेथें ते दोघे मुलगे मोठ्या लौकिकास चढले’.

३६३ हीं वर जीं चकारादेशान्त रूपें सांगितलीं त्यांच्या स्थानीं विकल्पें **दोन्ही, तिन्ही, चाऱ्ही** अशीं-ही रूपें आढळतात, व तीं तिन्ही लिंगीं समान असतात; जसें—त्याचे दोन्ही मुलगे आंधळे, तिन्ही गाया दुधाळ, चाऱ्ही पांखरें पिवळ्या रंगाचीं इ०.

या रूपांच्या व पुढें **पांची, साही, साती, आठी,** अशा बोलण्यांत जीं रूपें येतात त्यांच्या घटनेंत ही या अव्ययाचा आंतून लपून प्रयोग असतो असें स्पष्ट दिसतें—**तिन्ही** म्ह० तीनही, **चाऱ्ही** म्ह० चारही, **साती** म्ह० सातही, असें समजलें पाहिजे.

३६४ **जण**, हा शब्द पुढें असतां **दोन, तीन, चार,** यांच्या स्थानीं ३६० व्या नियमा प्रमाणें **दोघे, तिघे, चौघे,** इ० विशेष्याच्या लिंगा प्रमाणें आदेश होतात; जसें—**दोघेजण, तिघेजण, चौघेजण; दोघीजणी, तिघीजणी, चौघीजणी; दोघेजणें;** इ०. उदाह०—'हें **पांचजणांचें** काम या **तिघांजणांनीं** आटोपलें, ' इ०.

## प्रकरण २.

### संख्यापूरकें अ० क्रमवाचकें.

३६५ **संख्यापूरक** विशेषण ह्मणजे संख्येचें पूरण करणारा अथवा संख्येच्या अनुक्रमानें असणारा किंवा घडणारा जो अर्थ तद्वाचक जो शब्द तें; जसें—**पहिला, दुसरा, तिसरा, पांचवा, दाहवा,** इ०.

एथें **पहिला** ह्मटलें म्हणजे एक जी संख्या तिचें पूरण करणारा जो पदार्थविशेष तद्बोधक शब्द होय. तसेंच—**दुसरा, तिसरा, आठवा, हजारावा,** हीं **दोन, तीन, आठ, हजार,** या संख्यांचीं पूरकें होत.

३६६ **एक** हा मुख्य शब्द असतां याचें संख्यापूरक **पहिला** असें होतें; **दोन** याचें **दुसरा**; **तीन**, **चार**, यांचीं **तिसरा**, **चौथा**, अशीं संख्यापूरकें होतात.

३६७ **पांचा** पासून पुढें सर्व संख्यावाचकांस **वा**, **वी**, **वें**, इ० लिंगवचनांच्या अनुरोधानें प्रत्यय लाविले ह्मणजे संख्यापूरकें सिद्ध होतात; जसें—**पांचवा**, **सातवा**, **आठवी**, **नववें**, इ०.

३६८ **दहा** पासून पुढें जितकीं संख्यावाचकें त्यांच्या अंत्यस्वरास दीर्घ करून संख्यापूरक **वा**, **वी**, **वें**, हे लिंगवचनानुरोधें प्रत्यय लागतात; जसें—**विसावा**, **शंभरावा**, **हजारावी**, **लक्षावें**, इ०.

३६९. पुल्लिंग आणि नपुंसकलिंग असतां त्यांचीं विभक्तिसामान्यरूपें तिसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; आणि स्त्रीलिंग संख्यापूरकांचीं पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; जसें——

पुल्लिंग.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | पहिला. | पहिले. |
| द्वि० | पहिल्याला—स. | पहिल्यांना-ला-स. |
| तृ० | पहिल्यानें—शीं. | पहिल्यांहीं-नीं-शीं. |
| वि०सा० | पहिल्या. | पहिल्यां. |

याच प्रमाणें-दुसरा, तिसरा, चौथा, पांचवा, हजारावा, इ० संख्यापूरकांचीं विभक्तींचीं रूपें जाणावीं.

प्रथमा वर्ज करून नपुंसक संख्यापूरकें जीं दुसरें, तिसरें, चौथें, इ० यांचींहि विभक्तींचीं रूपें याच प्रमाणें जाणावीं.

### स्त्रीलिंग.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | पहिली. | पहिल्या. |
| द्वि० | पहिलीला-स. | पहिल्यांना-ला-स. |
| तृ० | पहिलीनें-शीं. | पहिल्यांहीं-नीं-शीं. |
| वि०सा० | पहिल्या. | पहिल्यां. |

याच प्रमाणें—दुसरी, तिसरी, चौथी, पांचवी, इ० स्त्रीलिंग संख्यापूरकांचीं विभक्तींचीं रूपें जाणावीं.

## प्रकरण ३.

### आवृत्तिवाचकें.

३७० संख्यावाचकांचा गुणितार्थ अथवा आवृत्त्यर्थ असतां त्यांस **पट** हा प्रत्यय लागतो; जसें—**एकपट पांचपट, सातपट,** इ०.

३७१ **दोन, तीन, चार,** यांच्या स्थानीं या प्रत्याच्या योगानें **दु, ति, चौ,** हे अनुक्रमें आदेश होतान; आणि **दोन, तीन,** हीं उपपदें असतां विकल्पें **पट** यांतील पस द्वित्व होतें; जसें—**दुपट, दुप्पट; तिपट, तिप्पट. दाह** यास या प्रत्ययाच्या योगानें विकल्पें **दस** हा आदेश होतो; जसें—**दाहपट, दसपट.**

३७२ क्वचित् संस्कृत रीती प्रमाणें **गुणित** हा शब्द लागून संस्कृत संख्यावाचकां वरून हीं आवृत्तिवाचकें सिद्ध होतात; जसें—द्विगुणित त्रिगुणित, चतुर्गुणित, शतगुणित, सहस्रगुणित, इ०.

## प्रकरण ४.

### संख्यांशवाचकें.

३७३ संख्येच्या अंशाचीं दर्शक जीं **विशेषणें** तीं

संख्यांशवाचकें ह्मणावीं; जसें—**पाव**, **अर्धा**, **पाऊण**, **सवा** अ० **सव्वा**, **दीड**, **अडीच**, इ०.

३७४ कित्येक संख्यांशवाचकें तर सिद्ध शब्दच असतात; जसें—पाव, दीड; अडीच, औट, इ०.

३७५ परंतु सर्वत्र नियम असा आहे कीं पाव अथवा एकचतुर्थांशानें अधिक अशा संख्येचें विधान कर्तव्य असतां त्या संख्येस मागें **सवा** अ० **सव्वा** हा आगम होतो; जसें—सवादोन, अ० सव्वा दोन; सवातीन अ० सव्वातीन; सवाचार, अ० सव्वाचार; इ०.

कोणी **सवा**च्या ठिकाणीं **सव्वा** असें लिहितात. परंतु सर्वत्र एक रीत ठेवून **सवा** लिहावें हें बरें. नेट देऊन बोलायाचें असतां **व**स द्वित्व केल्यास चिंता नाहीं; जसें-'मी त्यास सव्वा पांच रुपये कीं हो द्यावयास केले परंतु त्याणें मानिलें नाहीं.'

३७६ **एक**, **दोन**, आणि **तीन**, यां संख्यांहून अर्धा अथवा एकद्वितीयांश अधिक असें विधान करायाचें असतां त्या त्या संख्येच्या स्थानीं अनुक्रमानें **दीड**, **अडीच**, आणि **औट**, हे सिद्ध शब्द येतात. यांत **औट** या शब्दाचा बोलण्यांत फारसा प्रचार नाहीं.

३७७ अर्धा अथवा एकद्वितीयांशानें अधिक असें विधान कर्तव्य असतां त्या त्या दोहों पेक्षां अधिक संख्येस **साडे**, आणि **पाऊण** अथवा तीनचतुर्थांशानें अधिक असें विधान असतां एकाधिक संख्येस **पाऊणे**, असे मागें आगम होतात; जसें—साडेतीन, साडेचार, साडेसात; पाऊणेदोन, पाउणेआठ, पाउणेपंचवीस इ०.

**पावणे** पेक्षां **पाउणे** हें शुद्ध होय. पा+उणं=**पाउणे**.

३७८ शंभराहून पुढें मोठी संख्या दाखिवणाऱ्या संख्यां मागें **सवा**, **दीड**, **पाउणे**, हे आगम झाले असतां

अथवा **अडीच, औट, साडेतीन, पाउणेचार**, इ० शब्द आले असतां, त्या पुढल्या मुख्य मोठ्या संख्येच्या त्या त्या अंशानें ती ती संख्या अधिक असा विशेष अर्थ निष्पन्न होतो; जसें—**सवाशें, दीडशें, पाउणशें, सवादोनशें, अडीचशें, सवाहजार, दीडहजार, पाउणलाख,** इ० स्थळीं **शंभर, हजार, लाख,** या मुख्य मोठ्या संख्यांच्या त्या त्या अंशानें ती ती संख्या अधिक असें समजलें पाहिजे.

---

## विभाग ४.

### क्रियापदविचार.

३७९ क्रियापद ह्मणजे ज्या शब्देंकरून कोणत्याहि व्यापाराचा अथवा स्थितीचा बोध होतो तें; जसें—**करितो, बोलतोस, चालतों, असतात, राहतात, पाहिलें, राहिलें, असेल, जाईल,** इ०.

३८० क्रियापदाचें जें मूळ, ह्मणजे प्रत्ययादिक वर्ज करून जें मूळचें रूप त्यास **धातु** ह्मणतात; जसें—**ह्मण, बस, अस, हो, कर, राह, पाह,** इ०.

हे धातु बहुधा निरंतर अकारान्त असतात, व कोठें कोठें आकारान्त व इकारान्ताहि असतात ते जाणायाचे असतां बहुधा त्यां पुढें **णें** हा स्वार्थी प्रत्यय लावून त्याचीं रूपें लिहिण्याचा प्रघात पडला आहे. जसें—ह्मणणें, बसणें, असणें, करणें, राहणें, पाहणें, खाणें, गाणें, धाणे, होणें, लिहिणें, कल्पिणें इ०.

३८१ कित्येक धातु अव्युत्पन्न ह्मणजे सिद्ध असतात; जसें—होणें, असणें, निजणें, भिणें, पाहणें, खाणें, ऐकणें, इ०.

३८२ कित्येक धातु व्युत्पन्न ह्मणजे साधित असता-

त; जसें—विझिवणें, भिवडावणें, देविवणें, अंगीकारणें. अनुवादणें, अभिवादणें, अभिलाषणें, माणसाळणें, मोकळसावणें, खुळावणें, इ०. हे विझणें, भिणें, देणें, इ० जे मुळचे सिद्ध धातु त्या वरून त्या त्या अर्थी साधले आहेत.

३८३ कित्येक धातु अनुकरणवाचक असतात; ह्मणजे कांहीं क्रियांचा ध्वनि, अथवा तो तो व्यापार प्रकट रीतीनें दाखिवणारा एकादा कल्पित शद्बाभास मनांत आणून त्याचें अनुकरण करून जे धातु साधितात ते; जसें—टरटरणें, फडफडणें, गुणगुणणें, वचवचणें, धगधगणें, हडबडणें, खदखदणें, चकचकणें, टकमकणें, भणभणणें, गडाडणें, कडाडणें, इ०.

३८४ कित्येक धातु मूळच्या संस्कृत नामा वरून साधले असतात; यांत कित्येक रूढींत पडलेले असतात, व कित्येक नवे ग्रंथकार यांस जशी अपेक्षा असल्ये तसे नवे कल्पितात; जसें—इच्छिणें, भोगणें, वधणें, भ्रमणें, अर्थणें, प्रार्थणें, उपदेशणें, अनुवादणें, कीर्तणें, आकर्णणें, प्रयोजणें, इ०.

परंतु एथें शिकणारांनीं लक्षांत टेवावें कीं, अशा क्रियापदांचा प्रयोग बहुधा प्रौढ भाषणा शिवाय आणि प्रौढ लेखनाशिवाय कोणी करित नाहींत.

३८५ तसें कितीएक धातु कवि व सामान्य लोक स्वच्छंदानें त्या त्या प्रमाणें होणारा, अथवा त्या त्या सोंगानें वागणारा, अथवा तत्तद्धर्म आचरणारा, अशा अर्थी नामा वरून आणि विशेषणां वरून नवे रचितात; जसें—**माणसाळणें, पोरगळणें, वेडगळणें, खुळावणें, एकवटणें, विषारणें,** अ० **विखारणें, पाणारणें,** इ०.

३८६ तशीं कित्येक द्विरुक्तीनें, अथवा अभ्यासानें साधलेले, व अनुकरणवाचक क्रियाविशेषणादि शब्द यांवरूनहि क्रियापदें साधतात; जसें—**सटकणें** ( सटकण ), **झटकणें** ( झटकण ), **भरभरणें** ( भरभर ), **तरतरणें** ( तरतर ), **कडाडणें** ( कडाड ), इ०.

३८७ क्रियापदाचे मुख्य भेद दोन प्रकारचे आहेत, त्यांत **अर्था** वरून पांच, आणि **रूपा** वरून तीन; ते असे—**सकर्मक**, **अकर्मक** **उभयविध**, **भावकर्तृक** आणि **सहाय**, हे पांच शुद्ध अर्था वरून; आणि शक्यार्थ अ० **शक्य**, **प्रयोजक**, **गौण**, अथवा **सिद्ध**, हे तीन रूपा वरून.

३८८ क्रियापदास **रूप**, **भेद**, **अर्थ**, **प्रयोग**, **काळ**, **पुरुष**, **लिंग**, **वचन**, हीं असतात.

## वर्ग १.

### सकर्मक क्रियापदें.

३८९ सकर्मक क्रियापद ह्मणजे कोणतीहि क्रिया अथवा व्यापार कर्त्यापासून निघून त्या व्यापाराचें फलभोक्तृत्व अथवा त्या व्यापाराचें अधिकरणत्व अन्य विषया कडेस ज्यांत असतें तें; जसें—'कृष्णानें कंस मारिला,' या वाक्यांत **मारिला** या क्रियेचा कर्त्ता कृष्ण, यापासून मारणें हा व्यापार उत्पन्न होऊन त्याचें जें फल मरणादि त्याचें भोक्तृत्व कंस जो अन्य विषय त्याज कडेस आलें; अथवा 'तो दूध पितो,' यांत पिण्याचा व्यापार दुधा वर घडतो, अथवा दुधास धरून अस-

* हा निराळा भेद न मानिला तथापि चालेल, कारण याचा अंतर्भाव सकर्मक आणि अकर्मक यांत केला असतां होईल.

तो, ह्मणोन **मारिला, पितो,** हीं सकर्मक क्रियापदें जाणावीं; याच प्रमाणें—देतो, घेतो, पाहतो, करील, भरील, इ० आणखी सकर्मक क्रियापदें.

## वर्ग २.

### अकर्मक क्रियापदें.

३९० ज्या क्रियापदास कर्म नसतें, ह्मणजे जेथें कर्त्यापासून व्यापार उत्पन्न होऊन त्याचें फलभोक्तृत्वहि त्याज कडेसच असतें, त्यास **अकर्मक** ह्मणावें; जसें—'हरि निजतो', या वाक्यांत हरि हा कर्त्ता, यापासून निजण्याचा व्यापार उत्पन्न होऊन, त्याचा फलभोक्ताहि तो हरिच होतो; ह्मणजे तो व्यापार त्या कर्त्यासच धरून असतो, ह्मणोन **निजतो** हें अकर्मक क्रियापद समजावें; याच प्रमाणें—बसतो, उठतो, फिरतो, जातो, येतो, हंसतो, थकतो, इ०.

## प्रकरण १.

### सकर्मक आणि अकर्मक क्रियापदांचें विवेचन.

३९१ सकर्मक किंवा अकर्मक क्रियापद ओळखून काढण्याची मुख्य खूण अशी आहे कीं ज्या क्रियापदास '**काय** हें प्रश्नार्थक सर्वनाम लावून प्रश्न केला असतां ज्या पासून उत्तर निघण्याचा संभव असतो, तें सकर्मक क्रियापद जाणावें; जसें—'तो **लिहितो, जेवतो, मारील, पुजील,**' इ०. एथें—काय लिहितो? काय जेवतो? काय मारील? काय पुजील? असे प्रश्न केले असतां—**पोथी, भात, वाघ, देव,** इत्यादि अनुक्रमें उत्तरें निघण्याचा संभव आहे; ह्मणून—**लिहितो, जेवतो, मारील, पुजील,** इ० हीं सकर्मक क्रियापदें जाणावीं..

परंतु ज्या क्रियापदांस 'काय' हें प्रश्नार्थक सर्वनाम लागत नाहीं, व बळानें लाविलें असतां ज्यांपासून कांहीं उत्तर निघत नाहीं, तीं अकर्मक क्रियापदें जाणावीं; जसें-तो **बसतो, उठतो, निजेल**; एथें—काय बसतो; काय उठतो? काय निजेल? असा प्रश्न जुगत नाहीं, आणि केला असतां उत्तर येत नाहीं, ह्मणून-**बसतो, उठतो, निजेल**, हीं अकर्मक क्रियापदें जाणावीं.

३९२ सकर्मक आणि अकर्मक क्रियापदें ओळखायाची बहुधा सुगम रीति अशी आहे कीं, ज्या क्रियापदास भविष्यकाळीं एकवचनीं तृतीय पुरुषीं ईल, आणि प्रथम पुरुषीं ईन, असे प्रत्यय लागतात तें सकर्मक; आणि **एल** व **एन** लागतात तें अकर्मक; जसें-तो **करील, मारील, लिहील, वाचील**; मीं **करीन, मारीन, लिहीन, वाचीन**, इ० सकर्मक; आणि तो **अडकेल, फुटेल, बसेल**; मीं **अडकेन, फुटेन, बसेन**, इ० अकर्मक क्रियापदें जाणावीं.

यांत **ह्मणणें बोलणें, सांगणें**, इ० कितीएक क्रियापदें सकर्मक असतां **ह्मणेल, बोलेल, सांगेल**, इ० अशींच रूपें होतात.

तसेंच अकर्मक धातू एकाक्षरी, व कोठें इकारान्त असले तर हा नियम लागत नाहीं; त्यांस भविष्यकाळीं **ईल** आणि **ईन** हेच प्रत्यय लागतात; जसें-होईल, जाईल, येईल, न्हाईन, राहीन, इ०.

३९३ दुसरा सकर्मक आणि अकर्मक क्रियापदां विषयीं असा नियम आहे कीं जर क्रियापद सकर्मक आहे, तर स्वार्थी भूतकाळीं त्याचा कर्मणिप्रयोग होत असतो; जसें-'त्याणें वाडा बांधिला,' 'तिणें शालजोडी पांघरिली,' 'गोपाळ्यानें माझें अंगवस्त्र धुतलें,' इ० हीं स-

कर्मक क्रियापदांचीं उदाहरणें; आणि, 'तो गेला,' 'त्याची घोडी पळाली,' 'तें पोर त्या चिखलांत फसलें', इ० अकर्मक क्रियापदांचीं उदाहरणें जाणावीं.

या नियमास बाधक अशीं कितीएक क्रियापदें आहेत, तीं प्रयोगप्रकरणीं सांगेन.

३९४. तिसरा आणखी असा नियम आहे कीं जे धातु अकारान्त असतात, त्यांचा सकर्मक अर्थ असतां त्यांच्या वर्त्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययांस, व त्यां वरून साधलेल्या क्रियापदांस, विकल्पें **इत** प्रत्यय लागतो; आणि अकर्मक अर्थ असतां **अत** प्रत्यय लागतो; उदाहरण— 'तो जसजसा त्या दगडास **लोटितो**, तसतसा तो दगड **लोटत** चालला आहे,' 'तो जसजसें तें लांकूड **कापितो**, तसतसें तें **कापत** आहे,' वारा दार **उघडितो**, हें दार आपोआप **उघडतें**,' राजा पंडितांस **मानितो**, त्याच्या प्रकृतीस उष्णोपचार **मानत** नाहीं.'

**इच्छिणें**, **लिहिणें**, **मोहणें**, इ० कित्येक धातूंस हा विकल्प लागू नाहीं; यांचीं **इच्छित**, **लिहित**, **मोहित**, अशींच रूपें लिहिलीं पाहिजेत.

भूतकाळाच्या रूपांमहि हा **इ** आगमाचा वर सांगितल्या प्रमाणेंच नियम जाणावा; जसें—'त्याणें तें दार **उघडिलें**,' 'तें दार आपोआप **उघडलें**;' 'तिणें कांटा **मोडिला**,' 'तिच्या पायांत कांटा **मोडला**;' 'त्या मुलानें दाणे **विखरिले**,' 'वाऱ्या मुळें दाणे **विखरले**;' इ०.

---

* हा तिसरा नियम स्वर्गवासी राजश्री बाळ गंगाधर शास्त्री यांनीं सुचविला, याज वर आणखी विस्तार पुढें धातुसाधित अव्ययाच्या प्रकरणीं केला आहे.

एथें विकल्पें ह्मटलें या वरून या नियमाचा पुष्कळ लोक जाणून किंवा आळसानें भंग करितात, इतकेंच जाणलें पाहिजे. परंतु मला वाटतें हा नियम प्रशस्त आणि फार उपयोगी आहे असें विचारांतीं त्याच्या प्रत्ययास येईल; म्हणोन साधेल तितकें यासच अनुसरलें असतां बरें आहे.

---

## वर्ग ३.

### उभयविध क्रियापदें.

३९५ जीं क्रियापदें सकर्मक आणि अकर्मक या दोन्हीं अर्थीं असतात, त्यांस **उभयविध** असें ह्मणावें; जसें— **मोडणें** याचें सकर्मक उदाहरण—'त्याणें आपलें घर मोडिलें,' यांत तो हा कर्त्ता, घर हें कर्म, आणि मोडिलें, हें सकर्मक क्रियापद. अकर्मक उदाहरण—'त्याचें घर मोडलें,' एथें घर हा कर्त्ता, आणि मोडलें हें अकर्मक क्रियापद. याच प्रमाणें—फळणें, भरणें, उघडणें, परतणें, इ० उभयविध क्रियापदें जाणावीं.

याचा नियम असा आहे कीं, क्रियापदाचें मूळचें जें रूप तेंच रूप त्यांचा सकर्मक आणि अकर्मक अर्थ असता जर एकाच व्यापाराचें दर्शक असलें, तर तें उभयविध क्रियापद जाणावें; जसें—मोडणें, उघडणें, फळणें, इ०.

---

## वर्ग ४.

### भावकर्तृक क्रियापदें.

३९६ अकर्मक क्रियापदें असून, अथवा सकर्मकांचा अकर्मका प्रमाणें प्रयोग होऊन, ज्या ठिकाणीं स्पष्ट क्रियेचा जो भाव तोच कर्त्ता असावा असें भासतें, व

ज्यांचा प्रयोग तृतीय पुरुषीं एकवचनीं मात्र होतो, अशीं जीं क्रियापदें तीं **भावकर्तृक** जाणावीं; जसें—**उजाडतें, कळमळतें, सांजावलें, फावेल,** इ०.

**वाटणें** हा अकर्मक धातु होय, जसें–'मला ही मसलत चांगली वाटत्ये,' 'मला या मुलाचा स्वभाव गोड वाटतो,' 'त्याला हें तुझें भाषण कठोर वाटलें,' इ०. कोठें कोठें याचा भावकर्तृक धातु प्रमाणेंहि प्रयोग होतो; जसें मला वाटतें त्याणें हें कृत्य केलें असावें,' 'मला वाटलें तो कालच गेला असावा.'

---

## वर्ग ५.

### सहाय क्रियापदें.

३९७ आणखी एक **सहाय** ह्मणोन क्रियापदांचा भेद आहे, तीं इतर धातूंच्या रूपांशीं योजलीं असतां त्यांचा काळ व अर्थ फिरवितात; तीं सहाय क्रियापदें— **अस, नस, हो, जा, ये, दे, लाग, बस, पाह, ठेव, टाक, घे, पाहिजे, नको, नये, नलगे,** हीं आहेत.

३९८ यांत काळ फिरवायास करणरूपीं, **अस,** अकरणरूपीं **नस,** आणि **हो,** या धातूंचें साहाय्य लागतें.

३९९ कोणा एका नियमित धातुसाधिता पुढें **जा, ये, दे, शक, लाग, बस, पाहिजे, नको, नये,** आणि **नलगे,** हे सहायधातु बहुधा सर्व काळीं योजिले असतां त्या त्या धातूंचा अर्थ फिरवितात.

याचा विस्तार या विभागांत शेवटीं 'अवशिष्ट सहायधातूंविषयीं विचार' या वर्गांत करीन.

## वर्ग ६:

### प्रयोजक क्रियापदें.

४०० जेथें क्रियेच्या मुख्य कर्त्यास अन्याच्या प्रेरणेनें गौणत्व येऊन अन्यच मुख्य कर्त्ता असतो, तेथें त्या क्रियापदास प्रयोजक क्रियापद ह्मणतात; जसें—**करवितो बोलवितो, नेसवितो, कापवील, भरवीन, काढविलें,** इ०.

हीं प्रयोजक क्रियापदें मूळधातुस **अवणें** किंवा **इवणें, ववणें** किंवा **विवणें** असे प्रत्यय लागून सिद्ध होतात; जसें—**करवणें** किंवा **करिवणें; बोलवणें** किंवा **बोलिवणें; हंसवणें** किंवा **हंसिवणें; लिहववणें** कि० **लिहविवणें; पाहववणें** कि० **पाहविवणें;** इ०.

या भिन्न भिन्न रूपां विषयींचें नियमन पुढें केलें आहे.

वस्तुत: सूक्ष्मदृष्टीनें विचार केला असतां **प्रयोजक** हें विशेषण क्रियापदास लागूं नये, कर्त्यास लागावें; क्रियापद जें आहे तें प्रयोज्यप्रयोजकभावसूचक होय; तथापि त्या अर्थाचा एथें अतिदेश मानून कर्तृविशेषण क्रियापदाच्या ठायीं आरोपित करून **प्रयोजक** अथवा कोठें **प्रयोज्य** क्रियापद म्हणण्याचा परिपाठ पडला आहे, व यांत शब्दलाघवहि आहे, म्हणून त्यासच एथें अनुसरून **प्रयोजक** असें ह्मटलें आहे.

४०१ यांत सकर्मक धातूं वरून प्रयोजकप्रत्यय झाले असतां मूळकर्त्याचें प्राधान्य राहून त्या कडून व्यापार दुसऱ्या करवीं केला जातो असा अर्थ होतो; आणि अकर्मक धातूं वरून झाले असतांहि अर्थ तसाच, परंतु ज्या करवीं मूळधातुबोधित व्यापार केला जातो तो मूळकर्त्याचें कर्म होतो; उदाहरण—'**मीं पुराण वाचवितों,**'

एथें मूळकर्ता मीं याचें प्राधान्य असून वाचण्याचा जो व्यापार तो पुराणिकादि अन्य कर्त्यां करवीं केला जातो, असा अर्थ निष्पन्न होतो. तसेंच 'तो निजवितो,' या वाक्यांतहि अर्थ तसाच, ह्मणजे तो हा मुख्य कर्ता असून निजण्याचा व्यापार ज्या बालादि अन्य कर्त्यां करवीं केला जातो तीं आतां तो या मूळकर्त्यांचीं कर्में होतात.

एथें मोठें विचार करावयाचें व वादाचें स्थळ आहे. हें प्रयोजक क्रियापद लिहिण्याचीं चार प्रकारचीं रूपें आढळतात;— **करवणें, करिवणें, करीवणें, करविणें;** तशींच या मुळच्या भिन्न भिन्न रूपां वरून वर्त्तमानादि काळांचींहि चार चार प्रकारचीं रूपें आढळतात; जसें—**करवतो, करिवतो, करीवतो, करवितो; करवलें, करिवलें, करीवलें, करविलें;** आतां या चार रूपां मध्यें विशेषंकरून ग्राह्य रूप कोणतें हा मोठा प्रश्न आहे; या विषयीं कांहीं युक्ति योजून व्याकरणनियमानुकूल असें समाधान करण्याचा प्रयत्न करणें एथें अनिवार्य आहे. त्यास, प्रथम तर **करवणें** यास प्रयोजक भेदाचें रूप मानणें हें युक्तीच्या दृष्टीस प्रशस्त दिसत नाहीं: कारण, असें मानिलें असतां शक्य भेदाचीं रूपें आणि प्रयोजक भेदाचीं रूपें सारखीं राहून प्रत्येक भेदास जें निराळें व असाधारण रूप असावें, व त्या रूपां वरून हा भेदाचा निराळेपणा होतो, त्या नियमास बाध येतो; ह्मणजे, प्रयोजक भेदाच्या वांटणीस दोन प्रकारचीं रूपें येऊन शक्य भेदास एकहि असाधारण रूप राहत नाहीं. त्यांत आणखी शक्य भेद असतां ज्या पक्षीं प्रयोजक भेदाच्या असाधारण रूपाचा प्रयोग होत नाहीं, ह्मणजे, 'माझ्यानें तें काम **करिवत, करीवत,** अ॰ **करवित** नाहीं,' असें कोणी कधींच बोलत नाहीं, 'माझ्यानें **करवत** नाहीं,' असेंच बोलतात, त्या पक्षीं हेंच शक्य भेदाचें निःसंशय असाधारण रूप खरें. आतां सम-

यविशेषीं प्रेरणेचा अर्थ असतां कोणी मूळधातूस **वणें** प्रत्यय लावून **करवतो, बोलवतो,** इ० रूपांचा प्रयोग करितात; म्हणजे 'तो तें काम त्या जवळून **करवतो,**' 'तो त्यास **मारवतो,**' इत्यादि रीतीनें, बोलतात; परंतु पूर्वोक्त नियमा वर दृष्टि ठेविली असतां मला असें वाटतें किं या रूपांची जी प्रेरणार्थ असतां लिहिण्याची व बोलण्याची प्रवृत्ति पडून गेली आहे ती शुद्ध प्रमादानें; कारण, असें केल्यानें एका शक्य भेदास त्याचें असाधारण रूप असून तें त्यास अनन्यग्राह्यत्वानें नदेतां, प्रयोजक भेदास तद्व्यतिरिक्त अनेक रूपें असून यांतहि त्यास अंगकारी करणें हें युक्तीस प्रशस्त दिसत नाहीं. अतएव, **करवणें, बोलवणें, मारवतो, नेसवतो,** इ० हीं शक्य भेदाचींच रूपें होत, प्रयोजक भेदाचीं रूपें नव्हत; तेव्हां आतां या रूपां विषयीं तर वाद राहिला नाहीं असें मला वाटतें. तथापि ही युक्ति जर कोणास गहन वाटेल, तर या भाषेंत लिहिण्याची पद्धति सर्वत्र एकसारखी असावी असें ज्यांस वाटत असेल त्यांहीं तरी शक्यभेदमात्र असतां या रूपांचा प्रयोग करावा, म्हणजे बरें.

आतां **करिवणें, करीवणें,** आणि **करविणें,** या तिहीं रूपां मध्यें विशेषें करून ग्राह्य रूप कोणतें हा प्रश्न राहिला. त्यास, **करिवणें** हें मूळधातूचें प्रयोजक रूप विशेषेंकरून ग्राह्य जाणावें; आणि याचीं वर्तमान काळीं **करवितो,** आणि भूतकाळीं **करविलें,** हीं रूपें ग्राह्य जाणावीं. कारण, सर्व धातूं वरून जो **णें** प्रत्यय असतो तो काढून टाकला म्हणजे त्या धातूचें आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचें एकवचनीं रूप होतें, असा या भाषेंत सर्वत्र अबाधित नियम आहे; जसें-**कर, बोल, हंस,** इ०. जर उपांत्य ऱ्हस्व इ अथवा उ असला तर आज्ञार्थी द्वितीय पुरुषाच्या एकवचनीं दीर्घ होतो, या नियमा वरून **करिव, बोलिव, हंसिव,** यांच्या ठिकाणीं, **करीव, बोलीव, हंशीव,** अशीं

आज्ञार्थी रूपें होतात इतकेंच;वरकड मूळचीं **करिवणें,बोलिवणें पढिवणें**, इ॰ हींच धातूचीं रूपें खरीं; **करविणें, बोलविणें पढविणें**, हीं प्रयोजकधातूचीं रूपें नव्हत;जर हीं रूपें असतीं तर पूर्वोक्त नियमा प्रमाणें आज्ञार्थी द्वितीय पुरुषाच्या एकवचनीं **कराविं, बोलवि,पढावि,हंसवि**, अशीं रूपें होतीं. परंतु ज्या पक्षीं अशीं रूपें होत नाहींत, त्या पक्षीं प्रयोजक धातूचीं **करिवणें, बोलिवणें पढिवणें**, इ॰हींच रूपें खरीं. आतां हे प्रयोजक धातु निरंतर सकर्मक असतात, तेव्हां सकर्मक धातूच्या नियमा प्रमाणें यांच्या वर्त्तमानकाळाच्या धातुसाधितास **इ** आगम होऊन त्या वरून वर्त्तमानकाळीं **करिवितो, बोलिवितो**, अशीं रूपें होऊं लागतील; परंतु अशीं रूपें तर होत नाहींत, यांतून कोणताहि इकार ठेवला असतां चालतो; म्हणजे, **करिवतो**, अथवा **करवितो**, अशीं दोन्हीं रूपें चालतात; तेव्हा यांत कोणता इकार बलवत्तर, म्हणजे आवश्यक होय हा एक विचार आतां अवशिष्ट राहिला. त्यास, स्वार्थी वर्त्तमानकाळाचीं जीं रूपें होतात तीं वर्त्तमानकाळाच्या धातुसाधिता वरून होतात, असा सर्वत्र नियम आहे; अतएव, **करवितो, बोलवितो**, अशींच रूपें लिहिलीं पाहिजेत; कारण या प्रयोजक धातूच्या वर्त्तमान काळाचीं धातुसाधितें **करवित, बोलवित**, अशींच होतात, **करिवत, बोलिवत**, अशीं होत नाहींत; म्हणोन **करवितो बोलवितो; करविलें, बोलविलें; करविता बोलविता; करविणार-रा, बोलविणार- रा**; हींच रूपें व्याकरणाच्या सूक्ष्म दृष्टीनें शुद्ध होत, असें मला स्पष्ट दिसतें.

४०२ जर मूळधातु हकारान्त, अथवा एकाक्षरी असला,तर त्या वरून **विवणें** प्रत्यय होतो; जसें–माहविवणें, लिहविवणें, खाविवणें, गाविवणें, देविवणें, घेविवणें, इ०.

एथें पूर्वोक्त प्रत्ययान्तराच्या संभवाचा निषेध जाणावा.

४०३ कित्येक धातूं वरून **आवणें** प्रत्यय होऊन प्रयोजक क्रियापदें अशीं दिसतात;जसें–फितावणें,बहकावणें, निभावणें, सरकावणें, समजावणें, इ०. परंतु हे शुद्ध सकर्मक धातु होत असें मानलें पाहिजे.

कित्येक धातूं वरून ह्मटलें या वरून सर्व जितके **आवणें** प्रत्ययान्त धातू आढळतील तितके प्रयोजक धातू समजूं नयेत; जसें–**भडकावणें**, **भिरकावणें**, **फिरकावणें**, **कमावणें**, **गमावणें**, **सामावणें**, इ०. स्वार्थी धातु समजले पाहिजेत.

४०४ तसेंच अनुकरणवाचक जे अकर्मक धातु असतात ते प्रयोजक अथवा सकर्मक करायाचे असतां बहुधा त्यांस **आवणें** प्रत्यय लागतो; जसें-**फडफडावणें**, **फटफटावणें**, **खळखळावणें**. इत्यादि.

या अशा प्रकारच्या रूपांवर प्रयोजकत्वाची भ्रांति मात्र उत्पन्न होत्ये, म्हणोन हे प्रयोजक मानूं नयेत.

४०५ दुसरा आणखी एक चमत्कारिक संस्कृत भाषे प्रमाणें गूढ नियम या भाषेंत आढळतो; तो असा कीं, बहुधा ज्यांचें पहिलें अक्षर अ, आ, इ, अथवा उ, एतदंत आहे, असे जे कित्येक त्र्यक्षरी अकर्मक धातु त्यांस प्रयोजक अथवा सकर्मक करायाचे असतां पहिल्या अक्षराचा **अ** किंवा **आ** यास वृद्धि होत्ये, आणि पुढें **ट** कार असतां **इ** अ० **उ** यास गुण होतो, आणि टच्या स्थानीं **ड** आदेश होतो. जसें—

| **अकर्मक धातु.** | **प्रयोजक अ० सकर्मक धातु.** |
| --- | --- |
| गडणें | गाडणें |
| पडणें | पाडणें |
| दबणें | दाबणें |

| | |
|---|---|
| सरणें | सारणें |
| गळणें | गाळणें |
| टळणें | टाळणें |
| वळणें | वाळणें |
| चरणें | चारणें |
| मरणें | मारणें |
| तरणें | तारणें |
| फाटणें | फाडणें |
| फिटणें | फेडणें |
| जुटणें | जोडणें |
| तुटणें | तोडणें |
| फुटणें | फोडणें |
| सुटणें | सोडणें |
| इ० | इ० |

४०६ कित्येक धातूं वरून प्रयोजक प्रत्यय लागत नाहींत, कारण तदर्थी दुसरे धातु सिद्ध असतात; आणि यद्यपि त्यांत प्रेरणेचा अर्थ गम्यमान होतो खरा, तथापि त्यांस शुद्ध सकर्मक ह्मटलें असतां कांहीं बाध येणार नाहीं; जसें—

| धातु ० | प्र० अ० स० धातु० |
|---|---|
| येणें | आणणें |
| लागणें | लावणें |
| जाणें, इ० | नेणें, इ० |

४०७ हे प्रयोजक धातु निरंतर सकर्मक असतात. आणि **इवणें** अ० **आवणें** प्रत्यय न लागतां जे प्रयोजकत्वार्थबोधक धातु या भाषेत सिद्ध असतात, ह्मणजे ज्या सकर्मक धातूंत प्रेरणारूप अर्थ गम्यमान असतो, त्या

वरून इतर सकर्मक धातूं प्रमाणें प्रयोजक प्रत्यय लागून आणखी प्रयोजक क्रियापदें साधतात; जसें—**सोडिवणें, तोडिवणें आणिवणें, मारिवणें, फेडिवणें लाविवणें**, इ०.

आणखी या भाषेंत एक चमत्कार आहे; तो असा कीं, एकदां मूळ धातू वरून प्रत्यय लावून प्रयोजक धातु साधला असतांहि वक्त्याच्या मनांत त्या प्रयोजक धातू वरूनहि आणखी प्रेरणारूप अर्थ दर्शवायाचा असल्यास आणखी प्रयोजक धातु साधतात; जसें—**करणें, करिवणें, कराविवणें**; ह्मणजे, आपण **करणें**, दुसऱ्या कडून **करिवणें**, आणि दुसऱ्या कडून तिसऱ्या करवीं **कराविवणें**; उदाहरण—'रामा तें काम **करितो**', 'रामा विठू कडून तें काम **करिवतो**', आणि 'रामा विठू कडून गोविंदाच्या हातून तें काम **कराविवतो**', परंतु असे धातु साधून त्याचा प्रयोग करणें हें फार विरळा, वक्त्याच्या इच्छे वर आहे.

४०८ आणखी शिकणारांनीं एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, कित्येक धातूंचीं रूपें प्रयोजक धातूंच्या प्रमाणें दिसतात, परंतु ते प्रयोजक धातु नव्हत, मूळचे सिद्ध धातु होत; जसें—**पाठिवणें, बडिवणें, कालिवणें** इ०.

---

## वर्ग ७.

### शक्यार्थ अ० शक्य क्रियापदें.

४०९ मूळ धातूस **वणें** अथवा **ववणें** प्रत्यय लागून जें नवें क्रियापद सिद्ध होतें त्यास **शक्यार्थ** अ० **शक्य** क्रियापद ह्मणावें; जसें—**करवणें, चालवणें, जाववणें, घेववणें, दे-**

ववणें, इ० यांत शक्तीचा किंवा शक्यतार्थाचा बोध होतो; जसें—' माझ्यानें अ० मला हें काम **करववतें**,' 'त्याच्यानें अ० त्याला पैका **देववत** नाहीं,' इ०; ह्मणजे हें काम करायास मला शक्ति आहे, पैका द्यावयास त्यास शक्ति नाहीं, असा अर्थ.

४१०. या अशा **शक्यार्थ** अथवा **शक्य** क्रियापदांचा प्रयोग होत असतां ओंड मनन केल्या अंतीं असें ज्ञापित होतें कीं त्या त्या कर्त्याच्या शक्तीनें, द्वारानें, किंवा योगें करून, ती ती क्रिया अथवा तो तो व्यापार केला जातो, केला जायास शक्य होतो, असा यांत कर्मकर्तृभाव ह्मणजे कर्मवाचकाच्या ठायीं कर्त्याचा भाव प्रकट होतो. ह्मणोनच वरच्या उदाहरणांत सर्वव्यापकनियमानुसार कर्त्याचीं प्रथमान्त किंवा शुद्ध तृतीयान्त रूपें व्हावीं, तशीं न होतां सर्वकाळीं—**माझ्यानें**, **त्याच्यानें**, **तुझ्यानें**, अशीं पाहुण्या मारखीं पारकीं सविकरण तृतीयान्त रूपें प्रयोजिलीं जातात. येणेंकरून या शब्दांच्या ठायीं जो कर्तृत्वाचा भास होतो तो उडवावा हेंच या रूपांतरानें इंगित होतें असें माझ्या बुद्धीस वाटतें.

४११ हीं रूपें साधण्यांत आणखी असा नियम आहे कीं जर मूळचा एकाक्षरी धातु असला, तर त्यास **ववणें**, आणि अनेकाक्षरी धातु असला, तर त्यास वणें अ० क्वचित् **ववणें** असे प्रत्यय लागतात; जसें देववतें, घेववतें, जाववतें; आणि करवतें, नेसवतें, हांसवतें; अथवा क्वचित, करववतें, हांसववतें; इ०. असाही कोणी प्रयोग करितात.

४१२ परंतु जर ते अनेकाक्षरी मूळचे हकारान्त धातु असले तर त्यां वरून **ववणें** हाच प्रत्यय होतो;

जसें—'मला लिहववतें,' 'माझ्यानें पाहववतें,' इ०.

**लिह्** धातूस हा प्रत्यय विकल्पें होतो; जसें–'माझ्यानें लिहवतें,' अथवा माझ्यानें लिहववतें.'

४१३ हा प्रत्यय सकर्मक आणि अकर्मक या उभय धातू वरून होतो. परंतु जेव्हां अकर्मका वरून हा प्रत्यय होऊन रूपें साधतात, तेव्हां याचा निरंतर भावकर्तरि प्रयोग होतो; जसें–'माझ्यानें अ० मला **चालवतें,**' 'त्याच्यानें अ० त्याला **निजवत** नाहीं,' इ०.

## प्रकरण १.

### भेदविचार.

४१४ कोणा एका अर्थास उद्देशून मूळ धातूंच्या रूपांत विकार होऊन तदर्थी जो नवा क्रियारूप शब्द सिद्ध होतो त्यास **भेद** ह्मणावें. हे भेद तीन प्रकारचे आहेत,–**मूळरूप भेद, प्रयोजक भेद,** आणि शक्यार्थ अ० **शक्य भेद**; जसें–'मीं **करितों**' हा कर धातूचा **मूळरूपभेद,**' 'मीं **करवितों,**' हा **प्रयोजक भेद,** माझ्यानें अ० मला **करवतें,**' हा शक्यार्थ अ० **शक्य भेद.**

## प्रकरण २.

### रूपविचार.

४१५ कोणत्याहि धातूस विधिरूपानें, अथवा निषेधरूपानें ह्मणजे 'होय' अथवा 'नाहीं' या अर्थानें, चालविलें असतां जें त्याचें रूपांतर होतें त्यास **रूप** असें म्हणावें. हीं रूपें दोन प्रकारचीं आहेत; एक **करणरूप,** आणि दुसरें **अकरणरूप**; उदाहरण–मीं आहें, मीं होतों, म्यां केलें, तो होईल, तो करील; इ० हीं अस, हो,आणि

कर, या धातूंचीं **करणरूपें**. आणि—मीं नाहीं, मीं नव्हतों, म्यां केलें नाहीं, तो होणार नाहीं, तो करणार नाहीं; हीं अस, हो, आणि कर या धातूंचीं **अकरणरूपें** जाणावीं.

---

## प्रकरण ३.

### प्रयोगविचार.

४१६ वाक्यां मध्यें कर्तृप्रधान, कर्मप्रधान, आणि भावप्रधान, या भेदांहींकरून क्रियापदाच्या ठायीं कर्ता कर्म, आणि भाव, यांच्या अनुरोधानें विकार होऊन जो वाक्यरचनेचा एक प्रकार होतो त्यास, अथवा या प्रमाणें विकार पावलेलें जें क्रियापद त्यास, **प्रयोग** अशी संज्ञा आहे. हे प्रयोग चार आहेत—**कर्तरि**, **कर्मणि**, **भावि**, आणि **भावकर्तरि**. *

४१७ जेथें कर्त्या वरून क्रियापद फिरतें, ह्मणजे कर्त्याच्या लिंगवचनास अनुसरून क्रियापदाचें रूप असतें, तेथें **कर्तरिप्रयोग** जाणावा; जसें—' रामा निजतो, ' ' सावित्री पुस्तक वाचित्ये, ' ' पाखरूं उडालें, ' 'आमच्या गाई ह्मशींच्या कळपांत शिरल्या, ' इ०.

४१८ जेथें कर्मा वरून क्रियापद फिरतें, ह्मणजे क-

---

* **कर्तरि** आणि **कर्मणि** हे शब्द मूळचे संस्कृतांत **कर्तृ** आणि **कर्मन्** या शब्दांचीं सप्तमीचीं रूपें होत. यांचा यद्यपि विशेषणा सारखा प्रयोग करणें प्रशस्त नाहीं, तथापि तशाच प्रयोगाची रूढी पडून गेली आहे, ह्मणोन याच रूपांचें एथें ग्रहण केलें आहे. **भाव** शब्दाचें मात्र महाराष्ट्र नियमा प्रमाणें **भावी** असें विशेषण करून योजिलें आहे. **कर्तरि** आणि **कर्मणि** यांचा अंत्यस्वर दीर्घ करून विशेषणें करावीं, तर तसेंही करण्यास कांहीं योग्य आधार दिसत नाहीं; ह्मणोन हीं मूळचीं सप्तमीचीं रूपें जशींचीं तशींच ठेविलीं आहेत.

र्माच्या लिंगवचनांस अनुसरून क्रियापदाचें रूप असतें, तेथें **कर्मणिप्रयोग** जाणावा; जसें-'त्याणें गाडीस घोडा जुंपला,' 'कृष्णानें मुरली वाजविली,' 'वेणूनें सुंदर चित्र काढिलें,' 'त्याणें गप्प उडविली,' तिणें काल तीन प्रकारचे शृंगार केले होते,' इ०.

४१९ जेथें कर्त्या वरून अथवा कर्मा वरून क्रियापद फिरत नाहीं, केवळ सामान्येंकरून त्याचें रूप नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें, तेथें **भावीप्रयोग** जाणावा; जसें–'म्यां त्यास मारिलें,' 'तिणें तिला धरावें,' इ०.

४२० जेथें क्रियेचा जो केवळ भाव तोच कर्ता दिसतो, आणि क्रियापद निरंतर नपुंसकलिंगीं एकवचनीं मात्र असतें, तेथें **भावकर्तरिप्रयोग** जाणावा; जसें–'मला कळमळतें,' 'त्यास नदी पलिकडे सांजावलें,' 'त्यास चालवतें,' 'तिच्यानें बोलवलें नाहीं,' इ०.

४२१ हे प्रयोग वर्तमानकालवाचक व भूतकालवाचक धातुसाधितां वरून, अथवा त्यां वरून साधलेलीं जीं क्रियापदें त्यां वरून अथवा विध्यर्थाच्या रूपां वरून होतात. त्यांत वर्तमान काळीं कर्तरिप्रयोग होतो; जसें–'लक्ष्मी चित्र काढित्ये,' 'तें पोर रडून आपल्या आईस फार त्रास देतें;' भूतकाळीं आणि विध्यर्थी, कर्मणिप्रयोग होतो; जसें-'त्याणें तेव्हां दोन पत्रें लिहिलीं,' 'त्याणें तें काम केलें असावें,' दोन वर्षांत या पोरानें हे सर्व धडे शिकावे,''अशा हालांत त्या केव्हांच मराव्या' इ०.

४२२ भूतकाळ असतां अकर्मक धातूं वरून कर्तरिप्रयोग होतो; जसें—'विठू गेला,' ठकी धांवली,' 'मूल रांगलें' इ०.

४२३ भूतकाळ असतां-उमजणें, भुलणें, ओंबणें.

विणें, समजणें, विसरणें, इ०. उमज धातूचा गण वर्ज करून सकर्मक धातूं वरून कर्मणिप्रयोग होतो; जसें—'त्याणें तें अक्षर लिहिलें,' 'तिणें तो चमत्कार दाखविला,' 'त्या पाखरानें ती चिमणी मारिली,' 'त्याणें या गोष्टी त्यास सांगितल्या असाव्या,' 'म्यां अनेक दुःखें सोसिलीं,' इ०.

आतां हे वर सांगितले उमज धातूच्या गणांतले मुख्यत्वें जे आढळण्यांत येतात ते सर्व धातु वर्णानुक्रमानें पुढें सांगतों.–उमजणें, ओकणें, घडणें, न्हाणें, पसवणें, पिणें, पोहणें, प्रसवणें, बोलणें, भुलणें, ह्मणणें, लेणें, विणें, विसंबणें, विसरणें, शिवणें, (स्पर्शणें या अर्थी) समजणें, स्मरणें, हगणें, व दुसरे कांहीं असल्यास पहावे,– यांचा भूतकाळीं कर्मणिप्रयोग न होतां, कर्तरिच प्रयोग होतो; जसें–'तो तें उमजला,' 'तो तें सारें औषध ओकला,' 'तो दूध प्याला,' 'माझी गाई गोऱ्हा पसवली अथवा व्याली,' 'ते नदी पोहले,' 'तीं मुलें धडे विसरलीं,' 'तो ती वाट भुलला,' 'तो ब्राह्मण ह्मारास शिवला,' 'तो तेव्हां ती गोष्ट स्मरला,' इ०.

हा उमज धातूचा गण जाणावा. या गणांसहि आणखी एक बाधक गण आहे तो माझ्या व्याकरणपूरणिकेंत उदाहरणा सुद्धां सांगितला जाईल तो पहावा.

४२४ भूतकाळ असतां जर कर्म द्वितीयान्त असलें, तर भावीप्रयोग होतो; आणि विध्यर्थी भूतकाळीं अकर्मक धातूं वरूनहि भावीप्रयोग होतो; जसें–'वाघानें गाईस मारिलें,' 'तिणें त्यास सांगितलें,' 'म्यां तेथें उमें राहावें,' 'तिणें नित्य तेथें गावें,' इ०.

४२५ भावकर्तृक धातू वरून, आणि शक्यभेद असतां अकर्मक धातू वरून, नित्य भावकर्तरिप्रयोग होतो; जसें–'मला कळमळतें,' 'त्यांस सांजावलें,' 'तिला तेथें करमलें नाहीं,' 'माझ्यानें चालवतें.' 'आतां मला धांववत नाहीं,' इ०.

४२६ कर्तरिप्रयोगांत **सकर्मककर्तरि** आणि **अकर्मकर्तरि** असे दोन भेद आहेत.

४२७ जेथें सकर्मक क्रियापदांचा योग असून कर्त्याच्या अनुरोधानें क्रियापद असतें, तेथें सकर्मककर्तरिप्रयोग जाणावा; जसें–'रामा काम करितो,' 'गंगा भाजी चिरित्ये,' 'चिमण्या दाणा टिपतात,' इ०.

४२८ जेथें सकर्मक क्रियापदांचा योग असून कर्त्याच्या अनुरोधानें क्रियापद असतें, तेथें अकर्मकर्तरिप्रयोग जाणावा; जसें–'तें मुलगें निजतें,' 'गाय हंबरत्ये,' 'वाघ गर्जतो,' 'पांखरें उडतात,' इ०.

४२९ जेव्हां या भाषेंत कांहीं प्रसंगीं सकर्मक धातू वरून महायक्रियापदाच्या योगानें अथवा दुसऱ्या प्रकारें अर्थांतर न करितां कर्मास कर्ता करण्याचें अगत्य पडतें. आणि त्या अशा झालेल्या कर्तृपदाचा अधिकार क्रियापदाच्या रूपां वर असतो,तेव्हां एक नवा **कर्मकर्तरि** ह्मणून प्रयोग होतो. उदाह०–'तो वाघ मारितो,' यांत अर्थ तसाच ठेवून **वाघ** या कर्मवाचकास कर्ता करणें झाल्यास–'त्याणें वाघ मारिला जातो,' असें त्या पूर्व वाक्याचें रूपांतर होतें.

मराठी भाषेंत हा कर्मकर्तरिप्रयोग सर्व व्यापक नाहीं ह्मणोन याचें वर निरूपण केलें नाहीं. पुढें माझ्या भावी व्याकरणपूरणिकेंत या प्रयोगा विषयीं नवा वि-

स्तीर्ण वर्ग करावयाचा आहे, त्यांत त्याचें सविस्तर विवेचन केलें जाईल तें पहावें.

---

## प्रकरण ४.

### अर्थविचार.

४३० अर्थ ह्मणजे एकादी क्रिया अथवा व्यापार करण्या विषयींचा जो बोलणाराच्या मनांत भाव असतो तो जेणेंकरून कळतो असें जें क्रियापदाचें रूप तो. हे अर्थ पांच आहेत;—**स्वार्थ, आज्ञार्थ, विध्यर्थ, संकेतार्थ,** आणि **संशयार्थ.**

४३१ **स्वार्थ** ह्मणजे बोलणारा एकाद्या गोष्टीचें विधान करितो, ह्मणजे एकादी गोष्ट आहे किंवा नाहीं इतकेंच सांगतो, असा जो बोध क्रियापदाच्या रूपा वरून होतो तो. अथवा तेथें तें क्रियापद **स्वार्थी** आहे असें ह्मणावें. उदाह० 'मी करितों,' 'त्याणें सांगितलें नाहीं,' 'तो गेला होता,' इ०.

४३२ **आज्ञार्थ** ह्मणजे बोलणारा आज्ञा, उपदेश, किंवा प्रार्थना करितो, असा जो बोध क्रियापदाच्या रूपापासून होतो तो. अथवा त्या वाक्यांत तें क्रियापद **आज्ञार्थी** आहे असें ह्मणावें;—उदाह०—'तूं कर,' 'तुह्मी सांगूं नका,' 'तो जाऊ,' 'ते न करोत,' इ०.

आपणा पेक्षां कमी योग्यतेच्या मनुष्यास, अथवा जो आपल्या ताबेदारींत असेल त्यास, कांहीं करावयास सांगितलें तर त्या सांगण्यास आज्ञा म्हणतात. आपणा पेक्षां अधिक योग्यतेच्या मनुष्यास कांहीं करायास सांगितलें असतां त्या सांगण्यास प्रार्थना म्हणतात. हे दोन्हीं अर्थ विवक्षित असतां क्रियापदाचीं रूपें कोठें सारखींच असतात; परंतु बोलण्याची शैली भि-

न असल्ये;—'हे राजा, माझें संकट निवारण कर,' आणि 'सख्या, पाय धुवायास पाणी आण,' या दोन वाक्यांत पहिल्यांत प्रार्थना, आणि दुसऱ्यांत आज्ञा समजली पाहिजे.

४३३ **विध्यर्थ**—आज्ञेचा अर्थ असून धर्म, शक्यता, योग्यता, सातत्य, इ० अर्थांचा बोध ज्या क्रियापदाच्या रूपापासून होतो त्यास विध्यर्थ ह्मणावें; जसें—'म्यां करावें,' 'तिणें जावें,' इ०; एथें आज्ञार्थाची उपलब्धि असून शक्यताहि गम्यमान होत्ये.—'तिणें जावें,' ह्मणजे तिला जावयास शक्ति आहे, मोकळीक आहे, दुसऱ्या कडून आडकाठी नाहीं, तिला जाणें योग्य आहे, असा अर्थ होतो.

या विध्यर्थापासून पुष्कळ अर्थ निष्पन्न होतात;—'आपण आतां जावें,' 'आपण कृपा करून माझा पैका द्यावा,' 'आपणास सुपुत्र व्हावा,' या वाक्यांत आज्ञा, प्रार्थना, मनोरथ, हे अर्थ निष्पन्न होतात. 'मीं काशींत नित्य मनकर्णिकेच्या घांटा वर जावें,' 'तूं लाहानपणीं नित्य रडावेंस', एथें रीति अथवा सातत्य अथवा गतकथास्मरण; 'आईबापांनीं मुलांस शिकवावें,' एथें धर्म; 'ह्मटलें असतां आज पाऊस पडावा,' एथें संभावना; असे अनेक अर्थ ध्वनित होतात. परंतु या सर्वांत ते ते अर्थ असून आज्ञा आणि धर्म हे अर्थ मुख्य दिसतात; ह्मणोन हीं रूपें एका विध्यर्था खालीं लिहिलीं आहेत. असें न केलें, आणि एकच रूप भिन्न भिन्न अर्थां खालीं लिहिलें, तर गोंधळ मात्र होईल; ह्मणोन तसें केलें नाहीं. शिकणारांनीं या रूपांचा प्रयोग भिन्न भिन्न अर्थीं होतो, इतकें मात्र ध्यानांत ठेवावें. परंतु

व्याकरणपदच्छेद करितेसमयीं गोंधळ न व्हावा ह्मणोन या रूपास **विध्यर्थी** ह्मणावें.

४३४ **संशयार्थ** ह्मणजे क्रियापदांच्या रूपां वरून जो संशयरूप अथवा संदेहरूप अथवा संभावनारूप अर्थाचा बोध होतो तो. आणि असा बोध उत्पन्न करणारीं जीं रूपें तीं संशयार्थी आहेत असें ह्मणावें; जसें—'तो गेला असेल,' 'ती जाणार असली,' 'त्याणें तें काम केलें असलें,' इ०.

४३५ **संकेतार्थ** ह्मणजे एका क्रियेची सिद्धि दुसऱ्या क्रिये वर आहे अशा अर्थाचा जो बोध क्रियापदाच्या रूपविशेषा वरून होतो तो; जसें—'तो राहिला असता,' 'तो तसें करिता तर मीं असें करितों.' हा संकेतार्थ अथवा संशयार्थ असतां जर, तर, ह्मणजे, इत्यादि कित्येक अव्ययांचा प्रयोग होतो, अथवा कोठें त्यांचा अध्याहार असतो.

## प्रकरण ५.

### काळ.

४३६ **काळ** ह्मणजे क्रियापदाच्या रूपविशेषा वरून ती क्रिया अमक्या काळीं घडली असा जो बोध होतो तो.

४३७ क्रियेस मुख्य काळ तीन आहेत—**वर्तमान**, **भूत**, आणि **भविष्य**; परंतु या प्रत्येका मध्यें आणखी उपभेद आहेत.

४३८ **वर्तमान** काळ ह्मणजे विद्यमानीं जो काळ चालत आहे तो; जसें—'मीं पूजा करितों,' यांत **करितों** या क्रियापदापासून विद्यमान काळाचा बोध होतो; ह्मणजे ज्या काळीं कोणी एकादी क्रिया करितो त्याच

काळीं सांगणारा तिचें विधान करितो असा अर्थ ज्या क्रियापदाच्या रूपापासून उत्पन्न होतो, त्याचा वर्तमान काळ जाणावा; अथवा तें क्रियापद वर्तमान काळीं आहे असें समजावें.

४३९ वर्तमान काळाचे प्रकार तीन आहेत;—एक **वर्तमान**, दुसरा **अपूर्णवर्तमान**, आणि तिसरा **रीतिवर्तमान**; यांचीं उदाहरणें सांगतों;—

मीं करितों................वर्तमान.
मीं करित आहें, मीं करितों आहें. } अपूर्ण वर्तमान
मीं करित असतों........ रीतिवर्तमान.

वर्तमान काळाच्या रूपांत आणखीहि अर्थभेद असतात; कोठें निश्चयपूर्वक एकादी गोष्ट सांगायाची असतां वर्तमान काळाच्या रूपाचा प्रयोग करितात; जसें–'मीं उद्यां खचित येतों, मीं तुम्हास खाचित सांगतों, पुढल्या वर्षीं दुष्काळ पडतो इ०.

**अपूर्णवर्तमान.**—या काळाच्या ठायीं असा अर्थभेद गम्यमान होतो कीं याचा प्रयोग असतां त्या त्या क्रियेची अपरिसमाप्ति, अथवा कर्त्याची त्या त्या क्रियेच्या ठायीं तात्कालिक जी उद्युक्तता अथवा सिद्धता अशा अर्थांचा बोध होतो; उदा०—'मी जेवित आहें', ह्मणजे जेवण्याची क्रिया अद्यापि करित आहें, तो व्यापार संपला नाहीं, कर्ता अद्यापि त्यांत गुंतला आहे, असा अर्थभेद होतो.

**रीतिवर्तमान.**—या काळीं कर्ता जो आहे त्याची ती ती क्रिया करण्याची रीति, संवई अथवा चाल, असत्ये असा अर्थ होतो; जसें–'मीं करित असतों,' 'तो तेथें खेळत असतो', ह्मणजे माझी करण्याची आणि त्याची

खेळण्याची रीति, चाल, अथवा संवई आहे असा या काळापासून अर्थभेद होतो.

४४० भूत काळ ह्मणजे वर्तमान क्षणा पूर्वीं गेलेला जो काळ तो; जसें—' गोपाळानें पोथी वाचिली,' एथें **वाचिली** या क्रियापदानें मागला काळ अथवा क्रियेची समाप्ति सुचविली; ह्मणोन हा भूतकाळ ह्मणावा.

४४१ भूतकाळाचे प्रकार सात आहेत;—भूत, अपूर्णभूत, रीतिभूत, पूर्णभूत, भूतभूत, वर्तमानभूत, आणि भविष्यभूत; हे आतां उदाहरणांनीं सांगतों—

| | |
|---|---|
| मीं अ० म्यां केलें........... | भूत. |
| मीं करित होतों. ............ | अपूर्णभूत. |
| मीं करीं, अ० करित असें. | रीतिभूत. |
| मीं करिता झालों............ | पूर्णभूत. |
| मीं अ० म्यां केलें होतें. .. | भूतभूत. |
| मीं अ० म्यां केलें आहे. .. | वर्तमानभूत. |
| मीं करणार होतों .. .. .... | भविष्यभूत. |

४४२ **अपूर्णभूत**—या काळाच्या ठायीं क्रियेची अपूर्णता दर्शविली जात्ये; जसें—' मीं करित होतों', ह्मणजे ती क्रिया करण्याच्या उद्योगांत होतों, परंतु ती त्या काळीं समाप्तिस नेली नव्हती, इतका अर्थ भेद हा काळ सुचवितो.

४४३ **रीतिभूत**—या काळाच्या अर्थापासून कांहीं कालमर्याद क्रियेच्या सतत चलनाचा अथवा रीतीचा बोध होतो; जसें—'मीं करीं, अथवा करित असें', यांत करण्याचा व्यापार कांहीं कालमर्याद सतत चालत होता असा अर्थ निष्पन्न होतो.

या काळाचीं रूपें साधत असतां कितीएक धातूंस

एकवचनीं शेवटीं ईकार आणि कितीएकांस एकार असे आगम होतात; जसें-मी होई, तूं होईस, तो होई; मी असें, तूं असेस, तो असे; मी पाहीं, तो पाही; मी रडें, ती रडे इ०. अशीं रूपें साधण्यांत इकार आणि एकार यांचें कोठें कसें सामर्थ्य असतें या विषयींचे कांहीं अबाधित नियम माझे हातीं लागत नाहींत. परंतु थोडेंसें धोरण लागलें आहे. त्याचें सविस्तर निदर्शन माझ्या भावी पूरणिकेंत करीन.

प्राकृत ग्रं... या रीतिभूतकाळाचा प्रयोग शुद्ध भूतकाळीं अथवा पूर्णभूतकाळींहि केला असतो.—

'पृथु पाहतां हर्षला तो सुदामा। ह्मणे जाणिजे लाभ हा थोर आम्हां' ॥

'रुक्मिणी पुढें मुख्य नायिका। आरती करी द्विजवर्यका.' ॥

'मीं करिते समयीं,' 'जेविते वेळीं,' इत्यादि स्थळींहि हींच रूपें जाणावीं—'मीं करिते समयीं' ह्मणजे मीं करीं ते समयीं, 'तो जेवते वेळीं' ह्मणजे तो जेवी ते वेळीं, असा अर्थ. व्याकरण करिते समयींहि असाच पदच्छेद करून निर्वाह करावा. दुसरा उपाय मला दिसत नाहीं.

४४४ पूर्णभूत—या काळीं क्रियेची केवळ पूर्णता ह्मणजे परिसमाप्ति दर्शविली जात्ये; जसें—'मीं करिता झालों,' ह्मणजे ती क्रिया करून राहिलों अ० त्या क्रियेची परिसमाप्ति झाली असा अर्थ.

या पूर्णभूत काळाचा प्रयोग बहुत करून प्राकृत ग्रंथांत आढळतो; व त्यांत तो साधारणपणें भूत काळाच्या ठिकाणीं केला असतो. पहा-

'हें देखोनि विदुरभक्तें ॥ दाखविता झाला कुरुवृद्धातें ॥
भीष्म म्हणे अभाग्यातें ॥ उमज अजूनि पडेना' ॥ ४५ ॥

मुक्तेश्वर.

अशा ठिकाणीं 'दाखविता झाला' इ० पूर्णभूत काळाच्या प्रयोगांत दाखविता इ० शब्द मूळचे कर्तृवाचक धातुसाधित नामें होत; त्यां पुढें 'झाला' या नुसत्या भूतकाळाचा प्रयोग केला असतो असें एथें समजलें पाहिजे. परंतु आणखी सूक्ष्म विचारांतीं असेंहि दिसून येतें कीं ज्या कारणा वरून यांस पुढें इ आगम केला असतो, त्या वरून हे शब्द अशा स्थळीं धातुसाधित अव्यय च्या रूपानीं प्रयोजिले जातात, ह्मणून हा स्वतंत्र कालभेद मानल असतां प्रशस्त असें मला वाटतें.

४४५ **भूतभूत**—भूतकाळीं व्यापार होऊन तो संपला असा ज्या क्रियापदाच्या रूपापासून बोध होतो त्याचा भूतभूत काळ जाणावा; जसें—' रामा गेला होता', यां-त रामाचें जाणें भूतकाळींच संपलें असा अर्थ होतो.

४४६ **वर्तमानभूत**— भूतकाळीं आरंभलेली क्रिया वर्तमान काळा पर्यंत चालत आहे, किंवा भूतकाळीं के-लेल्या क्रियेचें फळ वर्तमान काळीं सिद्ध असावें, असा अर्थ या काळापासून उत्पन्न होतो; जसें—'मीं चा-ललों आहें', एथें मागील काळापासून चलनव्यापा-रास आरंभ होऊन सांप्रत काळीं तो व्यापार नुकताच संपला आहे, अथवा त्या व्यापारानें सिद्ध जें फल तें सांप्रत उपलब्ध आहे, असा अर्थ होतो.

मागील झालेली कथा आतां सांगायाची असतां कधीं कधीं या वर्तमानभूत काळाच्या रूपाचा प्रयोग करितात; जसें—'भो-जराजा सभेत बसला आहे, व तेथें एक ब्राम्हण त्यास आशी-र्वाद देत आहे, इतक्यांत असें झालें.'

४४७ **भविष्यभूत**—कांहीं एक व्यापार भूतकाळीं करायाचा होता, परंतु तो कांहीं व्यत्यया मुळें सिद्धीस गेला नाहीं, असा अर्थ भविष्यभूत काळाच्या ठायीं उ-

द्योधित होतो; जसें-' मीं करणार होतों', ह्मणजे माझा करायाचा बेत अ० इच्छा होती; परंतु त्या क्रियेस आरंभ झाला नाहीं असा अर्थ. कोठें हें भविष्यभूत काळाचें रूप असतां केवळ भविष्यकाळा प्रमाणेंहि अर्थ उत्पन्न होतो; जसें-'इतक्यानें तुझें काय होणार होतें,'' यांत त्याचें काय पोट भरणार होतें,' 'दोन आण्यांनीं काय मीं श्रीमंत होणार होतों,' इ०. कोठें शुद्ध भूत काळाचाहि अर्थ निष्पन्न होतो; जसें—' तुह्मीं काल त्यास सामान दिलें, परंतु तितक्यानें तो काय करणार होता'.

४४८ **भविष्य** काळ ह्मणजे वर्तमान क्षणा पुढें येणारा जो काळ तो; यांत क्रियापदाच्या ठायीं पुढल्या काळाचा बोध होतो;-' मीं लिहीन, ' तो ' जाईल,' एथें **लिहीन, जाईल,** या क्रियापदांहींकरून पुढला काळ सुचविला जातो.

४४९ भविष्य काळाचे प्रकार पांच आहेत;—**भविष्य, अपूर्णभविष्य, वर्तमानभविष्य, भूतभविष्य, भविष्यभविष्य.**

मीं करीन............ .. भविष्य.
मीं करित असेन........ अपूर्णभविष्य.
मीं करणार आहें........ वर्तमानभविष्य.
म्यां केलें असेन........ भूतभविष्य.
मीं करणार असेन........ भविष्यभविष्य.

४५० **अपूर्णभविष्य**—एकाद्या क्रियेस आरंभ होऊन तिचा व्यापार त्या काळीं चालू असेल, असा बोध ज्या क्रियापदापासून होतो त्याचा अपूर्णभविष्य काळ जाणावा; जसें-' मीं करित असेन,' तूं ' जात

असशील,' इ०. 'तूं उद्यां येशील ह्मणजे त्या वेळेस मीं तें काम **करित असेन,'** 'तो शेत **कापित असेल,** त्या वेळीं तूं त्या जवळ जा.'

४५१ **वर्तमानभविष्य**—कर्त्याच्या मनांत एकादा व्यापार करायाचा आहे, परंतु त्याणें अद्यापि त्या क्रियेस आरंभ केला नाहीं, असा बोध ज्या क्रियापदापासून होतो त्याचा वर्तमानभविष्य काळ जाणावा; जसें—' मीं **जाणार आहें,'** 'ती **येणार आहे.'**

४५२ **भूतभविष्य**—भविष्यकाळीं एकाद्या क्रियेचा व्यापार होऊन राहिला असेल असा अर्थ ज्या क्रियापदाच्या रूपापासून निष्पन्न होतो, त्याचा भूतभविष्य काळ जाणावा; जसें–' ज्या वेळेस मीं **जेवलों असेन,** त्या वेळेस तुह्मीं तें काम मज जवळ घेऊन या,' ' मीं तुज कडे येईन तेव्हां त्वां किती पत्रें **लिहिलीं असतील** तितकीं मला तूं दाखीव.'

परंतु असा **अर्थ** स्पष्ट दाखवायाचा असतां, विशेषेंकरून त्या त्या क्रियेच्या **ऊन** प्रत्ययान्त धातुसाधिता पुढें **बस** या सहाय धातूच्या भूतकाळाचा अथवा इतर धातूच्या भूतकाळाचा मध्येंच प्रयोग करितात; जसें–' ज्या वेळेस मीं **जेऊन बसलों असेन,** त्या वेळेस तुह्मीं तें काम मज जवळ घेऊन या,' 'मी तुज कडे येईन तेव्हां तूं किती पत्रें **लिहून बसला असशील,** अ० **लिहून ठेविलीं असशील,** तितकीं दाखीव.

[ अ ] हा भूतभविष्य काळ असतां बहुधा–संशय, संभव, अटकळ, असे अर्थ निष्पन्न होतात; जसें— 'त्याणें या वेळेस दक्षिणा **वांटली असेल** अशी अटकळ होत्ये, पण न जाणों तुह्मीं जाऊन पहा,' 'ती **गेली असेल,'** 'त्याणें तें **लिहिलें असेल,'** इ०.

या अशाच रूपांचा संशय व संभावना अर्थ असतो संस्कृतांतहि असाच प्रयोग आढळतो; ही अर्थसाम्यता मला थोडी आश्चर्या सारखी दिसत्ये. उदाहरण—'तत्कार्यं तेन कृतं भविष्यति' 'तत्तया दर्शितं भविष्यति.'

४९३ **भविष्यभविष्य**—विवक्षित भविष्य काळाच्या पुढल्या काळीं एकाद्या क्रियेचा व्यापार व्हावयाचा आहे, असा अर्थ ज्या क्रियापदांच्या रूपांपासून निप्पन्न होतो, त्याचा भविष्यभविष्य काळ जाणावा; जसें—'तूं जर उद्यां नऊ वाजतां आलास, तर मीं **जेवणार असेन**, परंतु बारा वाजतां आलास तर **जेवलों असेन**, असें समज.'

४९४ क्रियापदांच्या रूपांस—पुरुष, वचनें आणि लिंगें, असतात.

**पुल्लिंग.**

| पुरु० | एक० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं सोडितों. | आह्मीं सोडितों. |
| द्वि० | तूं सोडितोस. | तुह्मीं सोडितां. |
| तृ० | तो सोडितो. | ते सोडितात. |

**स्त्रीलिंग.**

| पुरु. | एक० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं सोडित्यें. | आह्मीं सोडितों. |
| द्वि० | तूं सोडित्येस—तीस. | तुह्मीं सोडितां. |
| तृ० | ती सोडित्ये—ती. | त्या सोडितात. |

**नपुंसकलिंग.**

| | | |
|---|---|---|
| प्र० | मीं सोडितें—तों. | आह्मीं सोडितों. |
| द्वि० | तूं सोडितेंस. | तुह्मीं सोडितां. |
| तृ० | तें सोडितें. | तीं सोडितात. |

यांत तिन्हीं लिंगीं अनेकवचनाचीं रूपें सारखीं.

४९५ (३९७) व्या नियमांत सांगितलें आहे कीं ज्या धातूंच्या योगानें क्रियापदाचीं रूपें, काळ, आणि अर्थ, फिरतात त्यांस **सहाय धातु** ह्मणतात. ते सहाय धातु—**अस, नस, हो, जा, ये, दे, लाग, बस, घे, ठेव, टाक, पाह, पाहिजे, नको, नये, नलगे.**

४९६ यांत काळ फिरवायास **अस, नस,** आणि **हो,** या धातूंचें साहाय्य लागतें.

४९७ नियमित धातुसाधितां पुढें **जा, ये, दे, लाग, बस, ठेव, टाक, पाहिजे, नको, नये,** आणि **नलगे,** हे सहाय धातु बहुधा सर्व काळीं लागतात.

याचा विस्तार या विभागांत शेवटीं 'अवशिष्ट सहाय धातूं विषयीं विचार' या वर्गांत केला आहे.

---

## वर्ग ८.

### धातुसाधितशब्दविचार.

४९८ धातू वरून साधलेले जे शब्द त्यांस **धातुसाधित** शब्द ह्मणतात. यांत नाम, विशेषण, आणि अव्यय, असे भेद आहेत.

**धातुसाधित अव्यय** हा चांगला प्रशस्त शब्द नाहीं, कारण अव्यय या शब्दानें केवळ विभक्तीचा मात्र निषेध सुचविला जातो; परंतु ज्या शब्दाचा कर्तृकर्मरूप शब्दा वर अधिकार असतो, त्यास अव्यय मानणें हें योग्य दिसत नाहीं; अशा शब्दास संस्कृत व्याकरणांत **कृदंत** ह्मटलें आहे. परंतु तेथें **कृत्** ह्मणोन अधिकार म्हणजे प्रत्ययांचा समुच्चय आहे तो ज्यांच्या अंतीं आहे त्यांस कृदंत ह्मटलें आहे. परंतु तसा कांहीं एथें अधिकार नसतां तो शब्द मराठी शब्दसाधितांस देणें हेंहि योग्य दिसत

नाहीं. तथापि **कृदंत** हा केवळ सांकेतिक शब्द मानून या प्रसंगीं योजिला असतां विशेष बाध येईल असें मला वाटत नाहीं परंतु त्या पेक्षां आज पावेतों मराठी व्याकरणांत धातुसाधित अव्यय ह्मणण्याचा परिपाठ पडला आहे, आणि **अव्यय** हा शब्द एथें 'धातुसाधित' या विशेषणानें विशिष्ट आहे, त्या पेक्षां अर्थात् या शब्दाचा पूर्वोक्त अर्थ राहून धातूचा जो वाक्यांत कर्तृकर्मवाचक शब्दां वर अधिकार त्याच्याहि व्याप्तीचा संग्रह होतो. म्हणोन **करित, करितां, करितांनां, करून, करूं, करायास,** इत्यादि शब्दांस धातुसाधित अव्ययें म्हणायाची जी रूढि पडली आहे, तीस एथें अनुसरलें असतां विशेष दोष येईल असें मला वाटत नाहीं.

## धातुसाधित नामें आणि विशेषणें.

४५९. धातुसाधित शब्दां मध्यें ज्यांच्या ठायीं नामाचे धर्म असतात, ह्मणजे ज्यांस लिंगवचनविभक्त्यादि कार्यें होतात, तीं धातुसाधित नामें; व ज्यांचीं रूपें विशेष्याच्या अनुरोधानें फिरतात तीं विशेषणें. यांत जें नाम असतें तें प्रयोगानुसंधानानें विशेषणहि होतें.

करणें.... .... .... .... क्रियावाचक.
करता, करणार, करणारा, कर्तृवाचक.
केला, केलेला,............कर्मवाचक.

४६० यांत, **कर्ता, भर्ता, हर्ता, शास्ता,** इ० अशा रूपांनीं जीं धातुसाधितें आढळतात तीं मूळचीं संस्कृत धातू वरून साधलेलीं धातुसाधितें जाणावीं. शुद्ध प्राकृत नियमास अनुसरून **कर, भर, हर,** इ० धातू वरून साधलीं असतां **करता, भरता, हरता, शासता,** अशीं रूपें लिहिलीं पाहिजेत.

४६१ यांत कर्तृवाचक आणि कर्मवाचक या धातु-

साधितांचा विशेषणा सारखा प्रयोग होतो तो सांगतों;— 'हंसतें लेंकरूं,' 'रडती मुलगी,' 'करणार मनुष्य,' 'धांवणारा घोडा,' 'बांधली गाय,' 'केलेली क्रिया,' इ०. परंतु, 'मारत्याचा हात धरवतो पण बोलत्याचें तोंड धरवत नाहीं,' 'धर्म करणारास आड येऊं नये,' 'मेलेल्यास मारून फळ काय,' इ० वाक्यांत त्या त्या धातुसाधिताचे केवळ नामा प्रमाणें प्रयोग जाणावे.

४६२ **ता**प्रत्ययान्त कर्तृवाचकांत अर्थविशेष इतकाच कीं **ता**प्रत्ययान्त कर्तृवाचकाच्या ठायीं वर्तमान काळाचा बोध होतो, ह्मणजे ती क्रिया चालत आहे, संपली नाहीं, असा अर्थ होतो; जसें—'**जळतें** लांकूड' ह्मटलें ह्मणजे तें लांकूड जळत आहे, जळण्याची क्रिया संपली नाहीं, असा यापासून अर्थ निवतो.

४६३ **णार** प्रत्ययान्त कर्तृवाचक धातुसाधिताचा प्रयोग बहुधा नामा प्रमाणें, आणि **णारा** प्रत्ययान्ताचा प्रायः विशेषणीं प्रयोग होतो; जसें—'**देणार** थोडे, आणि **मागणार** फार झाले. '**करणार** मनुष्य थोडे, **हंसणार** मनुष्य फार,' अशा ठिकाणीं '**करणारे** मनुष्य थोडे, **हंसणारे** मनुष्य फार,' हें अधिक शुद्ध होय.

४६४ **ला** किंवा **लेला** एतत्प्रत्ययान्त कर्तृवाचकाच्या ठायीं भूतकाळाचा बोध होतो; ह्मणजे ती क्रिया संपली, परंतु तिचें कार्य राहिलें आहे, असा अर्थ होतो; जसें— '**जळालें** किंवा **जळालेलें**' लांकूड' 'करपली अ० करपलेली भाकर,' ह्मटलें ह्मणजे तें लांकूड अथवा ती भाकर जळून अथवा करपून त्याज वर त्या क्रियेचें जें कार्य तें दृष्टिगोचर आहे, आणखी त्या कार्या वरूनच त्या गत क्रियेचें अनुमान होतें, असा अर्थ निष्पन्न होतो.

परंतु या भाषेत अकर्मक धातू वरून **लेला** प्रत्यय झाला असतां त्याच्या ठायीं कर्माचा अर्थ राहत नाहीं, कर्त्याचाच अर्थ असतो.

आतां **ला** आणि **लेला** या दोन प्रत्ययांत भेद मिळून इतकाच कीं, **ला** प्रत्ययान्त जीं धातुसाधितें असतात, त्यांच्याच पुढें इतर सहाय धातूंचा प्रयोग होऊन भूतवर्तमान, भूतभूत, इत्यादि काळ घडतात. **लेला** प्रत्ययान्त धातुसाधिता पुढें त्या सहाय धातूंचा प्रयोग प्रशस्त रीतीनें होत नाहीं; कारण, या प्रत्ययानें 'त्या त्या क्रियांच्या कार्यांनीं विशिष्ट' अशा विशेष अर्थाचीं बोधक हीं **लेला** प्रत्ययान्त विशेषणें असतात.

आतां जेथें कर्ता अथवा करण हे अर्थ नाहींत, अशा ठिकाणीं कधीं कधीं **लेला** प्रत्ययान्त कर्मवाचक धातुसाधित विशेषणा पुढें सहाय धातूंचा प्रयोग करून वाक्य पूर्ण करितात; जसें-'तें घोडें तेथें बांधलेलें होतें,' 'ही गाडी रंगलेली आहे,' इ॰. परंतु एथें 'बांधलेलें,' 'रंगलेली,' यांस धातुसाधित विशेषणें मानून 'होतें,' 'आहे,' हीं स्वतंत्र क्रियापदें मानावीं हें बरें.

यांत **लेला** प्रत्ययान्त कर्मवाचक धातुसाधित विशेषणाच्या ठायीं नुसत्या कर्माचाच बोध होतो असें नाहीं; परंतु पंचमी आणि षष्ठी शिवाय ( असें मला वाटतें ) इतर सर्व विभक्तींचे अर्थ याच्या ठायीं संभवतात. याचें उपपादन धातुसाधित भागांत केलें आहे तेथें पहा.

४६५ अकर्मक धातू वरून हें विशेषण झालें असतां तेथें कर्त्याचाच उद्बोध होतो-'**बसलेला** मनुष्य,' '**निजलेली** मांजर,' '**मेलेलें** कुत्रें,' '**उडालेलें** पांखरूं,' इ०.

आतां अकर्मक धातू वरून अशा **ला** आणि **लेला** प्रत्ययान्त धातुसाधितांस एथें कर्मवाचक म्हणून जी संज्ञा दिली आहे ती केवळ सोई करितां इतकेंच समजलें पाहिजे. **असला, असले-**

ला; झाला, झालेला; निजला, निजलेला; उठला, उठलेला; यांस पुढें सोई करता कर्मवाचक धातुसाधितें ह्मटलें आहे असें समजावें.

४३६ सकर्मक धातू वरून हें लेलाप्रत्ययान्त विशेपण झालें असतां कर्म, करण, संप्रदान, आणि अकर्मकधातू वरून झालें असतां कर्ता, अधिकरण, असे अर्थ निष्पन्न होतात. जसें-

**कर्म** . . पाजवलेला चाकू, बांधलेली गाय.

**करण** . . लिहिलेली लेखणी, बांधलेली दोरी.

यांत पहिल्या उदाहरणांत 'लिहिलेली लेखणी' ह्मणजे ज्या लेखणीनें लिहिलें गेलें ती, असा करणी तृतीयेचा अर्थ होतो.

**संप्रदान** . . 'दिलेला ब्राह्मण', ह्मणजे ज्या ब्राह्मणास दिलें तो.

**कर्ता** . . जळालेलें लांकूड, हरवलेला घोडा, ह्म० जें लांकूड जळालें तें, जो घोडा हरवला तो.

**अधिकरण.** 'राहिलेलें घर', ह्मणजे ज्या घरांत लोक राहिले तें घर. 'चाललेला रस्ता', ह्मणजे ज्या रस्त्या वरून लोक चालले तो.

कितीएक नियमित सकर्मक धातू वरून **ईव** प्रत्यय होऊनहि कर्मार्थी, किंवा कोठें कोठें योगार्थी अशीं धातुसाधित विशेपणें आढळतात; जसें-**ओतींव, कांतींव, कोरींव, पिळींव,** इ०.

( पहा धातुसाधितशब्दप्रकरण. )

४६७ या धातुसाधित नामांस आणि विशेपणांस नामां प्रमाणें लिंगवचनविभक्त्यादि कार्यें होतात तीं सांगतों.

**करणें**

| **विभ०** | **एकव०** | **अनेकव०** |
|---|---|---|
| **प्र०** | करणें | करणीं. |

| | | |
|---|---|---|
| द्वि० | करण्यास——ला. | करण्यांस–ला. |
| तृ० | करण्यानें–शीं. | करण्यांनीं–शीं. |
| इ०. | इ० | इ० |

रडता.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | रडता. | रडते. |
| द्वि० | रडत्यास–ला. | रडत्यांस–ना–ला. |
| तृ० | रडत्यानें–शीं. | रडत्यांनीं-हीं-शीं. |
| इ०. | इ०. | इ०. |

**करणार** आणि **करणारा** या दोहोंचीं रूपें अनुक्रमें **वाघ** आणि **आंबा** या शब्दां सारखीं चालतात; जसें– करणारास, करणारानें; करणाऱ्यास, करणाऱ्यानें; इ०.

गेलें.

| विभ० | एकव० |
|---|---|
| प्र० | गेलें. |
| द्वि० | गेल्यास–ला. |
| तृ० | गेल्यानें–शीं. |
| इ०. | इ०. |

अशा कर्मवाचक धातुसाधित नामा वरून द्वितीया झाली असता भूतकालवाचक अव्ययाचाहि अर्थ गम्यमान होतो; जसें– 'तुम्ही तेथें **गेल्यास** बरें पडेल', 'हें औषध दिल्यास त्याला गुण पडेल', ह्मणजे, **गेले असतां, दिलें असतां,** असा अर्थ; या अशा रूपापासून कारण, हेतु, संकेत, अवधि, असे अनेक अर्थहि निघतात; जसें– 'तो न भेटल्यास पुढें म्यां काय करावें !' ह्म० न भेटला तर, एथें संकेत; 'मी या गांवीं राहिल्यास पांच वर्षें झालीं,' ह्म० राहिल्यापासून, एथें अवधि;

'लाखे शाहीनें लिहिल्यास हा कागद फुटणार नाहीं,' येथें कारण; 'रामरक्षा पढल्यास भूतबाधा होणार नाहीं असें कांहीं लोक समजतात,' एथें हेतु; इ० अशीं उदाहरणें जाणावीं.

४६८ आतां धातुसाधित अव्ययें सांगतों.

## धातुसाधित अव्ययें.

करित, करितां, करितांनां, करित असतां, करित असतांनां, } वर्तमानकालवाचक.

केलें असतां, केलें असतांनां, केलें ह्मणजे, भूतकालवाचक.

करून,.... .... पूर्वकालवाचक.

करूं, करायास, करावयास,........ निमित्तवाचक.

करावें, करायाचें, करावयाचें, करणें, विधिवाचक.

४६९ आतां हीं धातुसाधितें मूळ धातू वरून कशीं साधतात, या विषयीं नियम सांगतों; कांकिं या धातुसाधितां वरून पुढें क्रियापदांचीं रूपें सिद्ध होतात, ह्मणोन हे नियम लक्षांत ठेवण्याची फार आवश्यकता आहे.

४७० मूळ धातू वरून णें प्रत्यय साधून क्रियावाचक धातुसाधित नामें होतात; जसें—**करणें, उठणें, चालणें, घेणें, देणें, पाळणें**, इ०.

४७१ मूळ धातू वरून लिंगवचनपरत्वें **ता, ती, तें**, इ० हे प्रत्यय लाविले असतां वर्तमानकालबोधक कर्तृवाचक धातुसाधित नामें सिद्ध होतात; उदाह०—**नेता, देता, घेता, खाता, करते, पाहते; रांगती**, चालती, **खाता, पीता; रांगतें, रांगतीं**; इ०.

४७२ अशीं **ता**प्रत्ययान्त धातुसाधित नामें किंवा विशेषणें असतां त्यांस मागें इ आगम करणें सयुक्तिक दिसत नाहीं—ह्मणून **करता, बोलता, मारता, तारता, संभाळती, राखती, अनुसरतें, वसतीं**, अशींच रूपें लिहावीं.

४७३ परंतु जर तीं ताप्रत्ययान्त वर्तमान कालवाचक धातुसाधित अव्ययें असलीं, तर इ आगमाच्या नियमा प्रमाणें (पहा नि० ३९३, पृ० १६०,) हा इ आगम केलाच पाहिजे; जसें—करितां, लिहितां, मानितां, बोलवितां, शिकवितां, नेसवितां, इ०.

हे वर सांगितलेले दोन नियम फार उपयोगाचे आहेत; तथापि लोक अज्ञानानें किंवा प्रमादानें या भेदा वर लक्ष देत नाहींत. परंतु हा भेद लक्षांत ठेवून शुद्ध रीतीनें लिहिणें किती अगत्याचें आहे हें त्यांणीं विचार केला असतां समजेल.

तथापि मराठी ग्रंथ भाषेंत हे नियम चालत नाहींत.

४७४ जर हो धातूच्या भूतकाळाच्या रूपाचा प्रयोग कर्तव्य असला, तर अकारान्त सकर्मक धातूस इ आगम होऊन पूर्णभूतकाळीं हा ता प्रत्यय लागतो; जसें—करिता झाला, पूजिता झाला; इ०.

परंतु असा प्रयोग प्राकृत ग्रंथांत येतो, पहा या विषयींचें उपपादन [नि० ४४४, पृ०१८०].

४७५ परंतु यांत-उमज, पढ, शिक, सांग, बोल, भज, भाज, वांच, इ० हा उमज धातूचा गण आणि लिह वर्ज करून हकारान्त धातु, यांस हा इ आगम होत नाहीं.

४७६ परंतु वर सांगितलेल्या नियमा विरुद्ध प्रयोजक धातू वरून ताप्रत्ययान्त धातुसाधित नामें आणि विशेषणें असतां इ आगम केला पाहिजे; जसें—करविता, चालविता, बोलविता, हंसविता, पढविता, इ०.

'साळोंकी ही कैशी बोले मंजुळ वाणी।
शिकविता धणी वेगळाची ॥' तुकाराम.

४७७ णार आणि णारा एतत्प्रत्ययान्त जीं कर्तृवाचक धातुसाधितें, तीं मूळ धातूस हे प्रत्यय लावल्यानें

साधतात; जसें—करणार, हंसणार, घेणार, देणार; बोलणारा, करणारा, जाणारा, येणारा, इ०.

४७८ मूळ धातूस **ला** आणि **लेला** हे प्रत्यय लिंगवचनपरत्वें लावले असतां कर्मवाचक धातुसाधितें होतात; परंतु त्यांत उमजधातूचा गण वर्जित करून हे प्रत्यय लाविते समयीं सकर्मक धातूस इ आगम होतो; जसें—ठेविला, ठेविलेला; अर्पिला, अर्पिलेला; आकर्षिलें, आकर्षिलेलीं; मांडिली, मांडिलेल्या; इ०.

अर्थात् अकर्मक धातूस हा इ आगम होत नाहीं; जसें—उठला, उठलेला; बसला, बसलेला; निजला, निजलेला; इ०.

हकारान्त धातूस हा आगम अवश्य केला पाहिजे; जसें—लिहिलें, लिहिलेलें; पाहिलेला, पाहिलेले; राहिलें, राहिलेलीं; इ०.

४७९ मूळ धातूस **आवें** प्रत्यय लावला असतां विधिवाचक धातुसाधितें होतात. हा प्रत्यय प्रयोगविशेषीं कर्ता, कर्म, यांच्या लिंगवचनां प्रमाणें फिरतो; जसें—करावें, धरावा, फिरवावी, चाराव्या, मारावे, आठवावीं, पाहावीं, इ०.

४८० मूळ धातूस त, तां, **तांनां**, हे प्रत्यय लावले असतां वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययें होतात. परंतु उमजधातूचा गण वर्जून अकारान्त सकर्मक धातूस हा प्रत्यय लावायाच्या पूर्वी इ आगम केला पाहिजे; जसें-करित, धरित, ठेवित, बोलवित, शिंपितां, टेवितांना, इ०.

४८१ मूळ धातूस **ऊन** प्रत्यय लावला असतां पूर्वकालवाचक अव्यय सिद्ध होतें; जसें—करून, बोलून, जाऊन, ठेवून, इ०.

एथें शिकणारानें लक्षांत ठेवावें कीं कोणीं—नेवून.

जावून, घेवून, अशीं जीं रूपें लिहितात तीं अप्रशस्त; नेऊन, जाऊन, घेऊन, अशीं रूपें लिहावीं हा मार्ग शुद्ध.

४८२ मूळ धातूस ऊं हा प्रत्यय लावला असतां निमित्तवाचक धातुसाधित अव्यय सिद्ध होतें; जसें—बोलूं, घेऊं, नेऊं, जाऊं, इ०.

नेवूं, खावूं, घेवूं इ० रूपें अप्रशस्त.

४८३ मूळ धातूस आवा प्रत्यय लागून विधिवाचक धातुसाधितें होतात; प्रयोगभेदेंकरून लिंगवचनानुरूप एतत्प्रत्ययान्त रूपें फिरतात.

कोणीं करावें, जावें, इ० विधिवाचक धातुसाधितें यांस नामें करून त्या वरून चतुर्थी आणि षष्ठी या दोन विभक्ति मात्र मानून, जसें—करावयास, करावयाला; अ० करायास, करायाला; करावयाचें, अ० करायाचें, अशीं चतुर्थीचीं आणि षष्ठीचीं रूपें साधितात; परंतु मला असें वाटतें कीं, करायास अ० करावयास; करायाचें अ० करावयाचें; हीं करावें या विधिवाचक धातुसाधिताचीं विभक्तिरूपें नव्हत. हीं मुळीं करा आणि करावें या शब्दांपुढें यास आणि याचें हीं दोन दर्शक सर्वनामें लागून करायास, करावयास, करायाचें, करावयाचें; अशीं रूपें बोलण्यांत संक्षिप्त होऊन झालीं असावीं असें अनुमान होतें.

प्राकृत ग्रंथांत बहुधा कराया अ० करावया या रूपा पुढें लागीं, मुळें. करतां, इ० शब्दयोगी अव्ययें जोडून लिहिण्याची रीति आढळती. 'तो करावयास गेला,' म्हणजे करावें यास गेला; 'तें नेसावयाचें वस्त्र,' म्हणजे नेसावें याचें वस्त्र; 'बसायाचें घोडें,' म्हणजे अर्थात् तुह्मीं बसा या कामाचें घोडें, अशी मूळची शब्दयोजना असावी.

आतां—' मला जावें लागेल,' ' त्याला तें काम करावें

लागलें,' इत्यादि वाक्यांत **लागेल**, **लागलें**, हीं भावकर्तृक क्रियापदें मानलीं पाहिजेत,–'मला जावें लागतें,' ह्मणजे म्यां जावें हें अवश्य आहे, असा अर्थ; 'त्यास आपल्या कामावर लौकर हाजर व्हावें लागतें,' या ठिकाणीं **लागतें** या क्रियापदाचा–'आपल्या कामा वर लौकर हाजर व्हावें'—हा सर्व वाक्यांश कर्ता मानावा. अथवा या पेक्षां **जावें**, **व्हावें**, यांस विधिवाचक धातुसाधित नामें मानून तीं कर्तृपदें मानावीं. या शिवाय मला दुसरी युक्ति आढळत नाहीं.

४८४ अशां रूपां वरून जेथें भावकर्तृरिप्रयोग होतो, त्या वाक्यांत सकर्मक अकर्मक यांच्या अनुसंधानानें यांस धातुसाधित विशेषणें अ० नामें मानणें आवश्यक आहे असें मला वाटतें; जसें—'मला जायाचें आहे,' एथें **जायाचें** हें धातुसाधित नाम; आणि 'त्यास तें काम करायाचें आहे,' 'तिला ती घोडी बांधायाची आहे,' या वाक्यांत **करायाचें**, **बांधायाची**, हीं धातुसाधित विशेषणें मानावीं.

असें न मानिलें तर 'मला जायाचें आहे,' या वाक्यांत **आहे** याचा कर्ता **जायाचें** या शिवाय दुसरा कोणीच दिसत नाहीं. हीं जीं वर वाक्यें सांगितलीं आहेत यांचा व्याकरणपदच्छेद दुसऱ्या रीतीनें कोण कसा करितो हें समजल्या वांचून या शिवाय दुसरी युक्ति आहे असें मला आढळत नाहीं.

परंतु 'नेसायाचा पंचा,' 'पांघरावयाची पासोडी,' रहावयाचें घर.' अशा स्थळीं मात्र **नेसायाचा**, **पांघरावयाची**, **रहावयाचें**, हीं स्पष्ट धातुसाधित विशेषणें होत असें दिसतें.

तसेंच 'त्याणें केल्या शिवाय माझें काम होणार नाहीं,' 'तूं गेल्या वर मी जाईन,' इ० वाक्यांत **त्याणें**, **तूं**, यांस त्या त्या

धातुसाधित नामांच्या धात्वर्थास अनुलक्षून कर्ते मानिले पाहिजेत. अथवा, वर सांगितल्या प्रमाणें कित्येक विद्वानांचें जर असें मत पडेल कीं, **केलें**, **गेलें** इ० भूतकालवाचक धातुसाधित नामें नमानितां **केल्यास**, **गेल्यानें**, इ० 'केलें यास,' 'गेलें यानें,' या पदांचीं संक्षिप्त रूपें मानावीं;–'ती गेल्या वर,' म्हणजे 'ती गेली यावर,' ह्मणजे ' ती गेली असें झाल्या वर 'त्याणें केल्या शिवाय,' ह्मणजे 'त्याणें केलें या शिवाय,' ह्म० 'त्याणें केलें असें झाल्या शिवाय असा वाक्यार्थ. ही कल्पना चांगली आहे, आणि मूळचीं पदें अशींच खरीं, यांत संशय नाहीं. परंतु व्याकरणपदच्छेद करिते समयीं अशीं निरनिराळीं पदें करून व्याकरण करावें, किंवा–**केल्यास**, **गेल्यानें**, हीं एकपदें मानून व्याकरण करावें, या विषयीं मीं अंमळ साशंक आहें. हे दोन पक्ष आहेत यांतून जो ज्यास बरा दिसेल तो त्याणें घ्यावा.

४८९ कधीं कधीं वक्त्याच्या मनांत एकादी क्रिया निश्चयपूर्वक करावयाची असतां, अथवा कर्त्याची ती करण्याची इच्छा स्पष्टपणें दाखवायाची असतां, निवळ भविष्य काळींहि या धातुसाधिताचा प्रयोग करितात; जसें—'त्याला तेथें जायाचें, तूं काय सांगतोस?' 'तुह्मीं कांहीं ह्मणा, मला तर आजचेआज हें काम संपवायाचें,' इत्यादि स्थळीं–**जायाचें**, **संपवायाचें**, इ० हीं **जा**, **संपिव**, या क्रियापदांच्या विधिवाचक धातुसाधितांचीं भविष्यकालार्थीं रूपें जाणावीं.

अशा धातुसाधितांचा संस्कृतांतहि अशाच अर्थीं प्रशस्त रीतीनें प्रयोग होतो; जसें–'तत्कार्यं कर्तव्यं मया,''तत्र तेन गंतव्यं,' इ०.

कर्मवाचक धातुसाधित नामां वरून द्वितीया झाली असतां कार्यकारणभाव, संकेत, आणि क्रियेची वर्तमान काळीं असिद्धता, असे अर्थ गम्यमान होतात. उदाह०–'विद्या शिकल्यास

प्रतिष्ठा मिळल्ये,' यांत 'विद्या शिकणें' हें कारण, आणि 'प्रतिष्ठा मिळणें' हें कार्य. 'तो गेल्यास मीं जाईन,' ह्म०, 'तो गेला असतां, अ० तो गेला तर मी जाईन,' असा संकेतार्थ.

क्रियेची अवधि मानून काळगणना करायाची असतांहि वर सांगितल्या रूपाचा प्रयोग होतो. उदाह०–' मला शास्त्र पढल्यास पांच वर्षं झालीं', इ०. ह्मणजे शास्त्र पढत होतों तेव्हां पासून पांच वर्षं झालीं.

---

## वर्ग १.

### सहाय धातूंचें चालिवणें.

४८६ धातूचें **चालिवणें** ह्मणजे–प्रयोग, अर्थ, काळ, वचन, पुरुष, लिंग, यांहींकरून त्यांचीं सर्व रूपें एका क्रमानें दाखिवणें.

४८७ सहाय धातूं मध्यें ज्यांस प्रयोग, अर्थ, काळ, हीं सर्व असत नाहींत, त्यांस **गौण क्रियापदें** ह्मणावें—**पाहिजे, नको, नये, नलगे**, हीं या प्रकारचीं क्रियापदें होत.

४८८ कित्येक सहाय धातूंचीं रूपें नियमा प्रमाणें होत नाहींत, ह्मणोन आदीं ते धातु चालवून दाखविले पाहिजेत.

### असधातूचें चालिवणें.

**असधातूचीं वर्तमान काळीं तीन प्रकारचीं, आणि भूतकाळीं दोन प्रकारचीं, रूपें होतात.**

## अस*धातु.

### करणरूप.

### मूलरूपभेद.

### स्वार्थ.

### कर्तरिप्रयोग.

### वर्तमान काळ.

### प्रकार १.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मी आहें. | आह्मी आहों. |
| द्वि० | तूं आहेस. | तुह्मी अहांत–अहां-अहा. |
| तृ० | तो–ती–तें आहे. | ते–त्या–तीं आहेत. |

*या असधातूचीं पहिल्या प्रकारचीं वर्तमान काळाचीं आणि भूत काळाचीं रूपें इतर धातूंच्या रूपां पुढें स्वार्थ असतां लाविलीं जातात. परंतु दुसऱ्या प्रकारचीं जीं रूपें आहेत तीं इतर धातूंच्या रूपां पुढें लावलीं असतां संशयार्थ उत्पन्न होतो. असधातूचें दुसऱ्या प्रकारचें जें भूतकाळाचें रूप होतें त्याचा नुसता प्रयोग होत नाहीं. गोमंतक प्रांतीं मात्र शेवटील अक्षरास द्वित्त करून त्याचा नुसता प्रयोग भूतभूत काळीं करितात, जसें–'हों थें असल्लों,' 'तूं थें असल्लीस.' या धातूचीं दुसऱ्या प्रकारचीं भूतकाळाचीं रूपें, भविष्य काळाचीं रूपें, आणि विध्यर्थाचीं रूपें, इतर धातूंच्या रूपां पुढें लाविलीं असतां संशयार्थ उत्पन्न होतो; आणि वर्तमान काळाचीं रूपें लाविलीं असतां संकेतार्थ उत्पन्न होतो; जसें–'मीं गेलों असलों,' तूं गेला असशील,' एथें संशयार्थ; आणि 'मीं गेलों असतों'-'जर अमुक गोष्ट झाली असती तर मीं गेलों असतों' एथें संकेतार्थ. कित्येक विद्वान् असें ह्मणतात कीं आहे हा स्वतंत्र धातु आहे, आणि होतें हा त्याचा भूतकाळ परंतु हा असें पहाण्याचा प्रकार स्वतंत्र आहे.

यांत **अहांत**, **अहां**, अशीं द्वितीय पुरुषाच्या अनेक वचनीं सर्वत्र दोन प्रकारचीं रूपें होतात; त्यांत— **अहां**, **होतां**, **असतां**, **गेलां**, **गेलां होतां**, इ० प्रकारचीं जीं रूपें बहुधा **तुह्मी** या सर्वनामाच्या स्थानीं बहुमानार्थी जेव्हां **आपण** या सर्वनामाचा प्रयोग करावा लागतो तेव्हां उपयोगांत आणावीं, हा नियम बरा आहे. 'आपण गेलां,' आणि 'तुह्मी गेलेत' असा भेद ठेवावा. **आहां**, आणि **आहांत** अशीं रूपें न लिहितां **अहां** आणि **अहांत** अशीं रूपें लिहिण्याचा अधिक प्रघात पडला आहे. या विपर्यांचें उपपादन पुढें लेखनपद्धतींत केलें आहे.

## प्रकार २.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होय, होई. | आह्मी हों, होऊं |
| द्वि० | तूं होस. | तुह्मी व्हा. |
| तृ० | तो–ती–तें होय. | ते–त्या–तीं होत. |

हीं **अस**धातूचीं वर्तमान काळीं जीं दोन प्रकारचीं रूपें होतात, त्यांत या दुसऱ्या प्रकारच्या रूपांचा प्रयोग बहुतकरून कांहीं व्याख्या कर्तव्य असतां, अथवा कांहीं विशेष प्रकार निश्चयपूर्वक सांगायाचा असतां, करितात; जसें—'प्रापंचिक व्यवहारास जसें द्रव्य हें मुख्य साधन होय, तसे वाग्व्यवहारास शब्द होत,' 'मीं जर राघोपंताचा पुत्र होय, तर तुला ती जागा मिळूं देणार नाहीं,' 'आह्मी देव हों तर तुमचें कल्याण करूं.'

या दोन प्रकारच्या रूपांत अर्थभेद फार सूक्ष्म आहे असें दिसतें, ह्मणोन हा भेद इतर देशस्थ लोकांच्या ध्यानास येण्यास फार अवघड आहे.

४८९ खालीं जीं वर्तमान काळाचीं रूपें दाखविलीं आहेत तीं, व सर्व जीं तकारान्त क्रियापदें साधतात तीं, हीं वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यया वरून साधतात, हा एक नियम लक्षांत ठेवा. **करित, असत,** हीं जीं वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययें यां वरून— करितों, असतों; करित्यें, असत्यें; करितो, असतो; करितात, असतात; करितास, असतास; करितीस, असतीस; करिता, असता; इ० क्रियापदें साधतात.

## प्रकार ३.

### पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असतों. | आह्मीं असतों. |
| द्वि० | तूं असतोस. | तुह्मीं असतां. |
| तृ० | तो असतो. | ते असतात. |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मीं असत्यें. | |
| द्वि० | तूं असत्येस, अ० असतीस. | |
| तृ० | ती असत्ये, अ० असती. | |

### नपुंसकलिंग.

| | |
|---|---|
| प्र० | मीं असतें. |
| द्वि० | तूं असतेंस. |
| तृ० | तें असतें. |

अनेकवचनीं लिंगत्रयीं रूपें सारखीं होतात.

देशावर व कोंकणांताहि स्त्रीलिंगीं प्रथम पुरुषीं—**असल्यें, करित्यें, आल्यें, येत असल्यें,** अशी बोलायाची रीत आहे. परंतु वाडीमांतीं कऱ्हाड्या ब्राम्हणांत, व मुंबई आणि साष्टी प्रांतांत—

**असतों, करतों, जातों, यतों**, अशीं पुल्लिंगा प्रमाणेंच स्त्रीलिंगीं रूपें होतात. परंतु ही रीत नीट दिसत नाहीं; कारण एक तर ही रीत केवळ एकदेशीय; त्यांत आणखी अशा प्रकारच्या रूढींत पुरुषां पेक्षां स्त्रियांच्या बोलण्यांत कांहीं विशेष मार्दव असावें तें राहत नाहीं; स्त्रियांच्या भाषणांत जितका नाजुकपणा विशेष, तितका तो त्यांस अलंकार होय. **तों** या पेक्षां **त्यें** यांत कांहीं मार्दव विशेष आहे, म्हणोन सर्वांहीं 'मीं **असत्यें, करित्यें, जात्यें, येत्यें,**' हींच रूपें स्त्रीलिंगीं घेतलीं असतां त्यांत चांगलें आहे.

दुसरें, सर्व धातूं वरून स्त्रीलिंगीं द्वितीय आणि तृतीय पुरुषीं देशकोंकणपरत्वें दोन दोन प्रकारचीं रूपें आढळतात; कोंकणांत—**असत्येस, करित्येस, देत्येस; असत्ये, करित्ये, देत्ये;** आणि देशांत **असतीस, करितीस, देतीस,** इ० अशीं रूपें वर्ततात. यांत देशस्थ रीती प्रमाणें जीं रूपें होतात तीं कानास अंमळ चांगलीं लागतात; त्यांत लिहिण्यांत तर अशा रूपांची कधीं कधीं आवश्यकताहि वाटती; परंतु जर केवळ व्याकरणरीतीसच अनुसरून पाहिलें, तर-**असत्येस, असत्ये,** हीं रूपें विशेषेंकरून ग्राह्य दिसतात. कसें म्हणाल तर क्रियापदांच्या वर्तमानकाळीं एकवचनीं असा नियम आहे कीं तृतीय पुरुषाचें जें रूप त्यास शेवटीं अनुनासिक केलें असतां प्रथम पुरुषाचें रूप होतें, व त्या रूपा पुढें **स** हें अक्षर लाविलें म्हणजे द्वितीय पुरुषाचें रूप होतें; जसें पुल्लिंगीं—तो **करितो**, तूं **करितोस**, मीं **करितों**; हा नियम स्त्रीलिंगीं देशस्थ रीतीच्या रूपां मध्यें राहत नाहीं. ती **बोलित्ये**, तूं **बोलित्येस**, मीं **बोलित्यें**, यां मध्यें हा नियम राहतो. आणखी पुणेंप्रांतींहि याच प्रमाणें बोलण्याची रूढि आहे, व तेथील रीतीचें सर्व महाराष्ट्र देशीं प्राधान्य आहे, अशा दोन कारणां वरून या रूपांस एथें पहिलें स्थान दिलें आहे.

४९० आतां—**करिते, देते, ठेविते, येते, असते, वसते,**

अशींहि कोणी बहुतकरून स्त्रीलिंगाचीं रूपें लिहितात; परंतु हीं संकेतार्थीं वर्तमानकाळीं पुल्लिंगीं तृतीय पुरुषीं अनेक वचनाचीं रूपें होत असें जाणावें.–'शास्त्रीबावा जर त्या समयीं त्यांचीं गोष्ट मान्य **करिते**, तर ते आपला पूर्ण विश्वास त्यांज वरच **ठेविते**,' यांत **करिते**, **ठेविते**, हीं सांकेतिक रूपें जाणावीं. आणि 'ती बाई स्वयंपाक चांगला **करित्ये**,' 'ती आपले सर्व डागिणे माहेरीं **ठेविसे**,' यांत **करित्ये**, **ठेविसे**, हीं स्वार्थी वर्तमानकाळीं स्त्रीलिंगाचीं रूपें जाणावीं; असा भेद बाळगावा म्हणजे या रूपां मध्यें नियम राहून अव्यवस्था होणार नाहीं.

या वर सांगितल्या नियमा वर शिकणारांनीं विशेषें करून लक्ष द्यावें अशी माझी इच्छा आहे.

साष्टी प्रांतांतील रहिवासी लोकां मध्यें कांहीं जातींत पुल्लिंगीं द्वितीय आणि तृतीय पुरुषीं–तूं **असत्येस**, तूं **करत्येस**; तो **करत्ये**, तो **बोलत्ये**; अशीं स्त्रीलिंगा सारखीं रूपें करून बोलण्याची चाल आहे. तसेंच अनेक वचनीं **करतान**, **असतान**, असें बोलितात. परंतु ही बोलण्याची रीत फार वाईट; ईत कांहीं मर्दानी डौल दिसत नाहीं, यास्तव अशी घाणेरडी रीत सर्वीहीं टाकून वर सांगितली जी सर्वप्रसिद्ध व सर्वमान्य ती घ्यावी ह्मणजे नीट. तसेंच अस्सल देशस्थांमध्यें–त्या **करित्यात**, **बोलित्यात**, आणि कोंकणस्थां मध्यें –**केलेन**, **घेतलेन**, **सांगितलेन**, अशीं विलक्षण रूपें साधून बोलतात, हेंहि तसेंच ओंगळ.

## अपूर्णवर्तमान काळ.

| पुरुष० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असत आहें. | आम्हीं असत आहों. |
| द्वि० | तूं असत आहेस. | तुम्हीं असत अहां-हा. |

तृ० { तो-ती-तें असत आहे. { ते-त्या-तीं असत आहेत, अ० असताहेत.

यांत पुल्लिंगीं रूपें लिहिलीं आहेत, या करून लिंगांतराचीं रूपें साधावीं.

अंमळ नेट देऊन बोलायाचें असतां या काळीं वर्तमानकालवाचक धातुसाधिता पुढें सहाय धातु न लावितां शुद्ध वर्तमान काळाच्या रूपां पुढें ते धातु लावितात; जसें—

| पुरुष० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असतों आहें. | आह्मीं असतों आहों. |
| द्वि० | तूं असतोस आहेस, अ० असतो आहेस. | तुह्मीं असतां अहां. |
| तृ० | तो असतो आहे. | ते असताहेत, अ० असतात आहेत. |

या ठिकाणीं—'तूं असतो आहेस,' 'तूं करितो आहेस,' असेंहि लिहिण्याचा परिपाठ आहे. परंतु केवळ व्याकरणदृष्टीनेंच पाहिलें तर —**असतोस आहेस, करितोस आहेस**, हें कांहींसें शुद्ध होय; परंतु असें ह्मणण्याचा प्रघात कोंकणांतच आहे. तसेंच देशा वर **आहे** यांतील **आ**चा लोप करून पुढलीं अक्षरें मात्र धातुसाधिता पुढें कित्येक पुरुषीं योजितात; जसें—मीं **करितोंहें**, तूं **करितोहेस**, तो **करितोहे**, ते **करिताहेत**, इ०. या शेवटल्या प्रकारची बोलण्याची व लिहिण्याची रूढि विशेष आहे.

## रीतिवर्तमान काळ.

### पुल्लिंग.

| पुरुष० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असत असतों. | आह्मीं असत असतों. |
| द्वि० | तूं असत असतोस. | तुह्मीं असत असतां-ता. |

तृ० तो असत असतो. ते असत असतात.
या वरून अन्य लिंगांचीं रूपें जाणावीं.

### भूत काळ.

## प्रकार १.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होतों. | आह्मीं होतों. |
| द्वि० | तूं होतास. | तुह्मीं होतेत-होतां. |
| तृ० | तो होता. | ते होते. |

स्त्रीलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होत्यें. | आम्हीं होतों. |
| द्वि० | तूं होतीस. | तुम्हीं होत्यात—होतींत-होतां. |
| तृ० | ती होती. | त्या होत्या. |

नपुंसकलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होतें | आम्हीं होतों |
| द्वि० | तूं होतेंस | तुम्हीं होतींत. |
| तृ० | तें होतें | तीं होतीं. |

## प्रकार २.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असलों. | आम्हीं असलों. |
| द्वि० | तूं असलास. | तुम्हीं असलेत.—असलां. |
| तृ० | तो असला. | ते असले. |

## स्त्रीलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असल्यें. | आह्मी असलों. |
| द्वि० | तूं असलीस. | तुह्मी असल्यात—असलींत—असलां. |
| तृ० | ती असली. | त्या असल्या. |

## नपुंसकलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असलें. | आह्मी असलों. |
| द्वि० | तूं असलेंस. | तुह्मी असलींत. |
| तृ० | तें असलें. | तीं असलीं. |

मागें १९८व्या पृष्ठांत ४८८व्या नियमा खालीं टिपेंत सांगितलेंच आहे कीं, या दुसऱ्या प्रकारच्या रूपांचा स्वार्थी भूत काळीं प्रयोग होत नाहीं. संशयार्थीं मात्र होतो.

## अपूर्णभूत काळ

### पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असत होतों. | आह्मी असत होतों. |
| द्वि० | तूं असत होतास. | तुह्मी असत होतेत—होतां. |
| तृ० | तो असत होता. | ते असत होते. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

## रीतिभूत काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असें, अ० असत असें. | आह्मी असों, अ० असत असों. |

| | | |
|---|---|---|
| द्वि० | तूं असेस, अ० असत असेस. | तुह्मी असा, अ० असत असा. |
| तृ० | तो असे, अ० असत असे. | ते-त्या-तीं असत, अ० असत असत. |

स्त्रीलिंगीं—मीं अस्यें, असत अस्यें; तूं अस्येस; ती अस्ये; इ० रूपें व्याकरणशुद्ध जाणावीं. परंतु अशा रीतीनें लिहिण्याचा प्रघात नाहीं; ह्मणोन तिन्ही लिंगीं सारखींच रूपें लिहावीं.

यांतून पहिल्या प्रकारच्या रूपांचा वर्तमान काळीं-हि प्रयोग करितात. परंतु विशेषेंकरून ग्रंथांत.

## पूर्णभूत काळ.

### पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असता झालों. | आह्मीं असते झालों. |
| द्वि० | तूं असता झालास. | तुह्मीं असते झाले-त. |
| तृ० | तो असता झाला. | ते असते झाले. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

अस धातूस भूतभूत आणि वर्तमानभूत हे काळ नाहींत.

## भविष्यभूत काळ.

| पुरु० | एकव० | अनेक० |
|---|---|---|
| प्र० | मीं असणार होतों. | आह्मीं असणार होतों. |
| द्वि० | तूं असणार होतास. | तुह्मीं असणार होतेत-होतां. |
| तृ० | तो असणार होता. | ते असणार होते. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

## भविष्य काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असेन. | आह्मीं असूं. |

| | | |
|---|---|---|
| द्वि० | तूं असशील. | तुह्मी असाल. |
| तृ० | तो-ती-तें असेल. | ते-त्या-तीं असतील. |

## अपूर्णभविष्य काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असत असेन. | आह्मीं असत असूं, |
| द्वि० | तूं असत असशील. | तुह्मीं असत असाल. |
| तृ० | तो असत असेल. | ते-त्या-तीं-असत असतील. |

## वर्तमानभविष्य काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असणार आहें. | आम्हीं असणार आहों. |
| द्वि० | तूं असणार आहेस. | तुम्हीं असणार अहां-त. |
| तृ० | तो-ती-तें असणार आहे. | ते-त्या-तीं असणार आहेत. |

अस धातूचा भूतभविष्य आणि भविष्यभविष्य या काळीं प्रशस्त रीतीनें प्रयोग होत नाहीं.

## आज्ञार्थ.

## वर्तमान काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असूं. | आम्हीं असूं. |
| द्वि० | तूं अस-ऐस. | तुम्हीं असा. |
| तृ० | तो-ती-तें असो. | ते-त्या-तीं असोत. |

४९१ यांत तृतीय पुरुषीं बहुतकरून दोन प्रकारचीं रूपें आढळतात; एक ऊकारान्त आणि एक ओकारान्त, म्हणजे कोणी—करू, करूत; आणि कोणी-करो, करोत; अशा रूपांनीं बोलतात व लिहितात. हा भेद बहुधा देशपरत्वें व कोंकणपरत्वें होतो. कोंकणांत पं-

हिल्या आणि देशीं दुसऱ्या प्रकारच्या रूपांची विशेषें-करून प्रवृत्ति आहे. त्यांत आणखी असा नियम आढळतो कीं अकर्मक धातु असतां बहुधा ओकाराची, आणि सकर्मक असतां ऊकाराची, प्रवृत्ति असत्ये. परंतु हा नियम प्राचीन भाषेंत चालत नाहीं. तींत विशेषेंकरून ओकाराचीच प्रवृत्ति अधिक आढळत्ये. तसेंच प्रयोजक धातूंसहि हा नियम लागत नाहीं.

आणखी दुसरा एक असा नियम आढळतो कीं सकर्मकाकर्मकाचा भेद न ठेवितां एकाक्षरी धातु असल्यास त्यास बहुधा ऊकार होतो; जसें—जाऊत होऊत, न्हाऊत, खाऊत, देऊत, इ०.

हे नियम सर्वत्र चालतात असें नाहीं, परंतु जेथें संशय उत्पन्न होईल तेथें या नियमा वर लक्ष दिलें असतां फार उपयोग पडेल.

## विध्यर्थ.

### वर्तमान काळ.

### कर्तरिप्रयोग.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असावा. | आम्हीं असावे. |
| द्वि० | तूं असावास | तुम्हीं असावेत. |
| तृ० | तो असावा. | तेअसावे,अ०असावेत. |

स्त्रीलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असावी. | आम्हीं असाव्या. |
| द्वि० | तूं असावीस. | तुम्हीं असाव्यात. |
| तृ० | ती असावी. | त्या असाव्या-त. |

नपुंसकलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असावें. | आह्मीं असावीं. |
| द्वि० | तूं असावेंस. | तुह्मीं असावींत. |
| तृ० | तें असावें. | तीं असावीं-त. |

भावीप्रयोग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र | मीं अ०म्यां असावें. | आह्मीं असावें. |
| द्वि० | तूं अ० त्वां असावें. | तुह्मीं असावें. |
| तृ० | त्याणें—तिणें असावें. | त्यांहीं असावें. |

४९२ या विध्यर्थाच्या वर्तमानकाळाच्या रूपांचा भूतकाळींहि प्रयोग होतो; जसें– 'काल मीं तेथें जावें,' ( ह्म०जावें होतें, अथवा जायाचें होतें ),'ह्मटलें असतां गेल्या वर्षींच त्याचें लग्न व्हावें.'

अपूर्णवर्तमान काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं अ० म्यां असत असावें. | आह्मीं असत असावें. |
| द्वि० | तूं अ० त्वां असत असावें. | तुह्मीं असत असावें. |
| तृ० | त्याणें-तिणें असत असावें. | त्यांहीं असत असावें. |

या काळीं कर्मणिप्रयोगहि होतो.

रीतिवर्तमान काळ.

कर्तरिप्रयोग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असत असावा. | आह्मीं असत असावे. |
| द्वि० | तूं असत असावास. | तुह्मीं असत असावेत. |
| तृ० | तो असत असावा. | ते असत असावे. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

या काळीं भावीप्रयोग प्रशस्त.

## भूत काळ.

### कर्तरिप्रयोग.

#### पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असावा होतों, अ० असायाचा होतों. | आह्मीं असावे होतों, अ० असायाचे होतों. |
| द्वि० | तूं असावा होतास, अ० असायाचा होतास. | तुह्मीं असावे होतेत, अ० असायाचे होतेत. |
| तृ० | तो असावा होता, अ० असायाचा होता. | ते असावे होते, अ० असायाचे होते. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

### भावीप्रयोग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं अ० म्यां असावें होतें, अ० असायाचें होतें. | आह्मीं असावें होतें, अ० असायाचें होतें. |
| द्वि० | तूं अ० त्वां असावें होतें, अ० असायाचें होतें. | तुह्मीं असावें होतें, अ० असायाचें होतें. |
| तृ० | त्याणें-तिणें असावें होतें, अ० असायाचें होतें. | त्यांहीं असावें होतें, अ० असायाचें होतें. |

४९३ 'मी असत असावें होतें,' असा या अस धातूचा विध्यर्थी अपूर्णभूत काळाचा प्रयोग बहुधा होत नाहीं; परंतु-' त्याणें त्या काळीं लिहित असावें अ०

असायाचें होतें,' असा हा सहाय धातु असतां प्रयोग केला तर हा विध्यर्थी अपूर्णभूत काळ जाणावा.

४९४ विध्यर्थी रीतिभूत, पूर्णभूत, भूतभूत, हे काळ नाहींत.

४९५ या **अस** धातूस वर्तमानभूत काळ नाहीं, ह्मणोन याच्या स्थानीं इतर धातु उदाहरणा करतां त्या काळीं चालवून दाखवितों.

## वर्तमानभूत काळ.

## कर्तरिप्रयोग.

### पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं गेलों असावा. | आह्मीं गेलों असावे. |
| द्वि० | तूं गेला असावास. | तुह्मीं गेले असावेत. |
| तृ० | तो गेला असावा. | ते गेले असावे. |

### स्त्रीलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं गेल्यें असावी-व्यें. | आह्मीं गेलों असाव्या. |
| द्वि० | तूं गेली असावीस. | तुह्मीं गेल्या असाव्यात. |
| तृ० | ती गेली असावी. | त्या गेल्या असाव्या. |

### नपुंसकलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं गेलें असावें. | आह्मीं गेलीं असावीं. |
| द्वि० | तूं गेलें असावेंस. | तुह्मीं गेलीं असावींत. |
| तृ० | तें गेलें असावें. | तीं गेलीं असावीं. |

**विध्यर्थी भविष्यभूत काळ नाहीं.**

## भविष्य काळ.

### कर्तरिप्रयोग.

#### पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असणार असावा. | आह्मीं असणार असावे. |
| द्वि० | तूं असणार असावास. | तुह्मीं असणार असावेत. |
| तृ० | तो असणार असावा. | ते असणार असावे. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

विध्यर्थी भविष्य काळाचे दुसरे प्रकार नाहींत. हीं जीं रूपें सांगितलीं यांचा भविष्य काळ मानावा. अथवा वर्तमान भविष्य मानिला असतांहि चिंता नाहीं.

४९६ कोणी कोणी केव्हां या विध्यर्थी कर्तरिप्रयोग असतां वर्तमान, रीतिवर्तमान, वर्तमानभूत, भविष्य, इत्यादि काळीं तृतीय पुरुषीं त हें अक्षर जोडूनहि अनेकवचनाचीं रूपें साधितात; जसें–ते असावेत, त्या असाव्यात, तीं असावींत; ते असत असावेत, त्या गेल्या असाव्यात, तीं असणार असावींत, इ०. हीं रूपें हा असा कर्तरिप्रयोग असतां फारशीं सदोष ह्मणतां येणार नाहींत. परंतु कर्मणिप्रयोग असतां तृतीय पुरुषाच्या अनेकवचनीं तर असा हा त उगीच लहानशा पायखुंटी सारखा निरर्थक दिसतो,'त्याणें त्यास पांच घोडे द्यावेत, देत असावेत; पांच गाई दिल्या असाव्यात, पांच वस्त्रें दिलीं असावींत,' इ०, अशा स्थळीं हा त इष्ट दिसत नाहीं.

## संशयार्थ.

### वर्तमान काळ.

### कर्तरिप्रयोग.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असत असलों. | आह्मीं असत असलों. |
| द्वि० | तूं असत असलास. | तुह्मीं असत असलेत. |
| तृ० | तो असत असला. | ते असत असले. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

अस धातूस संशयार्थी भूत काळ नाहीं, म्हणोन त्याच्या स्थानीं दुसरा धातु उदाहरणाकरतां त्या काळीं चालवून दाखवितों.

### भूत काळ.

### कर्तरिप्रयोग.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेक० |
|---|---|---|
| प्र० | मीं गेलों असलों, अ० गेला असलों. | आम्हीं गेलों असलों. अ० गेले असलों. |
| द्वि० | तूं गेला असलास, अ० गेलास असलास. | तुम्हीं गेले असलेत, अ० गेलेत असलेत, अ० गेलां असलां. |
| तृ० | तो गेला असला. | ते गेले असले. |

स्त्रीलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं गेल्यें असल्यें, अ० गेली असल्यें. | आम्हीं गेलों असलों, अ० गेल्या असलों. |

| | | |
|---|---|---|
| द्वि० | तूं गेली असलीस, अ० गेलीस असलीस. | तुम्हीं गेल्या असल्यात, अ० गेल्यात असल्यात, अ० गेलां असलां. |
| तृ० | ती गेली असली. | त्या गेल्या असल्या. |

नपुंसकलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं गेलें असलें. | आम्हीं गेलीं असलों. |
| द्वि० | तूं गेलें असलेंस. अ० गेलेंस असलेंस. | तुम्हीं गेलीं असलींत. अ० गेलींत असलींत. |
| तृ० | तें गेलें असलें. | तीं गेलीं असलीं. |

भविष्य काळ.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असणार असलों. | आम्हीं असणार असलों. |
| द्वि० | तूं असणार असलास. | तुम्हीं असणार असलेत. |
| तृ० | तो असणार असला. | ते असणार असले. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

वर्तमानभविष्य काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असत असेन. | आह्मीं असत असूं. |
| द्वि० | तूं असत असशील. | तुह्मीं असत असाल. |
| तृ० | तो-ती-तें असत असेल. | ते-त्या-तीं-असत असतील. |

भूतभविष्य काळ.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असलों असेन, अ० असला असेन. | आह्मीं असलों असूं, अ० असले असूं. |

| | | |
|---|---|---|
| द्वि० | तूं असला असशील. | तुह्मीं असले असाल. |
| तृ० | तो असला असेल. | ते असले असतील. |

या वरून इतर लिंगाचीं रूपें जाणावीं.

## भविष्यभविष्य काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असणार असेन. | आह्मीं असणार असूं. |
| द्वि० | तूं असणार असशील. | तुह्मीं असणार असाल. |
| तृ० | तो-ती-तें असणार असेल. | ते-त्या-तीं असणार असतील. |

## संकेतार्थ.

## भूत काळ.

## कर्तरिप्रयोग.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असतों. | आह्मीं असतों. |
| द्वि० | तूं असतास, | तुह्मीं असतेत, अ० असतां. |
| तृ० | तो असता. | ते असते. |

स्त्रीलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असत्यें. | आह्मीं असतों. |
| द्वि० | तूं असतीस. | तुह्मीं असत्यात, असतांत, अ० असतां. |
| तृ० | ती असती. | त्या असत्या. |

नपुंसकलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असतें. | आह्मीं असतों. |

| | | |
|---|---|---|
| द्वि० | तूं असतेस. | तुह्मीं असतांत. |
| तृ० | तें असतें. | तीं असतीं. |

## अपूर्णभूत काळ.

### पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असत असतों. | आह्मीं असत असतों. |
| द्वि० | तूं असत असतास. | तुह्मीं असत असतेत. |
| तृ० | तो असत असता. | ते असत असते. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

## भूतभूत काळ.

### पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असलों असतों. | आह्मीं असलों असतों. |
| द्वि० | तूं असला असतास. | तुह्मीं असले असतेत, अ० असलां असतां. |
| तृ० | तो असला असता. | ते असले असते. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

## धातुसाधितें.

### नामें आणि विशेषणें.

| | |
|---|---|
| असणें.... .... .... .... | क्रियावाचक. |
| असता, असणार, असणारा. | कर्तृवाचक. |
| असला, असलेला .... .... | कर्मवाचक. |

### अव्ययें.

| | |
|---|---|
| असत, असतां, असतांनां, असत असतां, असत असतांनां. | वर्तमानकालवाचक. |
| असले असतां-नां . . . . . . . . | भूतकालवाचक. |

असून ............................ पूर्वकालवाचक.
असूं, असायास, असावयास........... निमित्तवाचक.
असावें, असायाचें, असावयाचें, असणें. विधिवाचक.

या अस धातूस प्रयोजक भेद नाहीं.

### शक्यभेद.

### स्वार्थ.

### वर्तमान काळ.

### भावीप्रयोग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | माझ्यानें अ० मला असवतें. | आमच्यानें, अ० आह्माला असवतें. |
| द्वि० | तुझ्यानें अ० तुला असवतें. | तुमच्यानें अ० तुह्माला असवतें. |
| तृ | त्याच्यानें अ० त्याला असवतें; तिच्यानें अ० तिला असवतें. | त्यांच्यानें अ० त्यांना असवतें. |

याच प्रमाणें जर शक्यभेदीं सर्वपुरुषीं रूपें दाखविलीं तर उगीच ग्रंथविस्तार होईल; ह्मणोन त्या त्या अर्थीं, त्या त्या प्रयोगीं, त्या त्या काळीं, प्रथमपुरुषीं मात्र हीं रूपें चालवून दाखवितों. परंतु या अस धातूचीं शक्यभेदीं सर्वकाळीं रूपें साधतात असें होत नाहीं; ह्मणोन, याच्या ठिकाणीं चाल धातू घेऊन त्याचीं रूपें खालीं दाखविलीं आहेत.

# प्रयोगभेद.

## स्वार्थ.

### भावीप्रयोग.

माझ्यानें अ० मला चालवतें............ वर्तमान.
माझ्यानें अ० मला चालवत आहे .... अपूर्णवर्तमान.
माझ्यानें अ० मला चालवत असतें.... रीतिवर्तमान.
माझ्यानें अ० मला चालवलें ........ भूत.
माझ्यानें अ० मला चालवत होतें.... अपूर्णभूत.
माझ्यानें अ० मला चालवे, अ० चालवत असे. रीतिभूत.
माझ्यानें अ० मला चालवतें आलें........पूर्णभूत.
माझ्यानें अ० मला चालवलें होतें........भूतभूत.
माझ्यानें अ० मला चालवलें आहे........वर्तमानभूत.
माझ्यानें अ० मला चालवणार होतें....भविष्यभूत.
माझ्यानें अ० मला चालवेल ............भविष्य.
माझ्यानें अ० मला चालवत असेल ....अपूर्णभविष्य.
माझ्यानें अ० मला चालवणार आहे....वर्तमानभविष्य.
माझ्यानें अ० मला चालवलें असेल ....भूतभविष्य.
माझ्यानें अ० मला चालवणार असेल ....भविष्यभविष्य.

### आज्ञार्थ.

माझ्यानें अ० मला चालवो ............वर्तमान.

### विध्यर्थ.

माझ्यानें अ० मला चालवावें ............वर्तमान.
माझ्यानें अ० मला चालवत असावें.... रीतीवर्तमान.
माझ्यानें अ० मला चालवावें होतें, चालवायाचें होतें .... } भूत.

यास भविष्य काळ नाहीं.

## संभवार्थ.

माझ्यानें अ० मला चालवत असलें. वर्तमान.
माझ्यानें अ० मला चालवलें असलें. भूत.
माझ्यानें अ० मला चालवणार असलें. भविष्य.
माझ्यानें अ० मला चालवत असेल. वर्तमानभविष्य.
माझ्यानें अ० मला चालवलें असेल. भूतभविष्य.
माझ्यानें अ० मला चालवणार असेल. भविष्यभविष्य.

## संकेतार्थ.

माझ्यानें अ० मला चालवतें........ वर्तमान.
माझ्यानें अ० मला चालवत असतें.... रीतिवर्तमान.
माझ्यानें अ० मला चालवलें असतें.... भूत.

शक्यभेदीं धातुसाधितें, व कित्येक अर्थीं कित्येक काळांचीं रूपें, होत नाहींत; कारण, त्यांत धातूच्या ठायीं भावकर्तृत्वविशिष्ट अर्थ असतो; आणखी शक्य भेदीं आणि प्रयोजक भेदीं या रूपांचें उच्चारण बहुधा सारखेंच होतें; ह्मणोन यद्यपि बलात्कारानें या शक्यभेदीं धातुसाधितें, व कित्येक अर्थीं कित्येक काळांचीं रूपें साधिलीं, तथापि त्यांच्या ठायीं प्रयोजक भेदाची भ्रांति होत्ये; जसें—**चालवतां, चालवून, चालवणार**, इ०हीं शक्यभेदीं, आणि—**चालवितां, चालवून, चालविणार**, इ०हीं प्रयोजक भेदीं, धातुसाधितें केलीं, तथापि यांच्या उच्चारणांत फारसा भेद दिसत नाहीं, आणि शक्यभेदीं धातुसाधितांचा प्रयोग, व कित्येक अर्थीं कित्येक काळांच्या रूपांचा प्रयोग, कधींहि करण्यांत येत नाहीं, ह्मणोन त्यांचीं रूपें एथें दाखविलीं नाहींत.

आतां या प्रमाणें सर्व सहाय धातु चालवून दाखविले तर ग्रंथ फार वाढेल. या **अस** धातू वरून इतर

धातूंचीं प्रयोग, अर्थ, काळ, पुरुष, वचन, एतत्परत्वें, कसकशीं रूपें होतात हें शिकणारांनीं जाणावें.

४९७ **अस** धातूच्या मागें **न** या अव्ययाचा योग केला असतां **नसणें** असा तत्प्रतिपक्षी एक नवा धातु (अथवा क्रियापद म्हणा) व्युत्पन्न होतो;याचीं रूपें **अस** धातूच्या सारखीं चालतात. वर्तमान काळीं **अस** धातु प्रमाणें याचीं तीन प्रकारचीं रूपें, आणि भूतकाळीं दोन प्रकारचीं रूपें होतात, तीं दाखवितों.

## नस*धातु.

### अकरण रूप.

### मूलरूप भेद.

### स्वार्थ.

### कर्तरिप्रयोग.

### वर्तमान काळ.

प्रकार १.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नाहीं. | आह्मीं नाहीं. |
| द्वि० | तूं नाहींस. | तुह्मीं नाहीं-त. |
| तृ० | तो—ती—तें—नाहीं. | ते—त्या—तीं—नाहींत. |

प्रकार २.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नव्हे. | आह्मीं नव्हों. |

* जसें कित्येक **अस** या धातूचीं **आहे, होता**, हीं रूपें मानित नाहींत, **आहे** हें केवळ निराळें क्रियापद मानितात; तसें ते **नाहीं, नव्हे, नव्हता**, हीं **नस** धातूचीं रूपें मानित नाहींत; **नाहीं** हें निराळें क्रियापद मानितात.

| | | |
|---|---|---|
| द्वि० | तूं नव्हेस—नव्हस. | तुह्मीं नव्हां. |
| तृ० | तो—ती—तें नव्हे. | ते-त्या-तीं नव्हेत अ० नव्हत. |

प्रकार ३.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नसतों. | आह्मीं नसतों. |
| द्वि० | तूं नसतोस. | तुह्मीं नसता-तां. |
| तृ० | तो नसतो. | ते नसतात. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

भूतकाळ.

प्रकार १.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नव्हतों. | आह्मीं नव्हतों. |
| द्वि० | तूं नव्हतास. | तुह्मीं नव्हतेत, नव्हतां. |
| तृ० | तो नव्हता. | ते नव्हते. |

प्रकार २.

पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नसलों. | आह्मीं नसलों. |
| द्वि० | तूं नसलास. | तुह्मीं नसलेत, नसलां. |
| तृ० | तो नसला. | ते नसले. |

या वरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

**अस** धातू प्रमाणें या दुसऱ्या प्रकारच्या भूत काळाचा प्रयोग संशयार्थीं मात्र होतो.

या प्रमाणें **नस** धातूचीं वर्तमान काळीं तीन, आणि भूत काळीं दोन, प्रकारचीं रूपें होतात तीं सांगितलीं; जेथें **अस** धातु माहात्म्यकारक असतां प्रयोजिला जातो, तेथें **नस** धातूचीं त्या त्या प्रकारचीं रूपें योजिलीं असतां अकरणरूपीं क्रियापदाचीं रूपें होतात.

४९८ एथें **हो**, दे, या धातूंचीं प्रथम पुरुषीं एकवचनाचीं सर्व रूपें लिहून दाखवितों, या वरून शिकणारांनीं इतर पुरुषांचीं रूपें जाणावीं. यांत ज्या काळाचीं रूपें कांहीं रीतिनिराळीं होतात, व जीं रूपें सांगणें अवश्य आहे, तीं संपूर्ण चालवून दाखविलीं आहेत. असें न केलें तर हे धातु चालविण्यांतच हा ग्रंथ बहुधा आटोपेल.

**हो धातु.**

**करण रूप.**

**मूळरूप भेद.**

**स्वार्थ.**

**कर्तरिप्रयोग.**

मीं होतों.................... वर्तमान.
मीं होत आहें....................अपूर्णवर्तमान.
मीं होत असतों.................. रीतिवर्तमान.
मीं झालों ...................... भूत.
मीं होत होतों.................. अपूर्णभूत.

**रीतिभूत.**

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होईं अ० होत असें. | आह्मीं होऊं, अ० होत असूं. |
| द्वि० | तूं होईस, अ० होस, अ० होत असेस. | तुह्मीं व्हा, अ० होत असा. |

| | | |
|---|---|---|
| तृ० | तो–ती–तें होई, अ० होत असे. | ते–त्या–तीं होत, अ० होत असत. |

मीं होता झालों . .... .... .... .... पूर्णभूत.
मीं झालों होतों . .... .... .... .... भूतभूत.
मीं झालों आहें . .... .... .... .... वर्तमानभूत.
मीं होणार होतों .... .... .... .... भविष्यभूत.

## भविष्यकाळ.

| पुरु० | एकव० | अनेकव |
|---|---|---|
| प्र० | मीं होईन. | आह्मीं होऊं. |
| द्वि० | तूं होशील. | तुह्मीं व्हाल. |
| तृ० | तो–ती तें होईल. | ते–त्या–तीं होतील. |

मीं होत असेन ................ अपूर्णभविष्य.
मीं होणार आहें................ वर्तमानभविष्य.
मीं झालों असेन................ भूतभविष्य.
मीं होणार असेन................ भविष्यभविष्य.

## आज्ञार्थ.

## वर्तमान काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होऊं. | आह्मीं होऊं. |
| द्वि० | तूं हो. | तुह्मीं व्हा. |
| तृ० | तो–ती–तें होऊ. | ते त्या–तीं होऊत. |

## विध्यर्थ.

## भावीप्रयोग.

मीं अ० म्यां व्हावें . ..........वर्तमान.
मीं अ० म्यां होत असावें .... रीतिवर्तमान.

## कर्तरिप्रयोग.

मीं व्हावा ...................वर्तमान.

मीं होत असावा ................रीतिवर्तमान.

## भावीप्रयोग.

मीं अ० म्यां व्हावें होतें,<br>अ० व्हायाचें होतें. } भूत.

## कर्तरिप्रयोग.

मीं व्हावा होतों, अ०<br>व्हायाचा होतों. } भूत.

मीं झालों असावा ................वर्तमानभूत.

मीं होणार असावा.... .... .... भविष्य.

## संशयार्थ.

मीं होत असलों................ वर्तमान.

मीं झाला असलों, अ०<br>झालों असलों. } . . भूत

मीं होणार असलों............ भविष्य.

मीं होत असेन.... ............ वर्तमानभविष्य.

मीं झालों असेन..................भूतभविष्य.

मीं होणार असेन................भविष्यभविष्य.

## संकेतार्थ.

## कर्तरिप्रयोग.

मीं होतों, तूं होतास................ भूत.

मीं होत असतों, तूं होत असतास....अपूर्णभूत.

मीं झालों असतों...............— भूतभूत.

## धातुसाधितें.

## नामें आणि विशेषणें.

होणें ........................ क्रियावाचक.

होता, होणार, होणारा. ........कर्तृवाचक.

झाला, झालेला ..................कर्मवाचक.*

## अव्ययें.

होत, होतां, होतांनां; होत असतां, होत असतांनां. ... वर्तमानकालवाचक.

पुराणिक, कथेकरी, व प्रौढ वक्ते, यांच्या प्रौढ भाषणाच्या शैलींत या रूपांच्या व अस धातूच्या वर्तमानकालवाचक व पूर्वकालवाचक अव्ययाच्या स्थानीं **होत्साता**, व कधीं लिंगवचनपरत्वें **होत्साता, होत्साती, होत्सातें** इ० अशींहि संक्षिप्त रूपें बोलण्यांत येतात असें वारंवार आपणास आढळतें. उदाह०—'तो राजा परम उदार होत्साता आपल्या प्रजेस मोठा प्रियकर झाला,' 'ती अलंकार करित होत्साती महालांत बसली होती,' इ०.

झालें असतां, झालें असतांनां ........भूतकालवाचक.

होऊन..............................पूर्वकालवाचक.

होऊं,व्हायास, व्हावयास,..........निमित्तवाचक.

व्हावें, व्हायाचें, व्हावयाचें, होणें ..विधिवाचक.

४९९ या हो धातूस प्रयोजक भेद नाहीं.

## शक्य भेद.

### स्वार्थ.

५०० **हो** या धातूच्या अंगीं मूलरूपभेद असतां शक्यभेदाचा जो अर्थ त्याचीहि संभावना असत्ये, ह्मणोन मुलरूपभेदाचीं जीं रूपें त्यांचा प्रयोग बहुधा शक्यभेदींहि करितात.

माझ्यानें अ० मला होतें, अ० होववतें .... वर्तमान.

माझ्यानें अ० मला होत आहे, अ० होववत आहे. ..अपूर्णवर्तमान.

---

*पहा नि०४९५,पृ०१८८

| | | |
|---|---|---|
| माझ्यानें अ० मला | होत असतें, अ० होववत असतें. | रीतिवर्तमान. |
| माझ्यानें अ० मला | झालें, अ० होववलें... | भूत. |
| माझ्यानें अ० मला | होत होतें, अ० होववत होतें. | अपूर्णभूत. |
| माझ्यानें अ० मला | होई,* अ० होववे, होत असे, अ० होववत असे. | रीतिभूत. |
| ———— | होतें झालें, अ० होववतें झालें.* | पूर्णभूत. |
| ———— | झालें होतें, अ० होववलें होतें.* | भूतभूत. |
| ———— | झालें आहे.......... | वर्तमानभूत. |
| ———— | होणार होतें, अ० होववणार होतें. | भविष्यभूत. |
| ———— | होईल, अ० होववेल..... | भविष्य. |
| ———— | होत असेल, अ० होववत असेल. | अपूर्णभविष्य. |
| ———— | होणार आहे, अ० होववणार आहे. | वर्तमानभविष्य. |
| ———— | झालें असेल. अ० होववलें असेल. | भूतभविष्य. |

## आज्ञार्थ.

माझ्यानें अ० मला होऊ, अ० होववो—वर्तमान.

---

* रीतिभूत, पूर्णभूत, भूतभूत, विध्यर्थी वर्तमान इ० काळीं अशा प्रकारच्या कित्येक रूपांचा यद्यपि बोलण्यांत प्रचार नाहीं, तथापि वर जो काळाचा अनुक्रम सांगितला आहे त्यास अनुसरून एथें सारीं रूपें दाखविलीं आहेत.

## विध्यर्थ.

माझ्यानें अ० मला व्हावें* ............वर्तमान.

---- होत असावें, अ० होववत असावें. } अपूर्णवर्तमान.

माझ्यानें अ० मला व्हावें होतें, अ० व्हायाचें होतें. } ....भूत.

---- झालें असावें अ० होववलें असावें. } वर्तमानभूत.

---- होणार असावें अ० होववणार असावें. } भविष्य.

## संशयार्थ.

माझ्यानें अ० मला होत असलें, अ० होववत असलें. } वर्तमान.

---- झालें असलें, अ० होववलें असलें. } भूत.

---- होणार असलें, अ० होववणार असलें. } भविष्य.

---- होत असेल, अ० होववत असेल. } वर्तमानभविष्य.

---- झालें असेल, अ० होववलें असेल. } भूतभविष्य.

---- होणार असेल, अ० होववणार असेल. } भविष्यभविष्य.

## संकेतार्थ.

माझ्यानें अ० मला होतें, अ० होववतें.. भूत.

| | | |
|---|---|---|
| माझ्यानें अ० मला होत असतें, अ० होववत असतें. | | अपूर्णभूत. |
| | झालें असतें, अ० होववलें असतें. | भूतभूत. |

वस्तुतः सर्व अकर्मक धातूं वरून शक्यभेद असतां मूलरूपभेदाचा प्रयोग केव्हां केव्हां करण्यांत येतो; जसें—माझ्यानें चालतें, बसतें, होतें, इ० उदाह०—'माझ्यानें जर तें काम चालतें, तो गाडा लोटता, तें कार्य आवरतें, तर त्यां चालविलें असतें, लोटिला असता, आवरिलें असतें.' परंतु मूलरूपभेदाचीं रूपें, आणि शक्यभेदाचीं रूपें, यां दोहां मध्यें सूक्ष्म भेद असा आहे कीं मूलरूपभेद असतां शुद्ध अकर्मकत्वाचा बोध होतो, आणि शक्यभेद असतां शक्यार्थान्वित अकर्मकत्वाचा बोध होतो; जसें—'हा खिळा माझ्यानें अ० मला बसतो,' आणि 'हा खिळा माझ्यानें बसवतो;' यां मध्यें पहिल्या उदाहरणांत—'मीं जो त्यानें हा खिळा बसतो,' असा शुद्ध अकर्मकत्वार्थ इंगित होतो; आणि दुसऱ्या उदाहरणांत—'मीं जो त्या कडून अथवा त्याच्या द्वारें हा खिळा बसला जातो, बसायास शक्य अथवा योग्य होतो,' असा शक्यार्थान्वित-अकर्मकत्वार्थ इंगित होतो. असा सूक्ष्म अर्थभेद आहे म्हणोनच—'माझ्यानें अ० मला ब्राम्हण होववेल तर मी होईन,' 'माझ्यानें अ० मला जर त्या वेळीं ओंवळें होववतें तर मी ओंवळा होऊन त्यास मारिलें असतें,' असा शक्यभेदीं प्रयोग होतो. परंतु—'माझ्यानें ब्राम्हण होईल इ०,' अथवा 'ओंवळें होतें इ०', असा, प्रयोग होत नाहीं.

६०१ आतां क्रियापदांच्या कोणत्याहि रूपाचें व्याकरण करितां यावें ह्मणोन खालीं दे या सकर्मक धातूस सर्व रूपीं, सर्व भेदीं, सर्व अर्थीं, सर्व काळीं, प्रथम पुरुषीं, चालवून दाखविलें आहे.

# दे धातु.

## करणरूप.

## मूलरूप भेद.

### स्वार्थ.

मीं देतों .... .... .... .... वर्तमान काळ.
मीं देत आहें .... .... .... अपूर्णवर्तमान.
मीं देत असतों . . . . . . रीतिवर्तमान.
मीं अ० म्यां दिलें . . . भूत.
मीं देत होतों . . . . . . . अपूर्णभूत.
मीं देई, अ० देत असें . . . रीतिभूत.

### रीतिभूत.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं देई. | आह्मीं देऊं. |
| द्वि० | तूं देईस. | तुह्मीं द्या. |
| तृ० | तो-ती-तें देई. | ते-त्या-तीं देत. |

मीं देता झालों . . . . . . पूर्णभूत.
मीं अ० म्यां दिलें होतें . . भूतभूत.
मीं अ० म्यां दिलें आहे . . वर्तमानभूत.
मीं देणार होतों . . . . . . भविष्यभूत.

### भविष्य काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं देईन. | आह्मीं देऊं. |
| द्वि० | तूं देशील. | तुह्मीं द्याल. |
| तृ० | तो-ती-तें देईल. | ते-त्या-तीं देतील. |

मीं देत असेन . . . . . . . . . अपूर्णभविष्य.
मीं देणार आहें . . . . . . . . वर्तमानभविष्य.

मीं अ० म्यां दिलें असेन-ल .... भूतभविष्य.
मीं देणार असेन .... .... .... भविष्यभविष्य.

## आज्ञार्थ.

### वर्तमान काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं देऊं. | आह्मीं देऊं. |
| द्वि० | तूं दे. | तुह्मीं द्या. |
| तृ० | तो-ती-तें देऊ. | ते-त्या-तीं देऊत. |

## विध्यर्थ.

### भावीप्रयोग.

मीं अ० म्यां द्यावें .... .... .... वर्तमान.

### कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां द्यावा-द्यावी-द्यावें, इ०.वर्तमान.

### भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देत असावें .... .... अपूर्णवर्तमान.

### कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देत असावा, देत असावी, देत असावें इ०. } . . अपूर्णवर्तमान.

### भावीप्रयोग.

मीं अ० म्यां द्यावें होतें, अ० द्यायाचें होतें .... .... .... } . . भूत.

### कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां द्यावा होता, द्यावी होती, द्यावें होतें, इ०;अ० म्यां द्यायाचा होता, द्यायाची होती, द्यायाचें होतें, इ०. } ....भूत.

भावीप्रयोग

मीं अ० म्यां दिलें असावें .... ........ वर्तमानभूत.

कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां दिला असावा, दिली असावी, दिलें असावें, इ०. } वर्तमानभूत.

मीं देणार असावा .... .... .... भाविष्य.

संशयार्थ.

कर्तरिप्रयोग.

मीं देत असलों.... ....................वर्तमान.

भावीप्रयोग.

मीं अ० म्यां दिलें असलें. .... भूत.

कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां दिला असला, दिली असली, दिलें असलें. } भूत.

कर्तरिप्रयोग.

मीं देणार असलों ................भविष्य.

मीं देत असेन......................अपूर्णभविष्य.

भावीप्रयोग.

मीं अ० म्यां दिलें असेन........ भूतभाविष्य.

कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां दिला असेन-ल, दिली असेन-ल,दिलें असेन-ल. } भूतभविष्य.

मीं देणार असेन................ भविष्यभविष्य.

संकेतार्थ.

मीं देतों. तूं देतास............... भूत

मी देत असतों, तूं देत असतास. अपूर्णभूत.

९०२ संकेतार्थी भूत काळीं आणि अपूर्णभूत काळीं केव्हां केव्हां रीतीचाहि बोध होतो; जसें—'जर मी औषध घेतों, तर माझी प्रकृति बिघडली नसती,' 'जर तो त्यास पथ्य देत असता, तर त्यास आरोग्य झालें असतें.'

### भावीप्रयोग.

मीं अ० म्यां दिलें असतें .... भूतभूत.

### कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां दिला असता,
दिली असती, दिलें असतें. } भूतभूत.

### धातुसाधितें.

### नामें आणि विशेषणें.

देणें........................... ........क्रियावाचक.
देता, देणार, देणारा..... ........कर्तृवाचक.
दिला, दिलेला....................कर्मवाचक.

### अव्ययें.

देत, देतां, देतांनां, देत
असतां, देत असतांनां. } वर्तमानकालवाचक.
दिलें असतां, दिलें असतांनां.... भूतकालवाचक.
देऊन.... .... .... ............. पूर्वकालवाचक.
देऊं, द्यायास, द्यावयास. .... निमित्तवाचक.
द्यावें, द्यायाचें, द्यावयाचें, देणें. . विधिवाचक.

### प्रयोजक भेद.

### स्वार्थ.

### कर्तरिप्रयोग.

मी देववितों........................वर्तमानकाळ.

मीं देववित आहें.... .... .... ....अपूर्णवर्तमान.
मीं देववित असतों.... .... .. ....रीतिवर्तमान.

भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देवविलें.... .... ....भूत.

कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देवविला-ली-लें इ०. भूत.

कर्तरिप्रयोग.

मीं देववित होतों. .... .... .... ....अपूर्णभूत.
मीं देववीं, अ० देववित असें. ....रीतिभूत.
मीं देववित झालों.... .... .... ....पूर्णभूत.

भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देवविलें होतें. . . . भूतभूत.

कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देवविला होता इ०. भूतभूत.

भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देवविलें आहे. .... वर्तमानभूत.

कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देवविला आहे, देवविली आहे, इ०. वर्तमानभूत.

कर्तरिप्रयोग.

मीं देवविणार होतों .... .... ....भविष्यभूत.
मीं देववीन ............ .... ....भविष्य.
मीं देववित असेन .... .... ....अपूर्णभविष्य.

कर्तरिप्रयोग.

मीं देवविणार आहें .... .... वर्तमानभविष्य.

## भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देवविलें असेल.... भूतभविष्य.

## कर्मणिप्रयोग.

| | |
|---|---|
| मीं अ० म्यां देवविला-ली-लें असेल. | भूतभविष्य. |

## कर्तरिप्रयोग.

मीं देवविणार असेन .... .... .... भविष्यभविष्य.

## आज्ञार्थ.

## वर्तमान काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं देववूं. | आह्मीं देववूं. |
| द्वि० | तूं देवीव. | तुह्मीं देववा. |
| तृ० | तो-ती-तें देववो. | ते-त्या-तीं देववोत. |

## विध्यर्थ.

## भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देववावें.... .... .... वर्तमान.

## कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देववावा-वी-वें, इ०. वर्तमान.

## भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देववित असावें.... अपूर्णवर्तमान.

## कर्मणिप्रयोग.

| | |
|---|---|
| मीं अ० म्यां देववित असा-वा-वी-वें, इ०. | ....अपूर्णवर्तमान. |

---

*पहा नि० ४९१, पृ० २०७.

भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देववावें होतें, } ....भूत.
अ० देववायाचें होतें. }

कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देववावा होता, } भूत.
अ० देववायाचा होता. }

भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देवविलें असावें.....वर्तमानभूत.

कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देवविला असावा, इ० वर्तमानभूत.

कर्तरिप्रयोग.

मीं देवविणार असावा..............भविष्य.

संशयार्थ.

कर्तरिप्रयोग.

मीं देववित असलों.... .... ....वर्तमान.

भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देवविलें असलें..... भूत.

कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देवविला असला, } भूत.
देवविली असली, इ०. }

कर्तरिप्रयोग.

मीं देवविणार असलों..............भविष्य.
मीं देववित असेन................अपूर्णभविष्य.

भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देवविलें असेल.....भूतभाविष्य.

### कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देवविला असेल, देवविली असेल, इ०. } भूतभविष्य.

### कर्तरिप्रयोग.

मीं देवविणार असेन..... ........भविष्यभविष्य.

## संकेतार्थ.

### कर्तरिप्रयोग.

मीं देववितों, तूं देववितास, तो देवविता. } भूत.

मीं देववित असतों, तूं देववित असतास. } अपूर्णभूत.

### भावीप्रयोग.

मीं अ० म्यां देवविलें असतें, तूं देवविलें असतेंस. } ....भूतभूत.

### कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देवविला असता, देवविली असती, देवविलें असतें. } भूतभूत.

## धातुसाधितें.

### नामें आणि विशेषणें.

देवविणें.............................क्रियावाचक.

देवविता, देवविणार, देवविणारा. कर्तृवाचक.

देवविला, देवविलेला, ................कर्मवाचक.

### अव्ययें.

देववित, देववितां, देववितांनां, देववित असतां, देववित असतांनां. } वर्तमानकालवाचक.

देवविलें असतां, देवविलें असतांनां. } ....भूतकालवाचक.

देववून.... .... .... .... ....पूर्वकालवाचक.

देववूं, देववायास .... .... ....निमित्तवाचक.

देववावें, देववायाचें, देविवणें ....विधिवाचक.

## शक्यभेद.

## स्वार्थ.

## कर्तरिप्रयोग.

माझ्यानें अ० मला देववतें.... ....वर्तमान काळ.

देववत आहे ....अपूर्णवर्तमान.

देववत असतें....रीतिवर्तमान.

माझ्यानें अ० मला देववलें.... ....भूत.

———देववत होतें ....अपूर्णभूत.

देववे, अ० देववत असे. } रीतिभूत.

———देववतें झालें ........पूर्णभूत.

———देववलें होतें ........भूतभूत.

देववलें आहे ........वर्तमानभूत.

देववणार होतें.... ..भविष्यभूत.

देववेल ........ ....भविष्य.

देववत असेल ......अपूर्णभविष्य.

देववणार आहे .....वर्तमानभविष्य.

———देववलें असेल ......भूतभविष्य.

## आज्ञार्थ.

माझ्यानें अ० मला देववो .... .... वर्तमान.

## विध्यर्थ.

माझ्यानें अ० मला देववावें .... .... वर्तमान.
———————देववत असावें. .... अपूर्णवर्तमान.
———————देववावें होतें अ० } भूत.
देववायाचें होतें. }
———————देववलें असावें .... वर्तमानभूत.
———————देववणार असावें.... भविष्य.

## संशयार्थ.

माझ्यानें अ० मला देववत असलें.... ....वर्तमान.
———————देववलें असलें ........भूत.
———————देववणार असलें .... भविष्य.
माझ्यानें अ० मला देववत असेल .... वर्तमानभविष्य.
———————देववलें असेल........ भूतभविष्य.
———————देववणार असेल .... भविष्यभविष्य.

## संकेतार्थ.

माझ्यानें अ० मला देववतें ............ भूत.
———————देववत असतें.... अपूर्णभूत.
———————देववलें असतें.... भूतभूत.

## धातुसाधितें.

### नामें आणि विशेषणें.

देववणें .... .... .... .... .... क्रियावाचक.
देववलें, देववलेलें .... .... .... कर्मवाचक.

## अव्ययें.

देववत, देववतां, देववतांनां, दे-
ववत असतां, देववत असतांनां. } वर्तमानकालवाचक.
देववलें असतां, देववलें असतांनां. भूतकालवाचक.

## अकरण रूप.

### मूलरूप भेद.

### स्वार्थ.

मीं देत नाहीं. .... .... .... वर्तमान काळ.
मीं देत नसतों. .... .... .... रीतिवर्तमान.
मीं अ० म्यां दिलें नाहीं. .... भूत.
मीं देत नव्हतों.... .... .... अपूर्णभूत.

### रीतिभूत काळ.

| पु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं देईना, अ० नदेई. | आह्मीं देऊंना, अ० नदेऊं. |
| द्वि० | तूं देईनास, अ० देईसना, अ० नदेईस. | तुह्मीं द्याना, अ० द्यानात अ० नद्या. |
| तृ० | तो—ती—तें देईना, अ० नदेई. | ते—त्या—तीं देतनां, अ० देईनात, नदेत. |

६०३ या प्रकारच्या रूपांचे तीन चार निराळे अर्थहि होतात;ते आणखी पुरुषपरत्वें भिन्न भिन्न. एक रीत्यर्थ, उदाह०—'जेव्हां मीं त्यास देईना ( ह्म० देत नसें ),तेव्हां तो रागावे.' दुसरा, शुद्ध वर्तमानकालबोधक, उ०—'तूं जर त्यास देईनास (ह्म०देत नाहींस),तर मलाहि कांहीं अगत्य नाहीं.' तिसरा,कोणताहि व्यापार करण्याविषयीं इच्छेचा अभाव दाखवायाचा असतां भूतकाळीं याचा प्रयोग करितात; जसें—'त्यास पुष्कळ सांगितलें परंतु तो जाईना'. आणखी प्रश्न करायाचा असतांहि या रूपांचा करणरूपीं प्रयोग होतो; उ०—'तितके त्याचे रुपये द्याना', ह्म० कां देत नाहीं? द्या परते. 'तूं तेथें जाईनास,' ह्म०कां जात नाहींस? जा, जाऊन मोकळा हो, असा अर्थ. आ०

णखी कंटाळून आज्ञा द्यायाची असतांहि याच रूपांचा प्रयोग करितात; जसें—'तो इतकें सांगतो त्या पेक्षां तूं तें काम करिनास,' ह्मणजे तें काम कर, करून मोकळा हो, करून पिडा काढ, असा अर्थ ध्वनित होतो. 'तुह्मी जाना' ह्म० जा.

पंढरपूर, सोलापूर, व सभोंवतालच्या प्रांतीं करणरूपीं ना या अव्ययाच्या ठिकाणीं कीं हें अव्यय लावितात; उदाह०— 'तुम्हीं तितके त्याचे रुपये द्या कीं,' ह्म० द्या. 'तुम्हीं तेथें जा कीं,' म्हणजे जा.

मीं देईना, अ० देत नसें .... रीतिभूत.
मीं अ० म्यां दिलें नव्हतें.... भूतभूत.
मीं देणार नव्हतों. .... .... भविष्यभूत.
मीं देणार नाहीं..... .... .... भविष्य.
मीं देत नसेन. .... .... .... अपूर्णभविष्य.
मीं अ० म्यां दिलें नसेन—ल. भूतभविष्य.

५०४ सकर्मकक्रियापद असतां स्वार्थीं व संशयार्थीं भूतभविष्य काळीं प्रथमपुरुषीं कर्मणिप्रयोग असतां मीं अ० म्यां दिलें असेल,—केलें असेल, इ० रूपें शुद्ध होत; आणि अकर्मक क्रियापद असतां—मीं गेलों असेन, दिसलों असेन, इ० रूपें शुद्ध होत; हाच नियम अकरणरूपींहि जाणावा.

मीं देणार नसेन. .... .... .... भविष्यभविष्य.

## आज्ञार्थ.

### वर्तमान काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं देऊं नको, अ० नको देऊं. | आह्मीं देऊं नको, अ० नको देऊं. |

द्वि० { तूं देऊं नको, अ० नको देऊं. } { तुह्मीं देऊं नका, अ० नका देऊं. }

तृ० तो–ती–तें नदेऊ. ते–त्या–तीं नदेऊत.

## विध्यर्थ.

### वर्तमान काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं अ० म्यां देऊं नये, अ० नये देऊं. | आह्मीं देऊं नये, अ० नये देऊं. |
| द्वि० | तूं अ० त्वां देऊं नये, अ० नये देऊं; अ० देऊं नयेस, अ० नयेस देऊं. | तुह्मीं देऊं नये, अ० नये देऊं. |
| तृ० | त्याणें-तिणें देऊं नये, अ० नये देऊं. | त्यांहीं देऊं नये, अ० नये देऊं. |

मीं अ० म्यां देत नसावें अ० देत असूं नये .... .... } अपूर्णवर्तमान.

मीं अ० म्यां द्यावें नव्हतें, अ० द्यायाचें नव्हतें. } भूत.

### कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां द्यावा नव्हता, द्यावी नव्हती, द्यावें नव्हतें; अ० द्यायाचा नव्हता, द्यायाची नव्हती, द्यायाचें नव्हतें. } भूत.

मीं अ० म्यां दिलें नसावें .... वर्तमानभूत.

### कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां दिला नसावा, दिली नसावी, इ० .... } वर्तमानभूत.

मीं देणार नसावा. .... .... .... भविष्य.

संशयार्थ.

मीं देत नसलों. .... .... .... वर्तमान.
मीं अ० म्यां दिलें नसलें .... भूत.
मीं देणार नसलों .... .... .... भविष्य.
मीं देत नसेन. .... .... .... अपूर्णभविष्य.
मीं अ० म्यां दिलें नसेल .... भूतभविष्य.
मीं देणार नसेन .... .... .... भविष्यभविष्य.

संकेतार्थ.

भूत काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नदेतों, अ० देतोंना. | आह्मीं नदेतों, अ० देतोंना. |
| द्वि० | तूं नदेतास, अ०देतासना. | तुह्मीं नदेतेत, अ० देतेतना, अ० देतांना, अ० नदेतां. |
| तृ० | तो नदेता, अ०देताना. | ते नदेते,अ०देतेना. |

मीं देत नसतों, तूं देत नसतास, ती देत नसती. } अपूर्णभूत.

मीं अ० म्यां दिलें नसतें. भूतभूत.

धातुसाधितें.

नामें आणि विशेषणें.

नदेणें .... .... .... .... क्रियावाचक.
नदेता, नदेणार, नदेणारा. कर्तृवाचक.
नदिला, नदिलेला,........ कर्मवाचक.

## अव्ययें.

| | |
|---|---|
| नदेत, नदेतां, नदेतांनां; नदेत असतां, नदेत असतांनां. | वर्तमानकालवाचक. |
| नदिलें असतां, नदिलें असतांनां. | भूतकालवाचक. |
| नदेऊन.................. | पूर्वकालवाचक. |
| नदेऊं, नद्यायास, नद्यावयास. | निमित्तवाचक. |
| नद्यावें, नद्यायाचें, नद्यावयाचें, नदेणें. | विधिवाचक. |

## प्रयोजक भेद.

## स्वार्थ.

## कर्तरिप्रयोग.

मीं देववित नाहीं................वर्तमान काळ.
मीं देववित नसतों...............रीतिवर्तमान.
मीं अ० म्यां देवविलें नाहीं......भूत काळ.
मीं देववित नव्हतों.............अपूर्णभूत.
मीं देववींना, अ० देववित नसें, अ० नदेववीं ... रीतिभूत.
मीं अ० म्यां देवविलें नव्हतें.....भूतभूत.
मीं देवविणार नव्हतों...........भविष्यभूत.
मीं देवविणार नाहीं..............भविष्य.
मीं देववित नसेन................अपूर्णभविष्य.
मीं अ० म्यां देवविलें नसेल....भूतभविष्य.
मीं देवविणार नसेन.............भविष्यभविष्य.

## आज्ञार्थ.

### वर्तमान काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं देववूं नको. | आह्मीं देववूं नको. |
| द्वि० | तूं देववूं नको. | तुह्मीं देववूं नका. |
| तृ० | तो-ती-तें नदेववो. | ते-त्या-तीं नदेववोत. |

## विध्यर्थ.

### वर्तमान काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं अ० म्यां देववूं नये. | आह्मीं देववूं नये. |
| द्वि० | तूं अ० त्वां देववूं नयेस. | तुह्मीं देववूं नये. |
| तृ० | त्याणें-तिणें देववूं नये. | त्यांहीं देववूं नये. |

समर्थी करणरूपा प्रमाणें 'नये देववूं' अशी पदांची उलटहि या अकरणरूपीं होत्ये.

मीं अ० म्यां देववित असूं नये.... अपूर्णवर्तमान.

मीं अ० म्यां देववावें नव्हतें, अ० देववायाचें नव्हतें. } ....भूत.

### कर्मणिप्रयोग.

मीं अ० म्यां देववावा नव्हता, देववावी नव्हती, इ०; अ० देववायाचा नव्हता, देववायाची नव्हती, इ०. } भूत.

मीं अ० म्यां देवाविलें नसावें.... वर्तमानभूत.

### कर्माणिप्रयोग.

मीं अ० म्यां देवविला नसावा, देवविली नसावी, इ०. } वर्तमानभूत.

मीं देवविणार नसावा ........... भविष्य.

### संशयार्थ.

| | |
|---|---|
| मीं देववित नसलों. | वर्तमान काळ. |
| मीं अ० म्यां देवविलें नसलें. | भूत. |
| मीं देवविणार नसलों. | भविष्य. |
| मीं देववित नसेन. | अपूर्णभविष्य. |
| मीं अ० म्यां देवविलें नसेल. | भूतभविष्य. |
| मी देवविणार नसेन. | भविष्यभविष्य. |

### संकेतार्थ.

#### भूत काळ.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नदेववितों, स्त्री०—त्यें, अ० देववितोंना, स्त्री०—त्येंना. | आह्मीं नदेवावितों अ० देवावितोंना. |
| द्वि० | तूं नदेववितास, अ० देववितासना; स्त्री०—नदेववितीस, अ० देववितीसना. | तुह्मीं नदेवावितेत, अ० दवावितेतना, स्त्री०—त्याना—त्यातना; अ० नदेवावितां, अ० देववितांना. |
| तृ० | तो नदेववित, अ० देववितान. ती नदेववितिती, अ० देववितीना. तें नदेववितें, अ० देववितेंना. | ते नदेववित, अ० देववितेना. त्या नदेववित्या, अ० देववित्याना. तीं नदेववितीं, अ० देववितींना. |

मीं देवावित नसतों, तूं देववित नसतास....अपूर्णभूत.
मीं अ० म्यां देवविलें नसतें .... .... .... .... भूतभूत.

९०९ स्वार्थी कित्येक रूपांस मागें **न** हें अव्यय लाविलें असतां संकेतार्थ ध्वनित होतो; जसें—**नदिलें, नदेवविलें, नदेववलें**, हीं संकेतार्थी दुसऱ्या प्रकारचीं भूतकाळचीं रूपें होतात, आणि यां पासून भविष्यकाळीं भूतार्थ ध्वनित होतो; उदाह०—'तो नगेला तर मीं जाईन,' 'जर त्याणें नदिलें, तर मीं देईन.' **नदेईन, नदेववीन, नदेववेल**, हा संकेतार्थी भविष्यकाळ.

**धातुसाधितें.**

**नामें आणि विशेषणें.**

नदेविवणें ………………… क्रियावाचक.

नदेववविता, नदेवविणार, नदेवाविणारा. } कर्तृवाचक.

नदेवाविला, नदेवविलेला. …. कर्मवाचक.

**अव्ययें.**

नदेववित, नदेववितां इ०….वर्तमानकालवाचक.

नदेवविलें असतां इ० …….भूतकालवाचक.

नदेववून …………………. पूर्वकालवाचक.

नदेववूं, नदेववायास ……. निमित्तवाचक.

नदेववावें, नदेववायाचें, इ०. विधिवाचक.

**शक्य भेद.**

**स्वार्थ.**

**कर्तरिप्रयोग.**

माझ्यानें अ०मला देववत नाहीं….. वर्तमान काळ.

——————नदेववतें, अ० देववत नसतें. } रीतिवर्तमान.

——————देववलें नाहीं….भूत.

——————देववत नव्हतें….अपूर्णभूत.

माझ्यानें अ० मला देववेना, अ०
देववत नसे,
अ० नदेववे. } रीतिभूत.

———देववलें नव्हतें....भूतभूत.

देववणार नव्हतें..भविष्यभूत,

———देववणार नाहीं,
नदेववेल. } भविष्य.

——देववत नसेल........अपूर्णभविष्य.

———देववलें नसेल........भूतभविष्य.

## आज्ञार्थ.

माझ्यानें अ० मला नदेववो.... .... ....वर्तमान काळ.

## विध्यर्थ.

माझ्यानें अ० मला देववूं नये............वर्तमान काळ.

———देववत नसावें, अ०
देववत असूं नये. } अपूर्णवर्तमान.

———देववावें नव्हतें,अ०
देववायाचें नव्हतें. } भूत.

———देववलें नसावें .... ....वर्तमानभूत.

———देववणार नसावें.. ....भविष्य.

## संशयार्थ.

माझ्यानें अ० मला देववत नसलें .... ....वर्तमान काळ.

———देववलें नसलें .... ....भूत.

———देववणार नसलें. ....भविष्य.

———देववत नसेल .... ....वर्तमानभविष्य.

———देववलें नसेल .... ....भूतभविष्य.

———देववणार नसेल. ....भविष्यभविष्य.

## संकेतार्थ.

माझ्यानें अ० मला नदेववतें, अ० देववतेंना ........ } भूत काळ.

माझ्यानें अ० मला देववत नसतें ........ अपूर्णभूत.

देववलें नसतें ........ भूतभूत.

## धातुसाधितें.

### नामें आणि विशेषणें.

नदेववणें .... .... .... .... ....क्रियावाचक.

नदेववणार .... .... .... ....कर्तृवाचक.

नदेववलें, नदेववलेलें .... ....कर्मवाचक.

### अव्ययें.

नदेववतां, नदेववतांनां, इ०. वर्तमानकालवाचक.

नदेववलें असतां इ०. .... भूतकालवाचक.

नदेववायाचें .... .... .... विधिवाचक.

यांत अकरणरूपीं **न** या अव्ययाचा योग कोठें शब्दांशीं भिडवून व कोठें मध्यें अंतर ठेवून केला आहे. मागल्या आवृत्तींत भिडवून केला होता. ईत अंतरानें व कोठें भिडवून केला आहे. परंतु विचारानें पाहतां निराळ्या शब्दा प्रमाणें अंतर ठेवून तें अव्यय लिहिणें हें अधिक प्रशस्त; कारण, या अव्ययाचा एकादे समयीं मध्यें दुसरे शब्द येऊन पुढल्या दूर असलेल्या क्रियापदाशीं अन्वय असतो. उदाह०—'जरी न कोणी हें काम केलें तरीं मी करणार,' यांत **न** या अव्ययाचा अन्वय पुढल्या **केलें** या क्रियापदाशीं आहे. काव्यांत तर बहुधा छंदाच्या धोरणानें हें अव्यय अंतरानेंच असतें, परंतु साधेल तों भिडवावें.

९०६ या ज्या वर उदाहरणार्थ धातुरूपांच्या मालिका दाखविल्या आहेत, त्यांत कांहीं रूपांचा प्रयोग क्वचित्

आढळतो, व कांहींकांचा मुळींच आढळत नाहीं; जसें— शक्यभेदीं, आज्ञार्थीं, वर्तमानकाळीं—'माझ्यानें अ० मला चालवो;' विध्यर्थीं, रीतिवर्तमानकाळीं— 'माझ्यानें अ० मला चालवत असावें;' पहा पृ०२२६ सा खालची टीप. अकरण रूपीं, मूळरूप भेदीं, विध्यर्थीं, अपूर्णवर्तमान काळीं—' मीं अ० म्यां देत नसावें, अ० देत असूं नये,' प्रयोजक भेदीं,—' मीं अ० म्यां देववित असूं नये,' शक्य भेदीं, आज्ञार्थीं;—'माझ्यानें अ० मला न देववो,' विध्यर्थीं,— 'माझ्यानें अ० मला देववूं नये,' इ०. तथापि सर्व रूपीं, सर्व भेदीं, सर्व अर्थीं, सर्व काळीं, धातुरूपांचा क्रम दाखिवणें हाच या वरच्या मालिकांचा मुख्य उद्देश जाणावा.

---

## वर्ग १०.

### अवशिष्ट सहाय धातूं विषयीं विचार.

५०७ **शक, दे, लाग, बस, ठेव, टाक, घे, पाह, जा,** आणि **ये,** हे सहाय धातु बहुधा, सर्व अर्थीं, सर्व काळीं, चालतात. परंतु यांत **शक, दे, जा** आणि **ये,** इ० कित्येक धातूंचीं प्रयोगअर्थकाळविशेषेंकरून अधिक रूपें होतात; इतरांचीं तितकीं होत नाहींत.

५०८ त्यांत **जा** आणि **ये** या सहाय धातूंच्या योगानें तर प्रसंगोपात्त या महाराष्ट्र भाषेंत प्रयोगविशेषहि घडतो, ह्मणोन पुढें निराळें प्रकरण करून त्या प्रयोगविशेषा सुद्धां या दोन सहाय धातूंचा उपन्यास केला आहे. तें पुढें या वर्गांतलें १ लें प्रकरण पहावें.

५०९ **शक**—कोणताहि व्यापार करायास शक्तिमान असणें अथवा होणें या अर्थीं बहुधा सर्व धातूंच्या

निमित्तवाचक धातुसाधिता पुढें हा धातु बहुधा सर्व काळीं जोडितात; जसें–' मीं तें काम करूं शकतों,' 'तो जाऊं शकतो,''वाचूं शकतो ,''तो जाऊं शकला तर पहा,' 'मला वाटतें ती वाचूं शकेल,' 'वाचूं शकली असती'इ०.

परंतु सर्वत्र व सर्व काळीं या सहाय धातूचा प्रयोग प्रौढ भाषारूढीस प्रशस्त व सुंदर दिसत नाहीं.

५१० दे–कोणताहि व्यापार करायास मोकळिक देणें असा अर्थ विवक्षित असतां निमित्तवाचक धातुसाधित अव्यया पुढें दे या धातूचा योग करितात; जसें– 'मीं करूं देतों,' 'त्याणें तिला जाऊं दिलें,' 'ती सुनेला माहेरीं राहूं देणार नाहीं', 'तूं त्यांस बोलूं दे', ' रामानें गोपाळास तें पत्र वाचूं दिलें असतें तर बरें होतें,' इ०. कोणी–'करायास देतो,' 'जायास दिलें,' 'बोलायास दे,' 'रहायास देणार नाहीं,' 'वाचायास दिलें असतें,' असेहि प्रयोग करितात.

स्वतां करतां अथवा इतरां करतां एकादी क्रिया करून ठेवणें असा अर्थ विवक्षित असतां पूर्वकालवाचक धातुसाधिता पुढें या सहाय धातूचा योग करितात. उदाह०–'इतकें माझें काम करून दे,' 'त्याणें इतके बंद लिहून दिले,' 'ते उद्यां माझें शेत पेरून देतील,' 'हा अर्थ त्याच्या मनांत आणून देतां येता' इ०.

५११ लाग– या धातूचा योग निमित्तवाचक धातुसाधित अव्यया पुढें केला असतां व्यापारारंभ बोधित होतो; जसें– 'तो बोलूं लागला,' 'ती करूं लागेल,' 'तीं खाऊं लागतील,' इ०. 'एका वर्षांत तें मूल चांगलें बोलायास लागेल, चालायास लागेल,' असेंहि प्रयोग आढळतात.

६१२. बस—कोणताहि व्यापार कोणी दीर्घकालपर्यंत सतत चालवितो, अथवा, तो व्यापार करित असतां दुसऱ्या व्यापारा कडेस लक्ष देत नाहीं,—असा अर्थ विवक्षित असतां तप्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधिता पुढें बस या धातूचा प्रयोग करितात; जसें–'तो सारादिवस लिहित बसतो.' 'मीं काल केढोळपर्यंत तुमची वाट पाहत बसलों होतों, परंतु तुह्मीं आलां नाहीं,' 'मीं उद्यां सारा दिवस झोंप घेत बसेन,' इ०.

एकादी क्रिया अथवा व्यापार करून पुढें त्याज विषयींची काळजी न वाहतां स्वस्थ असणें असा अर्थ विवक्षित असतां कित्येक पूर्वकालवाचक धातुसाधिता वरून या सहाय धातूचा प्रयोग होतो; उदाह०–'तो तें काम करून बसला,' 'तो त्याचे रुपये घेऊन बसला,' तूं त्यास पैका धिरून बसतोस हें ठीक नाहीं,' इ०.

[अ] परंतु एथें एक गोष्ट शिकणारांनीं पक्की लक्षांत ठेवावी कीं धातुसाधितें, आणि त्यां पुढें योजिलेले सहाय धातु, यांच्या अर्थाच्या सामानाधिकरण्याचा ह्मणजे जुळण्याचा संभव असला पाहिजे तरच त्यांचा योग होतो; नाहींतर अर्थाचें सामानाधिकरण्य नसल्यास हा योग होत नाहीं; सांगावयास तात्पर्य सर्व धातूंच्या सर्व धातुसाधितां पुढें सर्व सहाय धातूचा योग होतो असें अगदीं समजूं नये; जसें—'मीं लिहित बसतों,' असें होतें, परंतु 'मीं निजत बसतों,' असें होत नाहीं; कारण, निजणें आणि बसणें या दोन्ही क्रिया एका काळीं जुळत नाहींत.

६१३ ठेव—कोणताहि व्यापार समाप्तीस नेऊन त्या त्या व्यापारापासून निष्पन्न झालेलीं कार्यें पुढें तशींच राहूं दिलीं असा अर्थ विवक्षित असतां पूर्वकालवाचक

सकर्मक धातुसाधिता पुढें या सहाय धातूचा योग करितात; उदाह०—'तो आपल्या मुलां करतां हें दुसरें घर बांधून ठेवितो,' 'म्यां तेव्हांच दोन बंद लिहून ठेविले.' 'ते जर इतकें माझें काम करून ठेवितील तर बरें होईल,' 'बाळंभटानें आपल्या मुलीची मागणी केव्हांच साधून ठेविली असती,' इ०.

५१४ **टाक**—वर सांगितल्या अर्थाच्या उलट 'कसेंहि करून एकादा व्यापार त्वरित संपादून त्याच्या ओझ्या पासून मुक्त होणें' असा अर्थ विवक्षित असतां **टाक** या धातूचा सहाय धातू प्रमाणें पूर्वकालवाचक धातुसाधिता पुढें योग करितात. उदाह०—'त्याला सांगितलें कीं तो लागलेंच एकादें काम करून टाकितो,' 'तूं यंदां आपल्या मुलाचें लग्न करून टाक,' तिणें दोन पोळ्या लाटून टाकिल्या, आणि ती चालती झाली,' 'तो यंदांच या दोन्ही मुलांचीं लग्नें करून टाकील,' इ०.

५१५ **घे**—तसेंच कोणताहि व्यापार कशाहि रीतीनें अथवा साधनानीं संपादणें असा अर्थ विवक्षित असतां वरल्या नियमांत सांगितल्या धातुसाधिता पुढें या सहाय धातूचा योग करितात; उदाह०—'तो आपलें काम करून घेतो,' 'तिणें आपलें कार्य साधून घेतलें,' 'त्याणें तेथें घरें बांधून घेतलीं,' 'तो त्या मुलांस सांभाळून घेईल,' इ०.

५१६ **पाह**—कोणताहि व्यापार करण्या विषयीं कर्ता आपली इच्छा प्रकट करितो, अथवा त्या विषयीं आपला यत्न दाखवितो, असे अर्थ विवक्षित असतां पहिल्या अर्थीं निमित्तवाचक धातुसाधिता पुढें, व दुसऱ्या अर्थीं पूर्वकालवाचक धातुसाधिता पुढें, **पाह**धातूचीं (विशेषेंकरून) वर्तमान काळाचीं रूपें योजितात; जसें—

'तो लिहूं पाहतो', 'ते निघूं पाहतात', 'रामराव जर हें काम घेऊं पाहते, तर त्यांस तें सहज मिळतें,' 'तो पोर त्या पतंगास उडवायास पाहतो, परंतु तो उडत नाहीं,' 'त्याणें तें लांकूड फोडून पाहिलें पण तें फुटत नाहीं.'

५१७ जा, ये,—एकाद्या क्रियेचें अथवा व्यापाराचें पुढल्या काळा पर्यंत निरंतर, अथवा कांहीं कालमर्यादि, सातत्य, रीति, अथवा अभ्यास दाखवायाचा असतां जा, आणि मागल्या काळा पासून सांप्रत काळा पर्यंत दाखवायाचा असतां ये, या सहाय धातूंचा वर्तमानकालवाचक तप्रत्ययान्त धातुसाधित अव्यया पुढें योग करितात; उदाह०—'तो लिहित जातो', 'ती असेंच लिहित गेली, तर तिचें अक्षर वळेल,' 'ते असेंच पुढें करित जातील,' 'तूं बोलत जा,' 'मुलांनीं विद्ये कडेस चित्त देत जावें,' इ०. 'तो असेंच करित येतो,' 'त्या अश्याच लबाड्या करित आल्या,' 'तूं हें काम पुष्कळ वर्षें करित आलास ह्मणोन आज त्यांत इतका कुशल झालास,' इ०.

कित्येक धातूंच्या पूर्वकालवाचक धातुसाधितां पुढें जा या धातूच्या कर्मवाचक धातुसाधिताचा योग केला असतां 'ती ती क्रिया अ० व्यापार, अथवा त्यांचीं कार्यें, होऊन चुकलीं' असा अर्थ निष्पन्न होतो, उ०—'तो करून गेला आतां काय,' 'तो तसें लिहून गेला,' 'रोगानें तिचें शरीर आटून गेलें, वाळून गेलें' इ०.

तसेंच एकादी क्रिया अ० व्यापार कर ह्मणून नेटानें सांगायाचें असतां त्या क्रियापदाच्या आज्ञाकाळीं द्वितीय पुरुषाच्या रूपां पुढें या सहाय धातूचें आज्ञाकाळाचें

द्वितीय पुरुषाचें रूप जोडितात; जसें—कर जा, बोल जा, दे जा, घे जा, द्या जा, वाचा जा, इ०.

५१८ ये—वर्तमानकालवाचक तांप्रत्ययान्त धातुसाधित अव्यया पुढें ये या धातूचा योग केला असतां त्या पासून शक्ति, ज्ञान, यांचा बोध होतो; उदाह०— 'मला चालतां येतें,' 'तुला पोहतां येईल,' 'मला वाचतां यावें,' 'तिच्या आईनें शिकविलें असतें तर तिला मांडे करितां आले असते,' इ०.

५१९ अकर्मक धातू वरून, अथवा कर्माची अपेक्षा न धरितां सकर्मक धातू वरून, या सहाय धातूचा योग केला असतां भावकर्तरिप्रयोग होतो; जसें—'मला चालतां येतें,' 'तुला धांवतां येईल', 'तिला लिहितां येतें तर बरें होतें,' इ०. या वाक्यांत क्रियेचा जो भाव तोच कर्ता होय. 'मला चालतां येतें,' ह्मणजे मला चालणें अथवा चलनरूप व्यापार करण्याची शक्ति आहे, अथवा मला तें काम माहीत आहे असा अर्थ.

५२० करणरूप अथवा अकरणरूप असतां या सहाय धातू वरून चतुर्थ्यंत अ० सविकरणतृतीयान्त कर्त्ता होतो; जसें—'**मला** अथवा **माझ्यानें** तेथें जातां येतें,' '**तुला** अ० **तुझ्यानें** तसें होतां येत नाहीं', इ० असें बहुतांचें मत आहे; परंतु मला तसें अगदीं वाटत नाहीं. अशा ठिकाणीं क्रियेचा भाव कर्त्ता करून हा भावकर्तरिप्रयोग मानावा हें बरें, असें माझें मत आहे.

पहा इतर ठिकाणीं कर्त्याचा अर्थ असतां कोठेंहि चतुर्थ्यन्त अथवा सविकरण तृतीयान्त कर्ता असत नाहीं, असा नियम असतां ज्या पेक्षां अशाच ठिकाणीं कर्तृपदें चतुर्थ्यन्त अथवा सविकरण तृतीयान्त होतात, त्या पेक्षां तींच अपवादक रूपें ये या सहाय

क्रियापदाचे कर्ते नव्हत या विधानास दृढ प्रमाणभूत होतात. आणखी ज्या अर्थी या भाषेत प्रथमा आणि तृतीया या दोन विभक्तींचाच कर्तृपदारूढ होण्याचा निर्विवाद अधिकार असतां हीं विलक्षण रूपें तो अधिकार बळकावूं पाहतात, त्या अर्थी या भाषेच्याच मतें तो अधिकार त्यांस द्यावयाचा नाहीं असें सिद्ध होतें.

५२१ परंतु जर हा सहाय धातु विवक्षित कर्मासहवर्तमान सकर्मक धातु वरून प्रयोजिला, तर त्या कर्माच्या लिंगवचनानुरूप या सहाय क्रियेचें रूप फिरून कर्तरिप्रयोग होतो; जसें–'मला **ग्रंथ** लिहितां **येतो**, **पुतळी** करितां **येत्ये**, आणि **चित्र** काढितां **येतें**,' 'तुला अशीं **चित्रें** काढितां **यावीं**,'या वाक्यांत **ग्रंथ**,**पुतळी**,आणि **चित्र**, यांस त्या त्या सकर्मक धातुसाधितांचीं कर्में करून **येतो येत्ये**,**येतें**,आणि **यावीं**,या क्रियापदांचे कर्ते मानावे.

कदाचित् एथें कोणी पूर्वपक्ष करील कि जर पूर्वोक्त वाक्यांत **ग्रंथ**, **पुतळी**, आणि **चित्र** हे त्या त्या क्रियेचे कर्ते मानून त्या त्या सकर्मक धातुसाधितांचीं कर्में मानिलीं, तर एका क्रियेचें कर्तृत्व आणि दुसऱ्या क्रियेचें कर्मत्व एकच पदार्था वर येऊं लागतें, ह्मणजे जें एकदां कर्म होतें तेंच त्या वाक्यांत कर्त्ता होऊं लागतें, हा येथें दोष येतो; त्यास ही आशंका खरी आहे, परंतु असें झाल्यास यांत कांहीं विशेष बाध आहे असें मला वाटत नाहीं. एकदां तीं तीं नामें त्या त्या सकर्मक धातुसाधितांचीं कर्में करून त्यांस **ये** या सहाय क्रियापदाचे कर्ते मानल्यास विशेष दोषापत्ति कोणती हें मला कळत नाहीं. असें न करावें तर **ये** या क्रियेस भावकर्तरि मानून आणखी तीं त्या त्या सकर्मक धातुसाधिताच्या कर्मांची लिंगवचनानुयायी अशी मानिली पाहिजे, हें अधिकच सदोष दिसतें; कारण, भावकर्तरि

क्रियापद निरंतर तृतीय पुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें, या नियमास मोठा बाध येतो; तेव्हां मला वाटतें कीं सकर्मक धातुसाधिता पुढें ये या सहाय धातूचा योग असतां जें त्या धातुसाधिताचें कर्म तेंच त्या वाक्यांत ये या क्रियेचा कर्त्ता असतें. धातुसाधितास निरंतर गौणत्व असतें म्हणोन व्याकरणपदच्छेद करिते समयीं त्याचें कर्म सांगायाची कोणी गरज ठेवीत नाहींत. असें समाधान केल्या वर आतां कांहीं वाद राहील असें मला वाटत नाहीं.

९२२ अशा ठिकाणीं व्याकरणपदच्छेद करिते समयीं गोंधळ होऊं नये ह्मणोन अर्थानुकूल या धातुसाधितांस निराळें करून पुढलें क्रियापद निराळें मानावें, किंवा त्यां सहित सर्व संयुक्त क्रियापद मानून निर्वाह करावा, या दोहोंतून जो मार्ग ज्यास सुलभ व सरळ दिसेल तो त्याणें घ्यावा.

---

## प्रकरण १.

### कर्मकर्तरिप्रयोगा विषयीं प्रासंगिक विचार.

९२३ जेव्हां कर्मासच कर्ता मानणें आहे, ह्मणजे पूर्वी जें एकाद्या क्रियेचें कर्म होतें त्यासच तो अर्थ ठेवून त्या वाक्यांत कर्त्ता करणें आहे, तेव्हां बहुधा **जा** या धातूचा योग कर्मवाचक धातुसाधित विशेषणा पुढें करितात; जसें–'तो मारिला जातो', 'ती धरिली गेली', 'तें केलें जाईल', इ०.

९२४ हा जाधातूचा योग बहुधा मराठी भाषेत दरबारी बोलण्यांत व लेखांत आढळतो; प्रौढ भाषणांत याचा प्रयोग नीट दिसत नाहीं.

५२५ या **जा** धातूच्या योगानें इतकाच अर्थविशेष होतो कीं जें पूर्वी एकाद्या सकर्मक क्रियापदाचें कर्म होतें, तेंच याच्या योगानें त्याच क्रियेचा कर्त्ता होतें; उदाह०- 'तो वाघ मारितो,' या वाक्यांत **वाघ** हें कर्म आहे. परंतु 'त्याणें वाघ मारिला जातो', एथें अर्थ तसाच, ह्मणजे मारणें या क्रियेच्या फळाचा अनुभविता **वाघ**च आहे, परंतु या प्रयोगांत पूर्वींच्या वाक्यांतलें कर्म जो **वाघ**, तो एथें **मारिला जातो**, या क्रियेचा कर्त्ता होतो; आणि **त्याणें** ही एथें निमित्तार्थीं तृतीया समजली पाहिजे; असें आमचें मत आहे.

५२६ मराठी भाषेंत सर्व सकर्मक धातू वरून हा **जा** धातू योजिला जाऊन कर्मकर्तरिप्रयोग होत नाहीं; आणि कित्येक स्थळीं बलात्कारानें केला असतां तो प्रशस्त दिसत नाहीं; जसें- 'हा रथ त्याणें अ० त्याज कडून हांकला जातो', 'ही पोळी तिज कडून भाजली जात्ये,' या प्रमाणें बोलण्याचा परिपाठ नाहीं. परंतु, 'ही गोष्ट सरकारांत लिहिली गेली असल्यास फार कठीण,' 'जिल्हा जडज्या कडून सदरेस अपील केलें जातें,' 'या प्रमाणें हुकूम मंजूर न केल्यास त्याचा हक्क काढिला जाईल,' इ०, असा दरबारी बोलण्यांत व लिहिण्यांत याचा परिपाठ पडला आहे, ह्मणोन त्याच प्रकारच्या लिहिण्यांत **जा** धातूच्या योगानें जो कर्मकर्तरिप्रयोग होतो तो शोभतो.

परंतु मराठी भाषेंत सकर्मक क्रियापदा वरून कर्मकर्तरि म्हणून एक स्वतंत्र सर्वव्यापी असा प्रयोग होत नाहीं, या मुळें एकादे समयीं मोठी अडचण पडत्ये. या प्रयोगाची भाषेंत फार आवश्यकता आहे; ह्मणोन, ज्या भाषेंत धातू वरून स्वतंत्र कर्मकर्तरि

रूप होत नसतें, तींत कोठें कोठें **जा** किंवा अशा दुसऱ्या कोणत्या सहाय धातूंच्या योगानें, अथवा आणखी कांहीं प्रकारें, हें रूप साधण्याचें व तसा कर्मकर्तरि अर्थ दाखविण्याचें अगत्य पडतें. अथवा, कोठें क्रियापदांच्या रूपांच्या अंतर्गत हा कर्मकर्तरि अर्थ दडून असतो: जसें-'आंबा म्हटला म्हणजे सर्वांच्या जिभेवर पाणी सुटतें,' 'लेंकरूं पाहिलें **म्हणजे** आईस हर्ष होतो, 'काम केलें तर पैसे मिळतात,' इत्यादि स्थळीं **ह्मटला**, **पाहिलें**, **केलें**, या क्रियापदांच्या रूपांनीं तसा कर्मकर्तरि अर्थ ध्वनित होतो.' 'चंद्र पाहिला असतां सर्वांस हर्ष होतो', या वाक्याचा अर्थ असा आहे कीं-चंद्र पाहिला गेला असतां सर्वांस हर्ष होतो. या प्रमाणें माझा अभिप्राय आहे. परंतु अशा ठिकाणीं-**कोणीं**, **लोकांनीं**, अशा बाहेरच्या कर्त्याचा अध्याहार मानणें कोणांस बरें दिसल्यास त्यांनीं असा अध्याहार मानून निर्वाह करावा.

५२७ अशा अर्थानें बोलायाची जेव्हां अपेक्षा असत्ये, तेव्हां शुद्ध सकर्मक क्रियापदाचा अकर्मक क्रियापदा प्रमाणें प्रयोग करितात; जसें- 'या जात्यानें हे हरबरे चांगले दळणार नाहींत,' ह्मणजे 'दळिले जाणार नाहींत,'असा अर्थ. 'या चाकूनें हें खर्बूज चांगलें कापत नाहीं', ह्मणजे कापिलें जात नाहीं. 'या लांकडांनीं ही सारी इमारत बांधली.' ह्म० त्या लांकडांच्या साधनांनीं ही सारी इमारत बांधिली गेली असा अर्थ.

५२८ आणखी अशा कर्मकर्तरि अर्थानें बोलायाचें अथवा लिहायाचें असतां किति एक प्रसंगीं कर्त्याचा अध्याहार करून वर्तमान काळीं तृतीय पुरुषाच्या अनेकवचनाच्या रूपांचा मध्येंच प्रयोग करितात; जसें- '**असें सांगतात** कीं त्या देशांत पुरुषां पेक्षां बायकांचें प्राबल्य अधिक आहे,' '**ह्मणतात** तो थोडा वेडा आहे,

मग कोणास ठाऊक,' 'त्या देशांत ही लिपी **लिहितात,**' 'छापखान्यांत निराळी शाई **वापरतात,**' 'बंदुकींत चेपून दारु **भरितात** तेव्हां गोळी दूर जात्ये,' इ०.

५२९ आणखी **णें**प्रत्ययान्त क्रियावाचक धातुसाधितास सप्तम्यन्त करून त्या पुढें **ये** या सहाय धातूचा योग केला असतांहि या भाषेंत कर्मकर्तरि प्रयोगाचीं रूपें कोठें कोठें साधतात; व अशा प्रयोगाचा प्रचारहि या भाषेंत बराच आढळतो; जसें–'असा शब्द **बोलण्यांत येत** नाहीं,' 'एथें एक घर **बांधण्यांत आलें** तर बरें,' 'पुढें ही मसलत **करण्यांत येईल,**' 'असे बंद किती **लिहिण्यांत आले** असावे हें आतां अटकळत नाहीं.'

५३० कोठें कोठें कित्येक **ऊन**प्रत्ययान्त धातुसाधितां पुढें **घे** हे या सहाय क्रियापदाचा योग केल्यानें हा कर्मकर्त्रर्थ निष्पन्न होतो; जसें–'तूं त्या दाटींत जाऊं नको **चेंचून घेशील,**' 'तो तेथें गेला आणि त्याणें आपल्यास **मारून घेतलें, तुडवून घेतलें**' इ०.

५३१ प्राकृत ग्रंथभाषेंत मूळ धातूस **इजेणे** प्रत्यय लागून कर्मकर्तरि क्रियापद होतें, मग त्याचीं इतर धातू प्रमाणें काळ, वचन, लिंग, पुरुष, यांच्या परत्वें रूपें साधतात; जसें–**करिजेतो, बोलिजेतो, करिजेले, बोलिजेला, धरिजेल, खाईजेल,** इ०. परंतु हीं ग्रंथभाषेंतील रूपें बहुधा तीन काळींच चालतात असें दिसतें.

एथें मला अशी अटकळ होत्ये कीं–**करिजेतो, कथिजेतो, खाइजेतो,** इ० हीं मूळचीं संस्कृतांत **य** विकरण होऊन—**क्रियते, कथ्यते, खाद्यते,** इ० जीं कर्मणि आत्मनेपदीं, कर्मणिवाच्य, अथवा भाववाच्य अशा अर्थी रूपें होतात त्या वरूनच

यच्या स्थानीं जकार होऊन हीं अशीं रूपें निःसंशय साधलीं असावीं.

या प्रकरणाचा आणखी विस्तार माझ्या भावी पूर्णिकेंत पहावा.

---

## प्रकरण २.

### गौण अ० सिद्ध क्रियापदें.

५३२ या सहाय धातूं मधून ज्यांचीं रूपें सर्वव्यापक नसतां केवळ नियमित अर्थी, नियमित काळीं, नियमित पुरुषीं, मात्र साधतात, त्यांस **गौण** अथवा सिद्ध क्रियापदें ह्मणतात. तीं गौण क्रियापदें—**पाहिजे**, **व्हावा**, **नको**, **नये**, आणि **नलगे**, हीं आहेत.

या गौण क्रियापदांचीं रूपें ज्या ज्या अर्थी, ज्या ज्या काळीं, ज्या ज्या पुरुषीं, होतात, त्या त्या अर्थी त्या त्या काळीं, त्या त्या पुरुषीं, सर्व सांगितलीं पाहिजेत.

५३३ **पाहिजे**—याचा अर्थ 'अपेक्षित अ० इष्ट आहे' असा होतो; उदाहण०—'मला आंबा पाहिजे,' ह्मणजे मला आंबा अपेक्षित अथवा इष्ट आहे. या वाक्यांत **आंबा** हा कर्त्ता होय, **मला** ही चतुर्थी, आणि **पाहिजे** हें क्रियापद.

असें अनुमान होतें कीं **पाहिजे** हें प्राचीन मराठी भाषेंतलें **पाह** धातूचें विध्यर्थी वर्तमान काळाचें रूप होय; जसें—**जाइजे** **बोलिजे**, **करिजे**, तसें **पाहिजे**. **पाहिजे** ह्मणजे **पहावें** **पहायाचें**, अथवा **पहायास योग्य**, अर्थात् जें पहायास योग्य तें इच्छायासहि योग्य असतें, ह्मणजे इष्ट किंवा अपेक्षित असतें, असा अर्थ.

हें गौण क्रियापद वर्तमान काळीं चालवून दाखवितों.

**कर्तरिप्रयोग.**

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं पाहिजे. | आह्मीं पाहिजे. |
| द्वि० | तूं पाहिजे, अ० पाहिजेस. | तुह्मीं पाहिजे, अ० पाहिजेत. |
| तृ० | तो-ती तें पाहिजे. | ते-त्या-तीं पाहिजेत. |

५३४ याचें भविष्य काळीं क्वचित् **पाहिजेल** असें एकवचनीं रूप होतें; जसें—'त्याला पाहिजेल तर तो जाईल.' आणि याचें वर्तमानकालवाचक धातुसाधित **पाहिजत** असें होतें. आतां या धातुसाधिता पुढें **हो** आणि **अस** या सहाय धातूंचीं रूपें लावलीं असतां त्या त्या अर्थीं त्या त्या काळीं या गौण क्रियापदाचीं रूपें साधतात; जसें—**पाहिजत होतें, पाहिजत होतीं, पाहिजत असतें, पाहिजत असेल,** इ० **पाहिजत होतें, पाहिजत असावें** इ० स्थळीं—**पाहिजे होतें, पाहिजे असावें,** असाहि प्रयोग आढळतो.

५३५ हा सहाय धातु इतर धातूंच्या कर्मवाचकधातुसाधिता पुढें, व **आयास**—अ० **आवयास**—प्रत्ययान्त निमित्तवाचक धातुसाधिता पुढें, लाविला असतां त्या त्या क्रियेची आवश्यकता दर्शविली जात्ये; उदाह०—'मला गेलें पाहिजे,' 'त्याला खेळविलें पाहिजे,' 'त्यास लिहिलें पाहिजत होतें,' 'तुला बसलें पाहिजेल,' 'त्यास तेथें जायास पाहिजे,' इ० या ठिकाणीं **गेलें, खेळविलें, लिहिलें, बसलें, जायास,** हीं कर्मवाचक व निमित्तवाचक धातुसाधितें **पाहिजे** या क्रियापदाचे कर्ते होत.

५३६ **व्हावा—पाहिजे** याच्या अर्थीं कोणी **व्हावा**

याच्याहि गौण क्रियापदा प्रमाणें प्रयोग करितात. उदाह०—'मला जोडा व्हावा, घोडी व्हावी, धोत्र व्हावें,' 'मला तूं व्हावास, त्या व्हाव्या, तीं व्हावीं-त,' इ०.

५३७ **नको**—हें **पाहिजे** याचें प्रतिपक्षी होय; याचा अर्थ 'अपेक्षित अ० इष्ट नाहीं' असा होतो; जसें—'मला द्रव्य नको,' ह्मणजे मला द्रव्य अपेक्षित अथवा इष्ट नाहीं. या वाक्यांत **द्रव्य** हा कर्त्ता, **नको** हें क्रियापद, आणि **मला**, ही चतुर्थी जाणावी.

याचीं रूपें वर्तमान काळीं चालवून दाखवितों.

**कर्तरिप्रयोग.**

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नको. | आह्मीं नको. |
| द्वि० | तूं नकोस. | तुह्मीं नकोत. |
| तृ० | तो-ती-तें नको. | ते-त्या-तीं नकोत. |

५३८ हें सहाय क्रियापद असतां याचा प्रयोग आज्ञार्थी निषेध दाखवायाचा असतां मात्र होतो; तेव्हां हें निमित्तवाचक धातुसाधित अव्यया पुढें लाविलें जातें; आणि अनेकवचनीं याचें रूप **नका** असें होतें; उदाह०—'तूं करूं नको, जाऊं नको,' 'तुह्मीं करूं नका, जाऊं नका' इ०.

५३९ **नये**—याचा प्रयोग अकरणरूपीं विध्यर्थी होतो, तेव्हां हें मुख्य धातूच्या निमित्तवाचक धातुसाधित अव्यया पुढें योजितात; उदाह०—

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं अ० म्यां करूं नये. | आह्मीं करूं नये. |
| द्वि० | तूं अथवा त्वां करूं नये. | तुह्मीं करूं नये. |
| तृ० | त्याणें-तिणें-करूं नये. | त्यांहीं करूं नये. |

क्वचित् द्वितीय पुरुषीं एकवचनीं **नयेस**, अशाहि रूपाची बोलण्यांत रूढी आढळते ; परंतु ज्या पेक्षां अनेकवचनीं-**करूं नयेत, जाऊं नयेत,** अशीं रूपें प्रशस्त रीतीनें आढळत नाहींत. त्या पेक्षां नुसत्या एकवचनींच हा विकल्प इष्ट दिसत नाहीं; म्हणोन तो मोडावा हेंच इष्ट.

५४० एकादा व्यापार करायास 'येतनाहीं,' 'शक्य नाहीं,' अथवा 'योग्य नाहीं,' असा अर्थ विवक्षित असतां हें गौण क्रियापद केव्हां केव्हां तांप्रत्ययान्त धातुसाधितां पुढ योजितात; जसें- 'मला तेथें जातां नये,' 'तुला हें काम करितां नये;' ह्मणजे म्यां जाऊं नये, मला जाणें योग्य नाहीं इ० असा अर्थ.

असा अर्थ असतां व्याकरणपदच्छेद करितांनां जो **ये** या सहाय धातु विषयीं कर्तृकर्मांचा नियम सांगितला आहे तोच ऐथें जाणावा; ह्मणजे, अकर्मक धातुसाधिता पुढें **नये** हें सहाय क्रियापद असल्यास तेथें भावकर्तरिप्रयोग जाणावा, आणि सकर्मक धातुसाधिता पुढें हें क्रियापद असून त्या सकर्मक धातुसाधिताचें जें कर्म तें जर प्रथमान्त असलें, तर त्यास **नये** या सहाय क्रियापदाचा कर्त्ता मानावें; जसें- 'मला तेथें जातां नये,' या वाक्यांत भावकर्तरिप्रयोग जाणावा; आणि 'तुला तें काम करितां नये' यांत **काम** हें **नये** या क्रियापदाचा कर्ता मानावा; आणि 'तुला त्यास धरितां नये,' हाहि भावकर्तरिप्रयोग जाणावा; कारण, एथें 'त्यास धरणें' हा जो क्रियेचा भाव तो कर्त्ता होय. परंतु हा नियम थोडा विचारणीय आहे.

५४१ **नलगे***-या गौण क्रियापदाचा अर्थ 'आवश्यकता नाहीं,' 'गरज नाहीं,' असा होतो; उ०-'मला तुझी

* हें क्रियापद **न** आणि **लागणें** या शब्दां पासून व्युत्पन्न झालें असावें; प्रथम **नलागे** होऊन मग **नलगे** असा शब्द झाला असावा.

दक्षिणा नलगे,' 'तिला तुझें वस्त्र नलगे,' एथें **दक्षिणा, वस्त्र,** हे शब्द **नलगे** या क्रियापदाचे कर्ते होत.

॥ नलगे व्याकरणाची न्यायाची घटपटादि खटपट ती ॥ मोरोपंत.

याचें अनेकवचनीं **नलगेत** असें रूप होतें; उदाह०– 'मला तुझीं भांडीं नलगेत, घोडे गाड्या नलगेत,' इ०.

९४२ तो तो व्यापार करण्याची अपेक्षा नाहीं, अशा अर्थाची विवक्षा असतां त्या त्या धातूचीं जीं विधिवाचक आणि क्रियावाचक धातुसाधितें, त्यां पुढें या गौण क्रियापदाचा प्रयोग होतो; जसें–'त्यास हिंडावें नलगे,' मला जावें नलगे,' 'तीस बोध करणें नलगे,' त्यांस इतका आग्रह करणें नलगे,' इ०.

अशा वाक्यांत **जावें करणें,** इ० धातुसाधितें **नलगे** या क्रियापदाचे कर्ते मानिले पाहिजेत. 'त्यांस इतका आग्रह करावा अ० करणें नलगे,' इ० वाक्यांत त्यांस इतका आग्रह करावा अ० करणें' हें वाक्य अथवा वाक्यांश **नलगे** याचा कर्त्ता मानिल्या शिवाय दुसरा उपाय नाहीं.

---

## वर्ग ११.

### क्रियापदांचीं रूपें साधण्याचा प्रकार.

९४३ अकर्मक मूळधातूंस **त** हा प्रत्यय लावला असतां वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यय सिद्ध होतें; जसें–**उठत, बसत, जात, येत, निजत, हंसत, रडत, करवत, खाववत, उठवत, दळत, कापत,** इ०.

९४४ **पढ**धातूचा गण वर्जून सकर्मक मूळधातूस हा **त**प्रत्यय लागत असतां त्याच्या **मागें इ** आगम विकल्पें

होतो; जसें—**करित, बांधित, तोडित, जेवित, वेढित, ताडित, रोंवित, दळित, कापित, करवित, खाववित, उठवित,** इ०.

[ अ ] पढधातूचा गण वर्जून ह्मटलें ह्मणोन—**पढत, शिकत, बोलत, ह्मणत,** इ० अशींच रूपें होतात; एथें विकल्प नाहीं.

[ आ ] हा आगम विकल्पें होतो असें ह्मटलें या वरून —**करत, बांधत, तोडत, जेवत, वेढत, ताडत, रोपत, करववत, उठवत,** इ० अशींहि रूपें लिहिण्याचा अशास्त्र परिपाठ दिसण्यांत येतो, त्यास अनुलक्षून ह्मटलें आहे, असें समजावें.

परंतु यांत शिकणारांनीं लक्षांत ठेवावें कीं वर्तमानकालवाचक सकर्मक धातुसाधितास हा आगम करावा हा उत्तम पक्ष होय. या नियमास अनुसरलें असतां पुष्कळ अडचणी व संशय दूर होतील. एकादे समयीं कर्मकर्तरि अर्थ असतां सकर्मक क्रियापदाचा अकर्मक क्रियापदा प्रमाणें प्रयोग करावा लागतो, व करितात. तेव्हां हा तारतम्यभाव लक्षांत ठेवण्याची फार आवश्यकता दिसन्ये, पहा—पृ० १५९, नि० ३९४.

५४५ लिहधातु वर्जून हकारान्त धातूस हा आगम होत नाहीं; जसें—**पाहत, साहत, चाहत, नाहत, वाहत, पोहत,** इ०.

**लिह** वर्जून म्हटलें ह्मणोन **लिहित** असेंच बहुधा रूप होतें. निवळ देशस्थां मध्यें **लिहत** असें ह्मणण्याचा प्रकार कचित् आढळतो, तो या वरल्या नियमास अनुसरून आहे. अथवा **लिहिणें** असें जर मूळचें रूप मानलें तर मग हा मूळीं अपवादच नको.

५४६. एकाक्षरी धातू वरून हा आगम होत नाहीं; जसें—**देत, घेत, नेत, भित, खात, गात,** इ०.

५४७ **च, ज, झ, स,** या वर्णांस **ह्** आगम होत असतां २० व्या नियमा प्रमाणें अनुक्रमें **च, ज, झ, श,** हे तालव्य आदेश होतात; जसें—**खोचित, रचित, गांजित, भाजित, सोशित, वाशित,** इ०.

५४८ ऱ्हस्व इकाराच्या स्थानीं कोणी—**करीत, बांधीत, ठेवीत, भरीत,** इ० असा दीर्घ ईकारहि आगम करितात; परंतु तो अप्रशस्त जाणावा.

एकपक्षीं पाहिलें असतां या दीर्घ ईकाराचा आगम करण्यासहि कांहींसें निमित्त आहे; कांकिं मराठी भाषेंत शब्दाचा उपांत्य वर्ण **इ** अथवा **उ** असला, तर तो निरंतर दीर्घ असतो; परंतु हा नियम बहुधा पूर्णार्थान्वित शब्दां विषयीं जाणावा; धातुसाधित अव्ययां सारखें अर्धवट शब्दांस तो लावितां येत नाहीं. दुसरें, जेथें ऱ्हस्व इकाराचें सहन होत नाहीं,—म्हणोनच त्याचीहि अपेक्षा नठेवितां कित्येक—**करवत, ठेवत, बांधत,** अशीं रूपें लिहितात,—तेथें दीर्घ ईकाराचें सहन होणें सहजच दुर्घट दिसतें. आणखी सूक्ष्म विचारानें पाहिलें असतां अशी एक अटकळ होत्ये कीं, हा जो मराठींत **इ** आगम होतो तो संस्कृतांत जो धातूसाधितांस अथवा क्रियापदांच्या रूपांस मध्यें इडागम होतो, त्याचेंच अनुकरण असावें. तिसरें, असा हा दीर्घ ईकारागम केला असतां हे अर्धवट अर्थाचे शब्द जीं वर्तमानकालवाचक धातुसाधितें, आणि पूर्णार्थान्वित जीं—**करीत, बांधीत, लिहीत, नेसवीत, निजवीत,** इ० रीतिभूतकाळीं तृतीय पुरुषाच्या अनेकवचनाचीं रूपें, हीं एकरूप झाल्यानें समयीं संशय उत्पन्न होण्यासहि अवकाश मिळेल, तोहि टळतो, अशा तीन सबल कारणां वरून मला वाटतें ऱ्हस्व इकार आगम करणें हेंच अधिक प्रशस्त, असें आणखी विचारा अंतीं इतरांसहि दिसून येईल.

५४९ पूर्वोक्त नियमा प्रमाणें हें वर्तमानकालवाचक

धातुसाधित अव्यय सिद्ध झालें ह्मणजे त्या वरून, अथवा त्याच नियमास अनुसरून, ताप्रत्ययान्त—तांनांप्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययें, मूलरूप भेदीं, प्रयोजक भेदीं, स्वार्थीं, वर्तमान आणि पूर्ण भूत काळीं, आणि संकेतार्थीं भूत काळीं, क्रियापदांचीं रूपें, हीं सर्व सिद्ध होतात.

५५० मूलधातूस पुढें ला, ली, लें इ० हे प्रत्यय प्रयोगानुसंधानानें लाविले असतां लाप्रत्ययान्त कर्मवाचक धातुसाधित नाम अथवा विशेषण सिद्ध होतें; जसें—**धांवला, उठली, बसलें, हंसले, खेळल्या, जेवलीं,** इ०.

५५१ तप्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययाच्या साधनांत इ आगमा विषयीं वर जे नियम सांगितले, तेच बहुधा लाप्रत्ययान्त धातुसाधित विशेषणाच्या साधनांत इ आगमा विषयीं जाणावे.

५५२ लाप्रत्ययान्त धातुसाधित विशेषणा वरून मराठींत भूत काळाचीं रूपें साधतात; जसें—**निजलें, बांधिलें, शृंगारिली, करविला, घेवविले, नेशिल्या, रचिलीं,** इ०.

५५३ जसा त्या धातुसाधितांच्या ठायीं तसा या धातुसाधितांच्या ठायींहि हा आगम इकारान्त धातू वर्जून वैकल्पिक आहे, ह्मणोन—**निजलें, बांधलें, शृंगारली, करवला, घेववलें, नेसल्या, रचलीं, पाहिलें, लिहिलें,** इ० अशींहि रूपें लिहिण्याचा प्रघात आहे. या विषयीं पहा पृ० २६९, नि०५४४, [आ].

५५४ कित्येक धातूंच्या भूत काळाचीं रूपें नियमा प्रमाणें होत नाहींत, ते धातु व त्यांचीं तीं रूपें खालीं दाखविलीं आहेत.

| धातु. | भूत काळ. | धातु. | भूत काळ. |
|---|---|---|---|
| २ उडणें | उडाला | २ निवणें | निवाला |
| ३ उभणें | उभाला | पळणें | पळाला |
| ३ खिजणें | खिजाला | ३ बुजणें | बुजाला |
| ३ गळणें | गळाला | ३ बुझणें | बुझाला |
| ३ जळणें | जळाला | २ बुडणें | बुडाला |
| १ जिरणें | जिराला | १ भिजणें | भिजाला |
| ३ झिजणें | झिजाला | २ मिळणें | मिळाला |
| १ टळणें | टळाला | १ मुरणें | मुराला |
| २ तडणें | तडाला | ह्मणणें | ह्मणाला |
| २ दडणें | दडाला | रिघणें | रिघाला |
| १ दबणें | दबाला | ३ रिझणें | रिझाला |
| ३ दिपणें | दिपाला | ३ लपणें | लपाला |
| निघणें | निघाला | ३ विझणें | विझाला |
| १ निभणें | निभाला | २ विरणें | विराला |
| निमणें | निमाला | हिंवणें | हिंवाला |

या शिवाय आणखी शोधल्या वर अशा प्रकारचे आणखी धातु निघतील.

यांत ज्यांच्या मागें अंक मांडला नाहीं, त्यांचें भूत काळाचें रूप दाखविल्या प्रमाणें एक प्रकारचें मात्र होतें; ज्यांच्या मागें १ हा अंक आहे, त्यांचें रीतीनें जें रूप होतें त्याची प्रवृत्ति अधिक आहे; ज्यांच्या मागें २ हा अंक आहे, त्यांच्या वर लिहिलेल्या रूपांची प्रवृत्ति अधिक आहे; आणि ज्यांच्या मागें ३ हा अंक आहे, त्यांच्या दोन्हीं रूपांची सारखी प्रवृत्ति आहे; असें एथें समजावें.

६९९ खालीं लिहिलेल्या धातूंच्या भूत काळाचीं रूपें पूर्वोक्त नियमांत नाहींत.

| धातु. | भूत काळ | धातु | भूत काळ. |
|---|---|---|---|
| करणें | केलें | बघणें | बघितलें |
| मरणें | मेलें | मागणें | मागितलें |
| जाणें | गेलें | सांगणें | सांगितलें |
| येणें | आलें | खणणें | खणलें, खंटलें |
| होणें | झालें, जहालें | ह्मणणें | ह्मटलें |
| गाणें | गाइलें, (कों० गालें).* | हणणें | हंटलें |
| ध्याणें | ध्याइलें, (कों० ध्यालें) | पिणें | प्यालें |
| माणें | माइलें (कों० मालें) | भिणें | भ्यालें |
| घेणें | घेतलें | विणें | व्यालें |
| घालणें | घातलें | लेणें | ल्यालें |
| धुणें | धुतलें | देणें | दिलें |

भावीप्रयोग असतां **ह्मण** याचें भूतकाळाचें रूप **ह्मटलें** असें होतें.

**झालें** हें रूप लिहिण्याचे तीन चार प्रकार आढळतात,— **झालें, जाहालें, जहालें, जाहलें,** जसें.—

' कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे ' ॥ मोरोपंत

परंतु मला वाटतें **ह** आणि **झ** यांचें एका पक्षीं सावर्ण्य आहे, ह्मणोन **झालें** हेंच रूप लिहावें हा उत्तम पक्ष.. अथवा, संस्कृत भाषेच्या नियमा प्रमाणें **हस ज** हा अभ्यास करून **जहालें** असेंहि रूप साधण्याचा संभव दिसतो.

---

# वर्ग १२.

## क्रियापदां विषयीं आणखी स्फुट विचार.

५५६ हकारान्त जितके धातु आहेत, त्यांच्या आ-

---

* हीं कोंकणातलीं भूत काळाचीं रूपें जाणावीं.

ज्ञार्थी, द्वितीय पुरुषीं, एकवचनीं बहुधा शेवटीं आकारादेश करायाचा परिपाठ पडला आहे; व तो आकारादेश करित असतां विकल्पें पहिल्या आकारास ऱ्हस्व करितात; जसें–पाहा, पहा; साहा, सहा; राहा, रहा; चाहा, चहा; बाहा, बहा; इ०.

" माझा या बाहूचें स्मरण करुनि तूं मनीं पहा शील
अथवा रथवाजिद्विपभटकोटिप्रशमनीं पहाशील ".–मोरोपंत.

परंतु विचारपूर्वक पाहिलें असतां असा नियम आढळतो कीं, मराठी भाषेंत द्व्यक्षरी धातु अकारान्ता शिवाय नसतात. तेव्हां हे हकारान्त धातुहि मूळचे अकारान्तच खरे यांत संशय नाहीं; परंतु शब्दाच्या शेवटीं व मध्यें ह असतां त्यास दीर्घ केल्यानें त्याच शब्दांच्या उच्चारणांत फारसें अंतर समजण्यांत येत नाहीं, ह्मणोन यांस प्रमादानें पूर्वीपासून कोणी आकारान्त करून–**पहातो, रहातो, पहा, रहाशील, रहावेल,** अशीं रूपें लिहितात. परंतु मला वाटतें **पहा** असें रूप लिहिणें व्याकरणदृष्ट्या प्रशस्त नाहीं. एकवचनीं–**पाह, साह, राह,** अशीं रूपें, आणि अनेकवचनीं –**पाहा, साहा, राहा,** अशीं रूपें लिहिणें व्याकरणदृष्ट्या अधिक शुद्ध होय.

[अं] अथापि पूर्वीपासून पूर्वोक्त रीतीनें लिहिण्याचा प्रघात पडला आहे ह्मणोन या हकारान्त धातूंचीं विकल्पें आज्ञार्थीं उभयवचनीं **पहा, रहा, सहा,** अशीं रूपें लिहिलीं असतां चालेल.

पुढला हकार दीर्घ झाला असतां विकल्पें मागल्या आकारास ऱ्हस्व आदेश होतो असा नियम आढळतो ह्मणोन, जसें–लहान, सहान, तहान, पहाड, इ०, तसें पहातों, रहातों, वहातात, इ० अशीं रूपें कोणी लिहि-

तात; परंतु व्याकरणशुद्ध ह्मटलीं ह्मणजे **पाहतों, राह-ती, वाहतात,** इ० हींच रूपें खरीं.

६९७ कित्येक धातुसाधितांच्या योगानें अथवा इ-तर शब्दांच्या योगानें क्रियेचे अर्थच भिन्न होतात, अ-थवा ज्या क्रियेशीं त्या धातुसाधितांचा अथवा शब्दांचा संबंध असतो, त्यां पासून तीं धातुसाधितें अथवा शब्द निराळे काढिले तर अर्थच बसत नाहीं, अथवा कित्येक स्थळीं अर्थांत वैषम्यहि येतें. असें असल्यास व्याकरण करिते समयीं त्या धातुसाधितांचा अथवा शब्दांचा निर-निराळा व्याकरणपदच्छेद नकरितां त्या त्या धातुसाधितां सहित अथवा शब्दां सहित तीं तीं **संयुक्त** क्रियापदें ह्मणावीं ह्मणजे बरें; जसें—**विकत घेणें, जेऊं घालणें, चोरून पाहणें, घेऊन बसणें, तोंडीं लावणें, अंग धुणें, गा-शा गुंडाळणें,** इ०. उदाह०—'त्याणें घोडा विकत घे-तला,' 'तो ब्राह्मणास जेऊं घालील,' 'त्याणें चोरून पाहिलें,' 'तो माझें घर घेऊन बसला,' 'ती भाताशीं पापड तोंडीं लावित्ये,' 'ती अंग धुतली,' 'त्याणें तेथून आपला गाशा गुंडाळला' इ०; यांत—'**विकत घेतला,' 'जेऊं घालील,' 'चोरून पाहिलें,' 'तोंडीं लाविसे,' 'अंग धुतली,'** इ० हीं **संयुक्त** क्रियापदें ह्मणावीं.

हा राजमार्ग उघडल्यानें मला भरंवसा आहे कीं पुष्कळ सं-शय आणि वादविवाद दूर होतील.

६९८ कोणत्याहि क्रियेचा अथवा व्यापाराचा अ-**तिशयार्थ** अथवा **पौनःपुन्यार्थ** दाखिवणें इष्ट असल्यास **मूळ धातूस द्विवार अभ्यास करून एक नवें क्रियापद सिद्ध करितात; मग त्यांचीं इतर धातूं प्रमाणें भेद, अर्थ, काळ, प्रयोग, यांच्या अनुरोधानें रूपें साधितात; जसें—**

**करकरकरणें, लिहलिहलिहिणें, वाचवाचवाचणें, निजनिजनिजणें, जाजाजाणें, चालचालचालणें,** इ०. उदाहरणें—'त्यास एकदां कोणी सांगितलें ह्मणंजे तो करकरकरितो', 'त्यास लिह ह्मण ह्मणजे तो लिहलिहलिहील', 'त्याणें मुकाम सोडिला ह्मणजे चालचालचालावें अशी म्यां त्याची रीत पाहिली,' इ०.

५५९ आज्ञार्थी वर्तमान काळीं तृतीय पुरुषीं जो ऊकार आणि ओकार होतो, त्यां विषयीं आणखी दुसरा नियम असा आढळण्यांत येतो कीं, एकाक्षरी धातु असल्यास त्यास ऊकार, आणि अनेकाक्षरी असल्यास ओकार, विशेषंकरून होत असतो.

मराठींत हा क्रियापदविचार फार मोठा आणि अतिशय गुंतलेला आहे, त्याचें एथें संक्षेपेंकरून विवेचन केलें आहे; त्यांत मराठी क्रियापदांची जी ही गूत सोडवून कांहींशी उकलण्याच्या धोरणांत आणिली आहे, तें हें काम केवळ अपूर्व व नूतन आहे, ह्मणोन तें पूर्ण व पक्कें नसलें तरीं त्यांत ग्रंथकर्त्यास आपली सोडवणूक करून घेण्यास मोठा अवकाश आहे.

---

## भाग २.

### अविभक्तिक किं० अव्ययें यां विषयीं विचार.

५६० अविभक्तिक शब्द किंवा अव्ययें ह्मणजे ज्यांस कांहीं कार्यविशेष होत नाहीं, व मूळचें जसें त्यांचें स्वरूप असतें तसेंच निरंतर अविकृत राहतें, व ज्यांचा वाक्यरचनेंत फार उपयोग पडतो, असे जे शब्द तीं; जसें—**आणि, परंतु, किंवा, जर, तर, लौकर, तेव्हां, मग, नंतर, छी,** इ०.

या अव्ययांत **क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी, उद्गारवाची** अथवा **केवळप्रयोगी**, हे भेद आहेत.

---

## विभाग १.

### क्रियाविशेषण अव्ययें.

९६१ ज्या शब्दांनीं क्रियेच्या गुणाचा, अथवा प्रकाराचा, अथवा अमुक अवस्थेंत ती क्रिया घडली अशा अर्थाचा, बोध होतो, ते शब्द **क्रियाविशेषणें** जाणावीं; जसें–'हळू चालतो,' 'फार बोलतो,' 'खेळत जातो,' 'टपत बसतो,' 'कांपत लिहितो,' 'निमूट असतो,' इ० वाक्यांत–**हळू, फार, खेळत, टपत, कांपत, निमूट**, या शब्दांनीं त्या त्या क्रियेच्या प्रकाराचा किंवा गुणाचा किंवा अवस्थेचा बोध होतो.

९६२ मराठी भाषेंत क्रियाविशेषण अव्ययें तीन प्रकारचीं असतात.

प्रथम–शुद्ध अव्ययें असून जीं निरंतर क्रियाविशेषणें असतात तीं; जसें–हळू, लौकर, निमूट, पुनः, वारंवार मात्क्यान, झट, कडकडां, इ०.

दुसरीं–धातुसाधितें असून ज्यांचा क्रियाविशेषणांप्रमाणें प्रयोग होतो तीं; जसें–खेळत, हंसत, खेळतां, हंसतां, खेळतांनां, हंसतांनां, खेळत असतां, हंसत असतांनां, खाऊन, निजून, इ०.

तिसरीं–शुद्ध गुणविशेषणें असून ज्यांचा क्रिये कडेस संबंध असतो, ह्मणजे क्रियेच्या प्रकाराचीं अथवा गुणाचीं दर्शकें असतात, तीं. यांचा भरणा या भाषेंत फार आहे, किंबहुना जितकीं गुणविशेषणें तितकीं या भाषेंत

क्रियाविशेषणें होतात असें ह्मटल्यासाहि चिंता नाहीं; जसें–, तो चांगलें लिहितो,' 'ती गोड बोलत्ये,' 'त्या मधुर गातात,' 'पाखरें उंच उडतात,' इ०.

५६३ या भाषेंत गुणविशेषणांचीं क्रियाविशेषणें होत असतां त्यांस क्रियाविशेषणनिमित्तक कांहीं कार्यविशेष होत नाहीं, ह्मणून ज्या विशेषणांचीं रूपें विशेष्याच्या योगानें फिरत नाहींत, तीं क्रियाविशेषणें असतांहि त्यांस कांहीं विकार होत नाहीं. जसें–'तो **गोड** बोलतो,' ती **सुंदर** लिहित्ये,' 'कापूस **मऊ** लागतो,' 'दगड **कठीण** लागतो,' परंतु ज्यांचीं रूपें विशेष्याच्या लिंगवचनां वरून फिरतात, तीं क्रियाविशेषणें असतां त्यांचीं रूपें क्वचित् क्रियेच्या भावा वरून, क्वचित् कर्त्या वरून, आणि क्वचित् कर्मा वरून, फिरतात. तेव्हां अशा ठिकाणीं कांहीं नियम करणें इष्ट आहे.

[अ] जेव्हां हीं रूपें केवळ क्रियेच्या भावा वरून अथवा प्रकारा वरून फिरतात, ह्मणजे त्या भावाशीं अथवा प्रकाराशींच त्यांचा अन्वय असतो, तेव्हां त्यांचें नपुंसक लिंगीं एकवचनांत रूप असतें; जसें–'तो **चांगलें** लिहितो,' 'ती **उभें** शिवत्ये', 'त्या **तिरवें** पाहतात', इ०. जेव्हां वाक्यांत कर्त्याशीं अथवा कर्माशीं संबंध ठेऊन क्रिये कडेस त्यांचा अन्वय असतो, तेव्हां त्यांच्या त्यांच्या विशेष्याच्या लिंगवचना प्रमाणें त्या क्रियाविशेषणांचीं रूपें फिरतात; जसें–'तो **उभा** राहिला,' 'ते **उताणे** पडले,' 'त्या **उग्या** बसल्या', 'त्याणीं आपलीं घरें **तांबडीं** रंगविलीं असतां तुह्मीं आपलीं **हिरवीं** रंगवा,' 'तो तीं पुस्तकें त्या फडताळांत **उभीं** रचूं लागला तेव्हां त्यास साधलें नाहीं, परंतु जेव्हां

त्याणें तीं तिरवीं करून उताणीं रचिलीं तेव्हां तीं नीट बसलीं,' इ०.

[ आ ] अकर्मक क्रियापद असतां, अथवा सकर्मक क्रियापद असून त्याच्या कर्माचा स्पष्ट उल्लेख नसतां, जेथें क्रियाविशेषण पक्षीं कर्त्याच्या अनुरोधानें चालतें, अशा स्थळीं जों साधेल तों तें क्रियाविशेषण नपुंसकलिंगीं करून क्रियेच्या भावाचें अनुरोधी करावें ह्मणजे बरें; जसें— 'ती चांगली नाचत्ये,' 'तो बरा बोलतो,' 'खेंकडीं वांकडीं चालतात'; अशा ठिकाणीं—'ती चांगलें नाचत्ये', 'तो बरें बोलतो,' 'खेंकडीं वांकडें चालतात'; असें बोलण्याचा व लिहिण्याचा परिपाठ ठेविला असतां अधिक इष्ट आहे.

[ इ ] परंतु कित्येक क्रियाविशेषणें कर्त्याच्याच अनुरोधानें वागतात तेथें उपाय नाहीं; जसें—'ती उगी बसत्ये', 'ते उभे राहतात', 'त्या खणांत या पोथ्या आडव्या मावत्या', 'हत्ती शब्द उच्चारला कि लागलीच त्याची मांड पहिली मनांत येत्ये', 'ही सळई त्या छिद्रांत वांकडी जात नाहीं, उभी जात्ये;' 'ती मंजुळ गात्ये खरी,' इ०.

यांत असा नियम आहे कीं, अकर्मकर्तरि प्रयोग असतां आकारान्त क्रियाविशेषणें बहुधा कर्त्याच्या, आणि सकर्मकर्तरि व कर्मणि असतां कर्माच्या, अनुरोधानें वागतात.

९६४ सकर्मक क्रियापद असून जेथें तें क्रियाविशेषण केल्या वर कर्मासहित क्रियेच्या प्रकाराचें विधान करित असतें, तेथें तें क्रियाविशेषण कर्माच्या अनुरोधानें वागतें; जसें—'त्याणें तो ग्रंथ मोकळा केला,' 'तिणें आपली चोळी उलटी शिवली,' 'त्याणें कालच्या आर्या चांगल्या लां-

-विल्या,' इ०. या उदाहरणांत ग्रंथाचें मोकळें करणें, चोळीचें उलटें शिवणें, आणि आर्यांचें चांगलें लावणें, यांचें विधान आहे असें जाणावें.

'तो चांगल्या आर्या लावितो,' आणि 'तो आर्या चांगल्या लावितो,' यांत विशेषणाच्या स्थलांतरानें कांहींसा अर्थभेद, होतो खरा; म्हणजे एथें पहिल्या उदाहरणांत शुद्ध आर्यांचाच गुण प्रदर्शविला आहे, आणि दुसऱ्या उदाहरणांत त्या आर्या लावण्याचा जो प्रकार त्याचें विधान केलें आहे असें भासतें. परंतु हा अर्थभेद स्पष्ट समजण्या जोगा नाहीं.

५६५ हीं क्रियाविशेषणें क्वचित् दुसऱ्याहि क्रियाविशेषणाच्या अथवा विशेषणाच्या प्रकाराचा बोध करितात; जसें—'**फार** त्वरित बोलतो', 'तो **उत्कृष्ट** ठक आहे,' या वाक्यांत **फार** हें क्रियाविशेषण **त्वरित** या क्रियाविशेषणाचा प्रकार दर्शवितें, आणि **उत्कृष्ट** हें **ठक** या विशेषणाचा प्रकार दर्शवितें.

५६६ मराठी भाषेंत व्यापारादिकांचें अनुकरण कर्तव्य असतां ते अनुकार्य जे व्यापारादि, त्यांच्या स्थानीं कांहीं एक ध्वनितार्थसूचक शब्द कल्पून त्या पुढें—**कन**, **कर**, **दिनीं**, **दिशीं**, हे प्रत्यय लावून जे शब्द साधतात, अथवा द्विरुक्तीनें जे या प्रकारचे शब्द सिद्ध होतात, तीं सारीं क्रियाविशेषणें होतात; जसें—फटकन, फटकर, फटदिनीं, फटदिशीं; गटकन, गटकर, गटदिनीं, गटदिशीं; झटकन कर-दिनीं-दिशीं; गपगप, धसधस; बदबद, झटझट; फटफटां, बदबदां; फटाफट, सटासट, बदाबद, कडाकड, धडाधड; इ०.

या अशा अनुकरणरूप शब्दांचा या महाराष्ट्र भाषेंत जितका भरणा असेल तितका मला वाटतें आणखी कोणतेहि भा-

षेत नसेल; आणि तो या भाषेचा केवळ असाधारण चिन्हाळा होऊन राहिला आहे. गति, वेग, मांजुल्य, कार्कश्य, सौंदर्य, परिमिति, इत्यादि क्रियेचे शतावधि प्रकार दाखवायाचे असता त्या त्या अनुकरणरूप शब्दाचा प्रयोग होतो; जसें— **झटझट** चालतो; **चमचम** लवत्ये; **टकमक** पाहत्ये; **झणझण** वाजतें; **बदबद** पडतें; **टपटप** झरतें; **भडभड** ओकतें; **तडतड** बोलतो; **पुरपुर, भुरभुर, टुरटुर, पुरुपुरु, भुरुभुरु,** फाटतें; **तोंडोतोंड** भरतो; **कांठोकांठ** चालतो; 'छडी वाजे **छमछम,** विद्या ये **घमघम.**'

९६७ आणखी प्रौढ संस्कृत नामा पुढें—**पूर्वक, पुरःसर,** हीं अव्ययें लागलीं असतांहि तीं स्थलविशेषीं क्रियाविशेषण अव्ययें होतात; जसें—प्रीतिपूर्वक, स्नेहपूर्वक, लोभपूर्वक, बुद्धिपुरःसर, आस्थापुरःसर, इ०. 'कोणास प्रीतिपूर्वक दिलें तर तें त्यास विशेष ग्राह्य होतें,' 'मीं तुह्मांस स्नेहपूर्वक सांगतों,' 'त्याणें तें काम बुद्धिपुरःसर केलें,' इ०.

परंतु—'प्रीतिपूर्वक जें दान तें अधिक ग्राह्य,' 'स्नेहपूर्वक सत्कार,' 'भावपूर्वक पूजा,' 'आस्थापुरःसर कार्य,' इ० वाक्यांत—**प्रीतिपूर्वक, स्नेहपूर्वक, आस्थापुरःसर,** इ० **दान, सत्कार, कार्य,** इ० नामांचीं विशेषणें होत. परंतु मास्क्यान्—'स्नेहपूर्वक केलेला सत्कार' इ० प्रकारच्या वाक्यांत पुनः हीं **केलेला,** इ० धातुसाधितांचीं क्रियाविशेषणेंहि होतात.

९६८ कितीएक विशेषणें असून त्यांच्या योगानें सामान्यरूप होतें ह्मणून मागें विशेषणप्रकरणीं सांगितलें (पहा पृ० १४६, नि० ३५३,) त्यांचा जर क्रियाविशेषणा प्रमाणें प्रयोग झाला तर तीं तशींच कार्यें उत्पन्न करितात, ह्मणजे ज्या नामा पुढें तीं असतात, अथवा ज्यां नामांशीं त्यांचा संबंध असतो, त्यांचीं सा-

मान्यरूपें करून क्रियाविशेषणें होतात; जसें-'त्या उलटें तो करितो,''त्याच्या सारखें ती लिहित्ये,''साळूच्या विरुद्ध सखू हटकून करित्ये,' इ०.

५६९ कित्येक स्थळीं नुसत्या नामाचाच क्रियाविशेषणा प्रमाणें प्रयोग होतो; जसें-'तो काय **माती** करितो', 'तें पोर काय **दगड** लिहितें,' 'तो एक **क्षण** निजला नाहीं इतक्यांत उठला,' 'त्या एक **घडी** एथें राहत नाहींत.'

५७० कित्येक शब्दांस विभक्ति असतां त्यांचा प्रयोग शुद्ध अव्यया प्रमाणें होतो; ह्मणून त्यांस अव्ययेंच मानिलें तरी चिंता नाहीं; जसें-**इतक्यांत, सकाळला, दिवसास, रात्रीस, तशांत, पुरतेपणीं, चांगलेपणें, विशेषें-करून, वस्तुतः, वस्तुदृष्ट्या,** इ०. उदाह०-'**इतक्यांत** तो नाहींसा झाला','तूं उद्यां **सकाळला** ये,''**तशांत** मीं गेलों असतों,' '**वस्तुदृष्ट्या** पाहिलें असतां,' इ०; याच प्रमाणें—**मोठ्यानें, मुकाट्यानें, अनशेपोटीं, अनवाणीं,** अर्थाअर्थीं, **पुर्तेपणीं, बहुतकरून, वेळणेंवारचा, वेळणावारीं,** इ० आणखीं उदाहरणें जाणावीं.

५७१ प्रौढ भाषणांत व लेखांत संस्कृत विभक्त्यन्त शब्दांचाहि क्रियाविशेषण अव्ययांप्रमाणें प्रयोग या भाषेंत पुष्कळ आढळतो; जसें-**तस्मात्, वस्तुतः, वस्तुदृष्ट्या लोकरीत्या, व्यक्तिशः, जातिशः सर्वशः,** इ०.

५७२ एकाद्या समयीं अनेक अव्ययें एकत्र होऊन, अथवा अव्ययां वरून विभक्ति अथवा शब्दयोगी अव्ययें लागूनहि क्रियाविशेषण अव्ययें सिद्ध होतात; परंतु असें होत असतां एकारान्त अव्ययास अंतीं **अ** आदेश होतो; जसें—**जेथपर्यंत, जेथपावेतों, तेथपावे-**

**तों, एढोळपर्यंत, तेव्हांपासून, केव्हांचा, एथपासून, कितपर्यंत, एथपर्यंत, एथवर, एथोर, तेथवर, तेथोर**, इ०.

५७३ **प्रतिगांवास, प्रतिदेशास, एकामागेंएक, एकाचकाळीं**, इ०. अशा अर्थी त्या त्या देशवाचक व कालवाचक शब्दाची द्विरुक्ति करून पहिल्या पदास ओकारान्त व क्वचित् एकारान्त केलें असतां एक जातीचीं स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषण अव्ययें होतात; जसें—**गांवोगांव, देशोदेश, रानोरान, वेळोवेळ, घडोघडीं, परोपरीं, रातोरात, दिवसेंदिवस**, इ०.

५७४ कित्येक क्रियाविशेषण अव्ययें त्यांच्या अर्थासहित सांगतों.

स्थलवाचक . . तेथें, एथें, जेथें, इकडे, तिकडे, इ०.

कालवाचक . . तेव्हां, एव्हां, जेव्हां, केव्हां, उद्यां, काल, परवां, एरवां, शेवटीं, लागलाच, वारंवार, दरसाल, यंदां, गतसालीं, इ०.

संख्यावाचक. . एकदां, दोनदां, तीनदां, शंभरदां, इ०.

क्रमवाचक. . . पहिल्यानें, दुसऱ्यानें, तिसऱ्यानें, इ०.

निश्चयार्थक. . खचित, निःसंशय, निभ्रांत, इ०.

अनुकरणवाचक. फटकन्, गपकन्, चटदिशीं, टपकन्, टपदिनीं, गटगटां, गपागप, भडाभड, झटझट, टपटप, झणझण, इ०.

---

## विभाग २.

### उभयान्वयी अव्ययें.

५७५ ज्या अव्ययांचा संबंध दोन शब्दांच्या अथवा दोन वाक्यांच्या परस्पर अन्वया कडेस असतो, त्यांस उभयान्वयी अव्यय ह्मणावें; जसें—**आणि, जर, तर, प**.

रंतु, यद्यपि, तथापि, कांकीं, कांजर, जरकरतां इ०. 'रामा आणि कृष्णा तेथें गेले आहेत;' या वाक्यांत **आणि** या शब्दानें **रामा** आणि **कृष्णा** या उभयतांचा गमनक्रिये कडेस अन्वय करून दिला आहे, ह्मणजे रामा गेला, आणि कृष्णाहि गेला, असा अर्थ. तसेंच, 'त्याणें दहा हजार फौज घेतली, आणि दौलताबाद वेढिली'. या वाक्यांत **आणि** या अव्ययानें **घेतली** आणि **वेढिली** या दोन्ही क्रिया जोडिल्या आहेत.

या उभयान्वयी अव्ययांचे कित्येक अर्थ सांगतों.

समुच्चयवाचक.. **आणि, व, आणखी,** इ०. हीं अव्ययें शब्दांचा समुच्चय करितात, ह्मणजे त्यांस एकत्र करून जोडितात; जसें– 'रामा, कृष्णा, आणि गोपाळ, यांणीं ती गाई आणिली,' एथें **आणि** या अव्ययानें **रामा, कृष्णा,** व **गोपाळ,** या तिघांस मिळवून गाई आणण्या कडेस त्यांचा अन्वय लावून दिला; 'मला यजमानानें दक्षिणा आणखी वर एक शालजोडी दिली,' एथें **दक्षिणा** आणि **शालजोडी** या दोन शब्दांस **आणखी** या अव्ययानें जोडून **दिली** या क्रिये कडेस त्यांचा अन्वय लाविला आहे.

पक्षांतरबोधक.. **परंतु, पण, अथवा, किंवा, नाहींतर, पक्षीं, किंबहुना, किं,** इ०. हीं अव्ययें शब्दांचा वियोग करून दु-

सरा पक्ष दाखवितात; जसें- 'तो गेला, परंतु **काम** झालें नाहीं,' यांत **परंतु** या अव्ययानें **जाणें,** आणि **काम न होणें**, हे दोन निराळे पक्ष दाखविले. 'रामा लिहू **किंवा** गोपाळा लिहू,' 'रमा आली **किंवा** लक्ष्मी आली तरीं मला सारखीच,' 'तूं लिहिलेंस ह्मणून **बरें** झालें, **नाहींतर** मला कळलें नसतें.' अशा आणखी उदाहरणांतहि, त्या त्या अव्ययांनीं असेच दोन दोन निराळे पक्ष पाहून दाखविले आहेत.

न्यूनत्वबोधक.. **कदाचित्, क्वचित्, प्रायः, प्रायशः, बहुतकरून, फारकरून,** इ०. जसें- 'तो क्वचित् तेथें जातो,' 'तो कदाचित् आला तर येईल,' यांत न्यूनत्वाद्यर्थ दर्शविले जातात.

कारणोभयान्वयी. **कारण, कांकीं, कांजर, यास,** इ०. जसें-'तो मुलगा शहाणा आहे, कांकीं-कारण, तो नित्य शाळेंत जातो.'

संकेतोभयान्वयी. **जर, तर, जरीं, तरीं, यद्यपि, तथापि, जरकां,** इ०. जसें-'जर तो गेला तर मीं जाईन,' 'जरीं त्याणें मला वेडा ह्मटलें, तरीं त्याच्या ह्मणण्यानें मी वेडा होत नाहीं,' यांत मुख्यत्वें संकेतादि कित्येक अर्थ निष्पन्न होतात. एथें-**जर-तर, जरीं-तरीं,**

**यद्यपि-तथापि**—इ० कित्येक अव्ययें परस्पर संबंधा असतात.

या उभयान्वयी अव्ययांचे अर्था वरून आणखी उपभेद केले असतां होतील.

---

## विभाग ३.

### शब्दयोगी अव्ययें

५७६. ज्या अव्यया पासून दिग्रूप अथवा कालरूप अधिकरणाचा उद्बोध होतो, आणि ज्या शब्दाशीं याचा योग होतो, त्याचें याच्या योगानें सामान्यरूप होतें, असा जो शब्द तें शब्दयोगी अव्यय होय; जसें—**वर, खालीं, पुढें, मागें, नंतर, पूर्वी, कडे, समोर, मध्यें, सभोंवता, आसपास**, इ०.

हीं अव्ययें ओळखायाची मुख्य खूण हीच आहे कीं ज्या नामाशीं यांचा योग होतो त्यांचीं याच्या योगानें सामान्यरूपें होत असतात.

वर लिहिलेल्या शिवाय आणखी कित्येक शब्दयोगी अव्ययें सांगतों.—

बाहेर, मध्यें, आंत, ठायीं, कडे, मुळें, करून, कडून, करवीं, पासून, प्रत, करतां, अर्थीं, जवळ, पाशीं, अलिकडे, पलिकडे, पावेतों, पर्यंत, शिवाय, साठीं, सह, सहवर्तमान, बद्दल, ऐवजीं, प्रमाणें, सन्निध, सन्निकृष्ट, स्तव, समक्ष, परोक्ष, अपरोक्ष, देखत, देखतां, उलटें, व्यतिरिक्त, विरहित, जोगा, वारीं, इ०.

५७७. यांत **पावेतों, पर्यंत**, इ० कित्येक शब्दयोगी अव्ययांच्या योगानें ज्या शब्दांशीं यांचा योग असतो त्यांचीं सामान्यरूपें निरंतर होत नाहींत; परंतु

बहुधा ते कालवाचक असले तर; जसें—'दोन महिने पावेतों,' 'चार दिवस पर्यंत,' 'सकाळ पर्यंत,' इ०.

५७८ यांतून प्रदेशवाचक अथवा स्थलवाचक शब्दां वरून ऊन प्रत्यय लावला ह्मणजे अपादानपूर्वक गत्यर्थवाचक क्रियापदांशीं यांचा अन्वय असतां शब्दयोगी अव्ययें होतात; जसें—**वरून, खालून, इकडून, तिकडून, घरून, गांवून,** इ० जसें—वरून पडला, खालून आला, तिकडून मारलें, वरून आलों, इ०.

५७९ या शब्दयोगी अव्ययां वरून **चा** आणि **ला** हे लिंगवचनभेदेंकरून प्रत्यय लागले असतां 'तदधिकरणसंबंधी' अशा अर्थी विशेषणें होतात; जसें—**वरचा, पुढला, पलिकडची, अलिकडची, मागचे, समोरली, बाहेरच्या,** इ०.

५८० विकल्पें या शब्दयोगी अव्ययां वरून **ईल** प्रत्यय होऊनहि अशा अर्थी विशेषणें होतात; जसें— **पुढील** धोरण, **मागील** वहिवाट, **आंतील** वर्तणूक, **बाहेरील** डौल, इ०.

परंतु हे प्रत्यय प्राकृत शब्दां वरूनच होतात; **समीप, सन्निध, सन्मुख, सह,** आदिकरून संस्कृत शब्दां वरून होत नाहींत.

५८१ या शब्दयोगी अव्ययां मध्यें **शुद्ध शब्दयोगी** अव्यय ह्मणून एक आणखी उपभेद आहे. या शुद्ध शब्दयोगी अव्ययांचा प्रयोग शब्दां वांचून नुसता कधींच होत नाहीं, व तीं नुसतीं उच्चारिलीं असतां केवळ निरर्थक होतात; परंतु कोणत्याहि शब्दा पुढें योजलीं असतां त्यां पासून कोठें व्यावृत्ति, कोठें संग्रह, कोठें अवधारण, कोठें गौरव, इत्यादि अर्थ गम्यमान होतात.

आणखी या शुद्ध शब्दयोगी अव्ययांच्या योगानें ज्या शब्दाशीं यांचा योग होतो त्याचें सामान्यरूप होत नाहीं. हीं अव्ययें—च, हि, ना, कीं, देखील, देखीत, पण, मात्र, इ०. उदाह०'तूंच ये'अ०'तूं मात्र ये,' ह्मणजे तुझ्या बद्दल अ०तुझ्या बराबर इतरांस आणूं नको; एथें इतरांची व्यावृत्ति होत्ये. ' तूंहि ये' अ०'तूं देखील ये,' ह्मणजे आणखी येतील त्यांत तूं पण ये, एथें संग्रहार्थ उपलब्ध होतो; यांत च, मात्र, यांचा प्रयोग सर्व जातींच्या शब्दांशीं होतो; जसें–'तूं जाच,' 'ती हळूच चालत्ये,' 'तो गोळा वाटोळाच आहे,' 'तूं इतकें मात्र बोल कीं मीं जातों;' इ०. 'तूं जातोसना' ? ह्म० तूं जातोस कीं नाहीं? असा प्रश्न; 'तूंना जातोस'? ह्म० तूं जातोस किंवा आणखी कोणीं जातो. तूं करतोस कीं, लिहितोस कीं, हीं आणखी देशस्थ भाषेचीं उदाहरणें.

यांत **च, कीं, ना,** हीं वर्जून अर्थास अनुकूल पडल्यास इतरांस क्रियाविशेषणें मानिलें तरीं चिंता नाहीं असें मला वाटतें. अशा जातीच्या शब्दांस संस्कृत वैयाकरण **निपात** म्हणून संज्ञा देतात; व त्यांचे अनेक अर्थ होतात म्हणून सांगतात. हें वर लिहिल्या उदाहरणां वरून स्पष्ट दिसतें.

---

## विभाग ४.

### केवलप्रयोगी अ०उद्गारवाची अव्ययें.

१८२ जीं अव्ययें वाक्यांत असतां ज्यां वरून वक्त्याचे अथवा सांगणाराचे हर्षशोकादि जे मानसिक विकार अथवा उद्गार यांचा उद्बोध होतो, असें कळतें, त्यांस **केवलप्रयोगी** अ० **उद्गारवाची** अव्ययें ह्मणतात.

यांत– धिक्कार, दुःख, तिरस्कार, हर्ष, उत्कर्ष, विस्मय, इत्यादि मानसिक विकार दाखविणारीं कांहीं मुख्य अव्ययें सांगतों.

## उद्गारवाची अव्ययें.

धिक्कार....छी, छिः,छ, छित् थू, उंः, अंः,धिक्,इ०.
दुःख ....उंः, अँः,हायहाय, आईआई, हरहर. रामराम, इ०.
तिरस्कार....इश्श, फिश्श, फू, थत्, इ०.
हर्ष ....अहा, वाः, काय मौज ! इ०.
धन्यता...वाहवा, शाबास, भले, इ०.
आर्जव....जी.
आश्चर्य...अहा, बबब, अ० अबब, कायहो.

संबोधनीं जीं उद्गारवाची अव्ययें तीं लिंगवचनानुसंधानानें असतात.

| **लिंग.** | **एकव०** | **अनेकव०** |
|---|---|---|
| पुल्लिंग | अरे,रे,अगा,अजि. | अहो,हो,अगा, अजि. |
| स्त्रीलिंग | अगे, गे,अगो,गो,ग. | अहो,हो,अगा, अजि. |

एखाद्या समयीं सर्व वाक्याचें वाक्य उद्गाराच्या अर्थी येतें. तेव्हां संक्षेपानें व्याकरण करणें झाल्यास त्या सर्व वाक्यास या अव्ययांत टाकिलें तरीं चिंता नाहीं; उदाह०-**विष्णवेनमः** तुह्मी त्याची गोष्ट मज जवळ काढूं नका,' '**तथास्तु** महाराज,' '**कां होईना,** आतां आपण यावें,' 'तूप कोठलें, **रामाय तस्मै नमः** ह्मणा.'

९८३ कधीं कधीं या अव्ययाचा प्रयोग नामा सारखाहि करितात; उदाह०–'काल शाळेंत रामाची वाहवा झाली,' 'गोपाळाची छीथू तुह्मीं ऐकिली असाल' इ०.

केव्हां केव्हां संबोधनीं नामाचीं रूपें असतां त्यांचा

या केवलप्रयोगी अव्यया प्रमाणें प्रयोग करितात; जसें—
हरहर ! शिवाशिव ! नारायणा !

९८४ या शिवाय आणखी कित्येक शब्दांचा प्रयोग शुद्ध वाक्यालंकारार्थ अथवा पादपूरणार्थ, अवधारणार्थी अ० स्वार्थी होतो, असे शब्द या भाषेत बरेच आढळतात; ते असे कीं-**आपला, बेटा, बेटें, परता, मग, वरीक, कीं, ह्मणून, घ्या**, इ०. उदाह०—'तो आपला कांहीं तरीं बोलतो,' 'मग बेटें असें झालें,' 'तूं जाईसना परता,' 'तो बरीक चंचळ खरा,' 'ती बरीक गात्ये खरी,' 'तूं जाकीं,' 'तितकें तुह्मीं त्याला बोला कीं,' तो आमच्यांत काय ह्मणून बोलतो,' 'ती कोठें ह्मणून जात नाहीं,' 'तो ह्मणून त्याशीं भांडतो,' 'तुह्मीं कोण कोणते ह्मणून ग्रंथ आतां वाचाल,' 'हा घ्या मी जातों,' अशा शब्दास कोणी **पालव पदें** ह्मणतात.

---

## खंड ४.

## साधितशब्दविचार.

९८५ एथपर्यंत, मूळ प्रकृतीस अथवा साधितांस विभक्त्यादि प्रत्यय लागून जीं जीं शब्दसिद्धिरूप कार्यें होतात, तद्विषयक प्रकरणाचें विवेचन झालें. आतां मूळच्या सिद्धशब्दां वरून साधिलेले जे इतर शब्द त्यांचा व्युत्पत्तिप्रकार एथें संक्षेपरूपानें वर्णन करितों.

वर संक्षेपरूपानें वर्णन करितों ह्मणून सांगितलें, तें अत्यंत संक्षेपरूपानें ह्मटलें पाहिजे होतें; कारण हा साधितशब्दविचार इतका विस्तीर्ण व गहन आहे कीं, या महाराष्ट्र भाषेंत सरावांत पडलेले, व महंता सारखे आपआपल्या मरातबा प्रमाणें प्रौढस्थानारूढ असलेले, संस्कृत शब्द गाळून निवळ मराठी

शब्दांची जरीं साधणूक करूं लागलों तरीं हा ग्रंथ अनाटोप वाढेल यांत किमपी संशय नाहीं. आणि जरीं ती साधणूक फारच स्पृहणीय आहे असें मला स्पष्ट दिसतें, तरीं, तें प्रकरण निराळ्याच ग्रंथाचा विषय केलें पाहिजे. तथापि साधेल तितकें संक्षेपरूपानें, सर्व तर नाहींच, परंतु मुख्य मुख्य व ठळक ठळक अशा या भाषेतल्या साधित शद्बांचें थोडें तरीं विवरण करून दाखविलें पाहिजे तें या खंडांत केलें आहे, इतकेंच प्रस्तुत एथें समजलें पाहिजे.

५८६ साधितें दोन प्रकारचीं आहेत; एक धातू वरून अथवा क्रियापदां वरून साधलेले जे शद्ब तीं; यांस संस्कृतांत **कृदंत** ह्मटलें आहे; परंतु एथें **धातुसाधितें** ह्मटलें आहे; आणि एक धातू व्यतिरिक्त शद्बां वरून साधलेले जे शद्ब तीं; यांस संस्कृतांत **तद्धित**, परंतु एथें **शद्बसाधितें** ह्मटलें आहे.

---

## भाग १.

### धातुसाधितें.

५८७ धातूं वरून अथवा क्रियापदां वरून साधलेले जे शद्ब तीं धातुसाधितें ह्मणावीं; यांत मुख्य तीन भेद आहेत;—नामें, विशेषणें, आणि अव्ययें. हीं त्यांच्या त्यांच्या प्रत्ययांच्या अनुक्रमानें एथें सांगतों.

क्रियापदांचे जे मूळधातु तींच केव्हां केव्हां धातुसाधित नामें होतात; जसें—**आदळ**, उकड, उघड, **खुरखुर**, **मार**, **तोड**, **रड**, **धांव**, **मोड**, इत्यादि. उदाह०-‘त्याचा **मार** कठीण,’ ‘त्या गोष्टीची कांहीं तरीं **तोड** करायाची होती,’ ‘**ही रड** माझ्यानें ऐकवत नाहीं,’ इ०.

आ—— कित्येक धातूं वरून कर्मार्थी व भावार्थी हा **आ**प्रत्यय लागतो; ह्मणजे मूळधातुरूप जे शद्ब त्यांस आकारान्त केल्यानें जीं धातुसाधित नामें होतात, त्यांपासून कर्म, भाव, हे अर्थ निष्पन्न होतात; जसें—**ठेवा**, **ठेंचा**, **भरडा**, **लेखा**, **वेढा**, **झगडा**, **झिडकारा**, इ०.

आऊ—— ती ती क्रिया करायास योग्य अथवा शक्य, सिद्ध, अथवा प्रवण, अशा अर्थी त्या त्या धातू वरून हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात; जसें—**पाळाऊ**, **जळाऊ**, **टाकाऊ**, **विकाऊ**, **शिकाऊ**, **विणाऊ**, **लढाऊ**, इ०. **पाळाऊ**, ह्म० पाळायास योग्य, **जळाऊ** ह्मणजे जळायास योग्य अथवा शक्य, इ०. **लढाऊ** ह्म० लढायास योग्य, सिद्ध, इ०.

आयास-ला, **आवयास-ला** सर्व धातू वरून निमित्तार्थी व करणार्थी हे प्रत्यय लागून धातूसाधित अव्ययें होतात; जसें—**करायास-ला**, **करावयास-ला**; **बोलायास-ला**, **बोलावयास-ला**; **घ्यायास-ला**, **घ्यावयास-ला**, **व्हायास-ला**, **व्हावयास-ला**. यांत थोडें उगीच लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, **आवयास-ला** या पेक्षां **आयास-ला** याचा प्रचार बोलण्यांत अधिक आढळतो, **आवयास-ला** याचा लिहिण्यांत. कवितेंत **स—ला** हे चतुर्थीचे प्रत्यय गाळून

नुसतीं सामान्य रूपें ठेवूनहि अशा रूपाचा प्रयोग करितात; जसें—

"सुजनासी **ताराया**——

**माराया** दुष्टातें पृथ्वीचा सर्व भार **हाराया**॥" मेरोपंत.

ई—— कोठें मूलधातुरूप जे शब्द त्यांस ईकारान्त केल्यानें क्रियावाचक, कर्मवाचक, करणवाचक, अतिशयार्थवाचक अशीं धातुसाधित नामें होतात; जसें—**उडी, बुडी, खाई, थुंकी, थापटी, थापी,** इ०. जसें—उडण्याची, बुडण्याची, जी क्रिया अथवा व्यापार ती **उडी, बुडी**; अतिशय खाण्याची जी क्रिया ती **खाई**; थुंकून टाकलें ती **थुंकी**; थापटून मारलें ती **थापटी**; ज्याणें थापायाचें ती **थापी**; इ०.

ईव—— ती ती क्रिया ज्यां वर घडली आहे, अथवा घडायास योग्य आहे, ते पदार्थ विवक्षित असतां मूलधातू वरून हा प्रत्यय होतो; जसें—**सोलींव, कोरींव, घोटींव, कांतींव, ओतींव, पेरींव, भरडींव,** इ०. सोललेलें, अ० सोलाया जोगें-तें **सोलींव**; कोरलेलें अ० कोराया जोगें-तें **कोरींव**; कांतलेलें अ० कांताया जोगें-तें **कांतींव**; इ०. कोठें प्राकृत ग्रंथांत स्वार्थीं व भावार्थींहि हा प्रत्यय होतो; जसें—**जाणींव, नेणींव.**

"ज्ञान म्हणों तरीं नाहीं **जाणिव**। अज्ञान म्हणों तरीं नाहीं **नेणिव**।
अभाव म्हणों तरीं टेंव। नवल आनंदाची॥" विवेकसिंधु.

ऊ——**खा, गा,** इ० कित्येक आकारान्त धातूं

वरून हा प्रत्यय होऊन योग्यार्थी अ० कर्मार्थी धातुसाधित नामें होतात; जसें— **खाऊ, गाऊ,*** इ०.

मूळ धातू वरून कर्त्रर्थी हा प्रत्यय केला असतां धातुसाधित विशेषणें होतात; जसें—**भरू, काढू, मारू, खाऊ,** इ०; परंतु हीं धातुसाधित विशेषणें बहुधा निरंतर तत्तत्कर्मवाचक नामांशीं जोडलेलीं असतात; जसें—**पोटभरू, गरजकाढू, मनमारू, भाजीखाऊ,** इ०. क्वचित् या ऊकारान्त धातुसाधितांस पुढें आणखी विनोदार्थ **बा, जी,** हे आदरार्थी शब्द जोडून धातुसाधित नामें करितात; जसें— **देऊबा, घेऊबा, घेऊजी, देऊजी,** इ०.

उं—— कित्येक धातू वरून भावार्थी हा प्रत्यय होऊन धातुसाधित नामें होतात; जसें— **हंसूं, रडूं,** इ०. उदाह०—'त्यास **हंसूं** आटोपेना,' 'त्या काळीं तिला **रडूं** आलें,' इ०. परंतु या धातुसाधित नामांस प्रथमे शिवाय इतर विभक्ति लागत नाहींत.

सर्व धातू वरून निमित्तार्थी हा प्रत्यय होऊन धातुसाधित अव्ययें होतात; जसें—**देऊं, घेऊं, करूं, बोलूं, साचवूं, आठवूं, देववूं, हंसवूं,** इ०.

ऊन—— एक क्रिया घडून दुसऱ्या क्रियेची

---

*तान्ह्या मुलांस निजवितांना अ० पाळणा हालवितांना जें गाणें गातात तो.

विवक्षा असतां या घडून गेलेल्या क्रियेच्या मूलधातू वरून हा प्रत्यय होऊन पूर्वकालवाचक धातुसाधित अव्यय होतें; जसें—**देऊन, घेऊन, करून, मारून, बोलून, चालून, ह्मणून,** इ०. उदाह०—'तो मला मारून गेला,' एथें मारणें ही क्रिया पहिली घडून तदनंतर जाणें ही क्रिया घडली, असा अर्थ.

या धातुसाधिता पासून कार्यकारण भावाचाहि बोध होतो; जसें—'तो खाऊन माजला,' 'पिऊन मस्त झाला,' इ०. एथें **खाऊन, पिऊन,** ह्मणजे खाण्या मुळें, पिण्या मुळें, असा अर्थ.

क्रियेस अवधि करून तेव्हां पासून काळगणना करायाची असतांहि या **ऊन** प्रत्ययान्त धातुसाधितांचा प्रयोग करितात;उदाह०—'मला ही पोथी **लिहून** दहा वर्षें झालीं,' 'त्याला मरून एक युग गेलें,' इ०. ह्मणजे पोथी लिहिल्या काळापासून,तो मेला त्या काळा पासून आजपर्यंत, असा अर्थ.

**एँ**—— रड, हंस, इ० कित्येक धातू वरून भावार्थी हा प्रत्यय होऊन नामें होतात; जसें—**रडें, हंसें,** इ०.

**करण**— 'तें तसें नसतां तसें करणें,' अथवा 'त्याचें तसें करणें,' अशा अर्थी बहुतेक अकारान्त संस्कृत नामें, विशेषणें

व **क्रियाविशेषणें**, यांस ईकारान्त करून त्या पुढें हा शब्द जोडल्यानें फार उपयोगी क्रियावाचक शब्द सिद्ध होतात; जसें—सम नसतां सम करणें, अथवा समाला सम करणें, तें **समीकरण**, दृढ नसतां दृढ करणें तें **दृढीकरण**, प्रकट नसतां प्रकट करणें तें **प्रकटीकरण**; याच प्रमाणें— **वशीकरण**,**पुष्टीकरण**,**जडीकरण**,**द्रवीकरण**, **अंगीकरण**, **संगतीकरण**, **स्वीकरण**, इ॰. आणि या शब्दां वरून कर्मवाचकें—**समीकृत**, **दृढीकृत**,**अंगीकृत**, **स्वीकृत**, इ॰ अशीं होतात. आणि 'तसें झालेलें' अशा अर्थीं या ईकारान्तास **भूत** हा शब्द जोडल्यानेंहि दुसऱ्या प्रकारचीं कर्मवाचकें सिद्ध होतात; जसें—**शुचिर्भूत**, **वशीभूत**, **द्रवीभूत**, इ॰.

**का**—— **मार**, **रड**, **फाट**, इ॰ कित्येक धातूं वरून कर्त्रर्थीं अतिशयार्थीं,व कोठें ईषदर्थीं, स्वार्थीं, करणार्थीं, व अधिकरणार्थीं हा प्रत्यय होऊन विशेषणें व नामें होतात; जसें—**बसका**, **मारका**, **रडका**, **फाटका**, **तुटका**, **मोडका**, इ॰. उदाह॰—, 'बसकें नाक,' 'मारकी पोरगी,' 'या मारक्याच्या वाटेस जाऊं नको; इ॰.**फाटका**, **तुटका**, **मोडका**, ह्मणजे फाटलेला, तुटलेला, मोडलेला, इतकाच अर्थ.

**ण**—— बहुतेक धातूं वरून, भाव, कर्म, करण,

अधिकरण, योग्यता, इत्याद्यर्थीं हा प्रत्यय होऊन धातुसाधित नामें सिद्ध होतात; जसें—**तारण, पोषण, सारवण, भांडण,** इ० भावार्थ; **दळण, नेसण चाटण, मिरवण, घुसळण,** इ० कर्मार्थ; **चाळण, झाडण, धरण, कालवण, झाडवण,** इ० करणार्थ; **दडण, लवण, चढण, उतरण,** इ० अधिकरणार्थ. समयाविशेषीं एका शब्दाच्या ठायीं हे अनेक अर्थहि संभवतात; जसें—दळण, कांडण, घुसळण, इ०. उदाह०—'सखूचें **दळण** चांगलें,' एथें **दळण** ह्मणजे दळण्याची क्रिया; 'आज तुझें **दळण** जाड आलें,' एथें **दळण** ह्मणजे दळलेलें जें तें कर्म; 'इतकें **दळण** आज कोण दळील,' एथें **दळण** ह्मणजे दळायाचें अथवा दळायास योग्य जें तें. '**घुसळण** घाली रखमाबाई,' एथेंहि हाच अर्थ-

**णा**—— कित्येक धातूं वरून भावार्थीं, अथवा कर्मार्थीं, अथवा करणार्थीं, अथवा अधिकरणार्थीं, हा प्रत्यय होतो; जसें—**भरणा, नितळणा, रमणा,** इ० उदाह०—'या गोसांव्या पाशीं आर्यांचा भरणा फार आहे,' 'त्याणें सरकारांत ऐवजाचा **भरणा** केला,' 'सोनाराचा **नितळणा,** ह्म० नितळण्याचें अवजार,' पूर्वीं पर्वतीं जवळ **रमणा** होता.' इ०. कोठें हीं विशेष-

णेंहि होतात; जसें–**धारजणा-जिणा,** 'कसाबास गाई धारजणी-जिणी,' धारजणें या क्रियापदा वरून, **देखणा** (देखणें) देखायास-पहायास योग्य,–दर्शनीय,-सुंदर. कित्येक मूळ संस्कृत धातूं वरून जो स्त्रीलिंग प्रत्यय लागून **ना** होतो त्याच्या ठिकाणीं मराठींत पूर्वोक्त अर्थी **णा** प्रत्यय होतो: जसें–**हेळणा, छळणा, तुळणा,** इ०.

**णाऊ**——हा प्रत्यय बहुधा ती ती क्रिया करायास योग्य अथवा शक्य जो पदार्थ त्याच्या अर्थी होतो; जसें–**ठेवणाऊ खाणाऊ,** इ०.

**णार**—— सर्व धातूं वरून भविष्यार्थी हा प्रत्यय होऊन कोठें भविष्य काळीं क्रियापदें होतात, व कोठें नामें होतात; जसें–**जाणार, येणार, निजणार** इ०. उदाह०–'मीं उद्यां तेथें जाणार,' 'तुह्मीं आलेत तर तोहि तेथें येणार,' इ० वाक्यांत **जाणार, येणार,** हीं भविष्यकालवाचक क्रियापदें जाणावीं. परंतु, 'तुह्मीं पानें वाढिलींत परंतु जेवणार कोठें आहेत,' 'एक जोडणार आणि पन्नास खाणार,' 'मारणाराचा हात धरवेल, परंतु बोलणाराचें तोंड धरितां येत नाहीं,' इत्यादि वाक्यांत हीं **णार**प्रत्ययान्त नामें जाणावीं.

**णारा**—— सर्व धातूं वरून कर्त्रर्थी हा प्रत्यय होऊन बहुधा धातुसाधित विशेषणें हो-

तात; जसें—**बोलणारा, हंसणारा खाणारा, घेणारा, देणारा.** इ० विशेषणें होत. उदाह०—'मासे खाणारी माणसें,' 'फिरणाऱ्या गाई,' 'या गलबता वर चढणारे उतारू कोठें आहेत,' इत्यादि वाक्यांत **णारा**प्रत्ययान्त जे शब्द तीं विशेषणें जाणावीं.

**णावळ**—— 'त्या त्या क्रियेचें अथवा व्यापाराचें मोल अ० मजुरी' या अर्थी **ण** प्रत्ययान्त अथवा **णें** प्रत्ययान्त धातुसाधितां वरून **आवळ** प्रत्यय होऊन धातुसाधित नामें सिद्ध होतात; जसें—**खाणावळ लिहिणावळ, घडणावळ, दळणावळ, धुणावळ,** इ०.

थोडक्या धातूं वरून ती ती क्रिया घडल्यानें जी कसर जात्ये त्या अर्थींहि हा प्रत्यय होतो; जसें—**सुकणावळ झिजणावळ, कापणावळ, वेरणावळ,** इ०. ह्मणजे सुकल्यानें, झिजण्यानें, कापण्यानें, वेरल्यानें, जी त्या त्या पदार्थांत कसर जात्ये ती.

**णी**—— बहुतेक धातूं वरून भाव, कर्म, करण, इत्याद्यर्थी हा प्रत्यय होऊन धातुसाधित नामें होतात; जसें—**करणी, पाहणी, राखणी, पेरणी, पुरवणी, लाटणी, लेखणी, चाळणी, लावणी, तासणी,** इ०

**णूक**—— कित्येक धातूं वरून भाव, कर्म, इत्या-

द्यर्थी हा प्रत्यय होऊन धातुसाधित नामें होतात; जसें—**गांजणूक, जळणूक, मिरवणूक, जाचणूक, वर्तणूक नांदणूक, ठवणूक नेमणूक,** इ०.

**णें**—— सर्व धातूं वरून धात्वर्थसूचक हा प्रत्यय होतो; जसें–**बोलणें, हंसणें, बसणें, उठणें,** इ० तसेंच भाव, कर्म, करण इत्याद्यर्थींहि हा प्रत्यय होतो; जसें–**नाचणें, बोलणें, लिहिणें, बांधणें, मिरवणें, खेळणें, लाटणें,** इ०.

**त**—— सर्व धातूं वरून हा प्रत्यय होऊन वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययें होतात; जसें–**जात, नाचत, ठेवित, करित,** इ०.

**उमज** धातूचा गण वर्जून अकारान्त सकर्मक धातूंस हा प्रत्यय लागतांनां मध्यें **इ** आगम होतो; जसें–**करित, मारित, ठेवित,** (पहा पृ०२६४, नि०५४४.)

**ता**—— सर्व धातूं वरून कर्त्रर्थीं हा प्रत्यय होऊन नामें व विशेषणें होतात; जसें—**रडता, हंसता, जाता, येता, घेता, देता, बोलता, मारता, खाता, पिता, शिकविता, खेळविता, 'रडती पोरगी,' 'करता मनुष्य,' 'रांगतें मूल,' अडपती** नाहीं **सासू, बडपता नाहीं भावा,'** इ०,

प्रयोजक धातूं वरून हा प्रत्यय होत असतां मध्यें इ आगम होतो; जसें-**करविता, ठेवविता** इ०.

शाळुंकी ते कैशी बोले मंजुळवाणी
शिकविता धणी वेगळाची.—तुकाराम.

**तां**—— अन्यक्रियासापेक्षत्व असतां सर्व धातूं वरून हा प्रत्यय होऊन धातुसाधित अव्यय होतें; ( एथेंहि तप्रत्ययान्त धातुसाधिता प्रमाणें इ आगमाचा नियम जाणावा. )जसें—**जातां, येतां, घेतां, करितां, देववितां, अंगीकारितां**, इ०.

**तांना**—— सर्व धातूं वरून तांप्रत्ययार्थी हाहि त्याच नियमानें प्रत्यय होतो; जसें—**खातांनां,जातांनां,सांगतांनां,भरवितांनां**,इ०.

**या**—— कित्येक मराठी धातूं वरून 'कर्त्रर्थी,' अथवा 'तें करण्याची ज्यास टेव आहे' अशा अर्थी, थोडा कुत्सितार्थ दाखवायाचा असतां हा प्रत्यय होतो; जसें **उपट्या, उडव्या, चुकव्या, ठकव्या, लाव्या, मार्‍या.**

या शिवाय आणखी कित्येक धातूं वरून पूर्वोक्त व इतर नाना अर्थी असाधारण असे अनेक प्रत्यय होऊन अनेक शद्ब सिद्ध होतात, त्यांची गणना एथें कोठवर करावी; व तशी करणें हा मोठ्या ग्रंथांतराचा विषय होय; ह्मणोन ही जी एक दिशा दाखविली इज वरून बुद्धिमानांनीं धातू वरून शद्ब कसकसे व्युत्पन्न होतात हें समजावें.

---

# भाग २.

## शब्दसाधितें.

५८८ धातु अथवा क्रियापद यां शिवाय जे शब्दाचे प्रकार त्यांस शब्द असें एथें संज्ञार्थ ह्मटलें आहे.

५८९ या शब्दां वरून व्युत्पन्न झालेले शब्द तीं **शब्दसाधितें** ह्मणावीं. आतां हीं शब्दसाधितें अगणित आहेत, तितक्यांचे प्रकृतिप्रत्यय साधूं गेलें असतां अटोपेनासा ग्रंथ होऊन इतक्या खटाटोपी पासून नव्या शिकणारांस तादृश उपयोगहि होणार नाहीं. ह्मणोन काय जे मुख्य व व्यापक प्रत्यय तेच वर्णानुक्रमानें एथें लिहून दाखवितों.

**आ**—— पदार्थाचें स्थूलत्व दाखवायाचें असतां तत्पदार्थवाचक मूळ शब्दां वरून हा प्रत्यय होतो; जसें–**विळा, पोळा, पानगा, भाकरा, सुरा, चुला, आरसा, डबा,** इ० शब्दां वरून साधले आहेत असें समजावें.

असे शब्द स्वच्छंदानें व विनोदानें हावे तितके साधितां येतील; जसें–**भाकरा, छत्रा, झोळा, धोंगटा, साडा, लेखणा,** इ०. परंतु साधणारांनीं मात्र जे चौघांच्या कानास गोड लागतील त्यां शिवाय भलतेच साधून आपला विनोद करून घेऊं नये, इतकें सांभाळावें.

**आई**—— कित्येक प्राकृत शब्दां वरून भावार्थीं, अधिकार, व त्या अधिकारा खालचा प्रदेश, इत्याद्यर्थीं हा प्रत्यय होतो;

जसें—नवाई, धिट्टाई, नष्टाई, दांडगाई, महागाई, सस्ताई; इ०. मोगलाई, पेशवाई, एथें अधिकार, व त्या अधिकारा खालचा देश.

आळू—— हा मूळचा संस्कृत आलु प्रत्यय होय; परंतु प्राकृत शब्दां वरून याचें आळू असें रूपांतर होतें; झोंप, लाज, इ० शब्दां वरून 'तें ज्यास आहे, अ० अतिशय आहे,' या अर्थी हा प्रत्यय होतो; जसें—झोंपाळू, लाजाळू, विसराळू, कृपाळू, मायाळू, दयाळू, स्नेहाळू, इ०.

परंतु शुद्ध संस्कृत शब्दां वरून हा प्रत्यय न साधितां मूळचा जो आलु प्रत्यय तोच योजावा हा उत्तम पक्ष; जसें—दयालु, कृपालु, मायालु, निद्रालु, इ०. तथापि दयाळू, मायाळू, कृपाळू, इ०. शब्द आतां केवळ प्राकृत होऊन गेले आहेत, म्हणोन ते असे लिहिण्यांत अगदीं दोष नाहीं.

आट—— शब्दास प्रतिशब्द लावल्यानें अथवा द्विरुक्तीनें साधलेला जो या मराठी भाषेंत शब्दांचा मोठा भरणा आढळतो, त्यांतून अशा कितीएक अकारान्त शब्दां वरून अतिशयार्थी, पूर्णार्थी, व कोठें बलार्थी व स्वारस्यार्थी, हा प्रत्यय होऊन एका प्रकारचे शब्द सिद्ध होतात; जसें—भरभराट, दणदणाट, खडखडाट, घडघडाट, खळखळाट, कडकडाट, इ०.

आळ—— तें तें करायाची जी खोडी, व्यसन, अथवा वाईट चाल, ज्या ज्या साधनांनीं

करितात, त्या त्या साधनवाचक शब्दां वरून 'तें तें जो करितो तद्वाचक' हा प्रत्यय होऊन नामें व विशेषणें होतात; जसें— **तोंडाळ, हाताळ, लाताळ, खोड्याळ, वाचाळ**, इ०; उदाह०—'हाताळाचा हात धरवेल, परंतु तोंडाळाचें तोंड धरवत नाहीं,' 'तें पोर हाताळ आहे संभाळा,' 'लाताळ घोडें,' 'वाचाळ बायको,' इ०.

ई—— 'तेथें जें उत्पन्न,' अथवा 'त्याशीं ज्याचा संबंध,' अथवा 'त्याणें अ० त्याचें जें केलेलें,' अथवा 'तें ज्या जवळ अ० ज्यास आहे,' अथवा 'त्यांत ज्याचें परिज्ञान आहे,' इत्याद्यर्थी, व भाव, अधिकार, व अधिकारा खालचा देश इ० अर्थी त्या त्या शब्दा वरून ई होतो; परंतु हे शब्द अकारान्त असावे: जसें—**पैठणी, काश्मिरी, शहागडी, दौलताबादी;—सर्कारी;—गुलाबी, साखरी, कागदी;—सुगंधी, धनी, लोभी;—साधनी, विवेकी, ज्ञानी, गुणी, शास्त्री, ज्योतिषी, व्याकरणी**, इ०.

आणखी भाव, मजुरी, काम, अधिकार, अधिकारा खालचा देश, इत्याद्यनेक इतर अर्थींहि हा प्रत्यय होतो; जसें— **गरिबी, मातवरी, दलाली, गुलामी, चाकरी, मजुरी, कारकुनी**, फ-

**डानिसी, सुभेदारी, होळकरी, गायकवाडी, पटवर्धनी,** इ०.

**इक**—— 'तत्संबंधी,' 'तद्विषयक,' अशा अर्थी हा प्रत्यय कित्येक संस्कृत शब्दां वरून होतो, परंतु त्या शब्दाच्या पहिल्या अक्षराच्या अंत्य वर्णास वृद्धि होत्ये; जसें—**मायिक, व्यावहारिक, प्रापंचिक, ऐहिक, आमुष्मिक** इ०.

**इत**—— 'तेणेंकरून जें युक्त,' अथवा 'तें ज्यास आहे,' अशा अर्थी हा प्रत्यय संस्कृत शब्दां वरून होतो; जसें—**आनंदित, हर्षित, संतोषित, दुःखित, मोहित,** इ०.

**इष्ट**—— 'तें ज्यास आहे,' अशा अर्थी कित्येक संस्कृत शब्दां वरून हा प्रत्यय होतो; जसें—**कोपिष्ट, रागिष्ट, व्याधिष्ट, त्रलिष्ट** इ०.

**ईय**—— संस्कृत धातुसाधित नामां वरून योग्यार्थी हा प्रत्यय होतो; जसें—**दर्शनीय, प्रेषणीय, रक्षणीय, भक्षणीय, रमणीय** इ०

हा मूळचा संस्कृतांतील भविष्यकालवाचक आणि कर्त्रर्थवाचक **अनीयर्** प्रत्यय जाणावा. या खेरीज आणखी 'तत्संबंधी' अशा अर्थी प्रत्यय लागून जीं रूपें होतात, तीं मूळचीं संस्कृतांत छप्रत्ययान्त जाणावीं; तींहि अशींच असतात; जसें—**महेंद्रीय, वत्सीय, पर्वतीय, स्वकीय, राजकीय,** इ०.

**ईल**—— शब्दयोगी अव्ययां वरून 'तत्प्रदेशसंबंधी' या अर्थी हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात; जसें—**वरील, पुढील,**

मागील, तेथलि, एथील,समोरील, इ०.

क—— 'तें करितो तो' अशा अर्थी संस्कृत शब्दां वरून हा प्रत्यय होतो; जसें–गुणक, बाधक, रोचक, मोहक, इ०.

कट—— 'तेणें करून युक्त,' त्याचा अंश अ० संसर्ग ज्यास आहे,' अशा अर्थी, व कोठें 'इषदर्थी, व कुत्सितार्थी,' व कोठें 'स्वार्थी,' हा प्रत्यय लागून शब्द साधतात; जसें–बळकट, तेलकट, चिकट, रांकट, धांकट, फलकट, पोरकट, फुसकट,इ०.

कर—— 'तें करितो तो,' या अर्थी हा प्रत्यय होतो; जसें–सुखकर, दुःखकर, हितकर, प्रभाकर, खोडकर, विणकर, इ०. 'त्या त्या गांवचा राहणारा' अशा अर्थी ग्रामवाचक नामां वरून हा प्रत्यय होतो; जसें–काशीकर, पुणेकर, बडोदेकर, मुंबईकर, पैठणकर, पंढरपूरकर, इ०.

करी—— 'तो तो व्यापार अ० धंदा करणारा,' अथवा 'त्या त्या स्थळीं राहणारा,' अशा अर्थी कित्येक शब्दां वरून, व कोठें मूळ शब्दास कांहीं विकार करून, हा प्रत्यय होतो; जसें–शेतकरी, गांवकरी, मोलकरी, यात्रेकरी, कथेकरी, मारेकरी, भाडेकरी, साठेकरी, गांवढेकरी, इ०. कोठें 'तें ज्यास आहे' अशा अर्थी, हा प्रत्यय लागतो; जसें–मानकरी, पैकेकरी इ०

अकारान्तां शिवाय इतर शब्दां पुढें हा प्रत्यय होत असतां अंत्यस्वरास ए आदेश होतो.

**की**—— कित्येक शब्दां वरून 'भाव' अथवा 'धंदा', या अर्थी हा प्रत्यय होतो; जसें— **पाटिलकी, सोनारकी, म्हारकी**, इ०.

**खोर**—— 'ती ती खोडी अ० व्यसन ज्यास आहे,' अशा अर्थी त्या त्या शब्दां वरून हा प्रत्यय होतो; जसें—**दारूखोर, भांडखोर, कज्जाखोर, छंदखोर**, इ०.

हा मूळचा फारशी **खुर्दन** ( खाणें ) या धातू वरून व्युत्पन्न झालेला प्रत्यय होय; याचा अर्थ **खाणारा**.

**गर, गीर,**— 'तें तें धरणारा, अथवा धरून त्याचा धंदा, पेशा, चालविणारा,' अशा अर्थी त्या त्या मूळ शब्दां वरून हे प्रत्यय होऊन साधित शब्द होतात; जसें—**सौदागर, जीनगर, शिकलगार; तमासगीर, आबदागीर, तगादगीर**, इ०.

हीं मूळचीं फारशी **गिरिफ्तन** धरणें या धातू पासून **गर-गीर** धरणारा अशा अर्थी धातुसाधितें जाणावीं.

**गिरी**— कित्येक शब्दां वरून भावार्थी हा प्रत्यय होतो; जसें—**गुलामगिरी, लुच्चेगिरी, सोदेगिरी**, इ०.

हा प्रत्यय वर सांगितल्या **गर, गीर**, या प्रत्ययांच्या अपभ्रंशानें झाला असावा.

**चा-ची-चें**— शब्दयोगी अव्ययां वरून, आणि स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषण अव्ययां वरून, हे प्रत्यय 'तत्प्रदेशसंबं-

धी,' अथवा 'तत्कालभूत,'' अशा अर्थी लिंगवचनपरत्वें होतात; जसें– **वरचा, खालचा, तेथचा, एथचा, परवांचें, आजची, कालच्या, उद्यांचें,** इ०.

आतां एथें अंगांगीभावसंबंध नसतां कित्येक नामांवरून हे प्रत्यय होऊन जीं रूपें साधतात, तींहि याच प्रमाणें विशेषणें होतात; जसें–**हातचा, पदरचे, मूळची, पोटचे, दोन वर्षांचा, पांच हातांचा** इ०. परंतु या प्रकारचीं विशेषणें आणि षष्ठयन्त नामें यांचा भेद कोठें कोठें अर्थावरून जाणावा लागतो.

आणखी जेथें षष्ठी विभक्ति होऊन तिज वरून इतर विभक्तिप्रत्यय होतात, तेथेंहि ते षष्ठ्यन्त शब्द शब्दसाधितें मानावीं; जसें– **त्याच्यापासून, तुमच्यांत,** '**घरच्यांनीं** उपाशीं मरावें आणि **दारच्यांनीं** मौजा माराव्या,' इ० स्थळीं, **त्याचा, तुमचे, घरचीं, दारचीं,** हीं शब्दसाधितें जाणावीं.

परंतु एथें शिकणारांनीं एक गोष्ट पक्केपणीं लक्षांत ठेवावी कीं सर्वनामां वरून जेथें स्वार्थी अशीं रूपें होतात, तेथें त्यांस शब्दसाधितें मानूं नये.—**माझ्याहून, तुझ्याशीं, त्याच्यांत,** इ० रूपें जेव्हां **मजहून, तुझ्याशीं, त्यांत,** अशा अर्थी असतात, तेव्हां हीं त्या त्या सर्वनामांचीं त्या त्या विभक्तीचीं रूपें मानावीं. परंतु जेथें **माझ्याहून, तुझ्याशीं, त्यांच्यांत,** यां पासून 'मदीय जो कोणी त्याहून,' 'त्वदीय जो कोणी त्याशीं,' 'तदीय जे कोणी त्यांच्या ठायीं,' अशा अर्थाची उपलब्धि असत्ये, तेव्हां त्यांस शब्दसाधितें मानून त्यां वरून ती ती विभक्ति मानावी.

**ट**—— **कित्येक प्राकृत शब्दां वरून ईषदर्थी ह्य० किंचिदर्थी हा प्रत्यय होऊन**

विशेषणें होतात; परंतु हा प्रत्यय होत असतां अंत्य स्वरास अआदेश होतो; जसें—पिवळट, हिरवट, कडवट, खारट, मळकट, इ०.

डा—— धंदा अथवा व्यवहार करणारे जे त्यांचे वाचक जे शब्द त्यांतून कित्येका वरून कुत्सितार्थी हा प्रत्यय होतो; जसें—ह्मारडा, न्हावडा, सुतारडा, कांसारडा, सोनारडा, परभुडा, इ०.

भट आणि शिंपी यांचे कुत्सितार्थी भटोरा, भटुरडा, शिंपुरडा, असे शब्द आढळतात.

त्व—— संस्कृत शब्दां वरून भावार्थी हा प्रत्यय होतो; जसें—ब्राह्मणत्व, गुरुत्व, लघुत्व, द्विजत्व, मनुष्यत्व, इ०.

ता—— पूर्वोक्त अर्थी संस्कृत शब्दां वरून हाहि प्रत्यय होतो;जसें—विद्वत्ता,लघुता, मधुरता,आम्लता,कटुता,विषमता, इ०.

दां—— 'अमुक वेळां,' असा अर्थ विवक्षित असतां तत्तत्संख्यावाचकां वरून हा प्रत्यय होतो; जसें—एकदां, दोनदां, पांचदां, शंभरदां, इ०.

दार—— 'तें राखतो अ० बाळगतो तो,' या अर्थी कित्येक प्राकृत व फारशी शब्दांस अकारान्त व कोठें एकारान्त करून त्यां वरून हा प्रत्यय होतो; जसें—चोपदार, भालदार, पोतदार, दुकानदार,हवालदार,सुभेदार, मामलेदार,इ०.

. हा मूळचा **दाश्तन्** ( धरणें ) या फारशी धातू वरून व्युत्पन्न झालेला प्रत्यय होय; याचा अर्थ **धरणारा.**

**नीस-नवीस**- 'तें लिहिणारा,' अथवा 'तो अधिकार चालविणारा,' या अर्थी कित्येक शब्दां वरून हा प्रत्यय होतो; जसें- **चिटनीस** अ० **चिटनवीस, फडनीस** अ० **फडनवीस, पोतनीस,** अ० **पोतनवीस, दफ्तरनीस** अ० **दफतरनवीस,** इ०.

हा मूळचा **निविश्तन्** ( लिहिणें ) या फारशी धातू वरून व्युत्पन्न झालेला प्रत्यय होय; याचा अर्थ **लिहिणारा.**

**पट**----- संख्यावाचकां वरून गुणितत्वार्थी हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात; जसें-**एकपट, दुप्पट, तिप्पट, चौपट** इ० (पहा पृ० १९२, नि० ३७० )

**पड**----- 'त्याच्या विरुद्ध, अ० त्याच्या उलट' अशा अर्थी, अथवा गौणत्वार्थी, अथवा द्वितीयाविभक्त्यर्थी, संस्कृत पर, प्रति, याचा अपभ्रंश होऊन झालेला हा उपसर्ग कित्येक शब्दारंभीं जोडल्यानें शब्द साधतात; जसें-**पडशाळा** अ० **पडसाळ, पडजीभ, पडपापणी, पडचाकर, पडगहाण, पडदोरा, पडसाक्ष, पडताळा, पडपेंठ, पडभोजन, पडसाद, पडछाया, पडशब्द, पडनाद,** इ०.

**पण, पणा**---भावार्थी सर्व प्राकृत शब्दां वरून हा प्रत्यय होतो; जसें- **बरेपण**-**णा**

**वाइटपण-णा, खरेपण-णा, माणुसपण-णा, बायकोपण-णा,** इ०.

**पर**—— 'दुसऱ्याचें,' 'पारकें,' अशा अर्थी हा शब्द नामारंभीं जोडितात; जसें—**परघर, परदेश, परगांव, परपेठ,** इ०.

**पोट**—— 'आंतील,' या अर्थी हा शब्द उपसर्गा सारखा कित्येक शब्दारंभीं जोडितात; जसें—**पोटघर, पोटभेद, पोटजमा, पोटजामीन, पोटबेरीज, पोटरकम, पोटभाग, पोटहिसा,** इ०.

कोणी **पोट** म्हणजे त्याचा त्याचा आंतील भाग असा अर्थ करून त्याचा पुढील शब्दाशीं षष्ठीतत्पुरुष समास करून विग्रह केला, तरी प्रशस्त, असें मला वाटतें.

**बाज**—— 'त्याचें ज्यास लक्षण आहे, अ० त्याचें ज्यास व्यसन आहे,' अशा अर्थी त्या त्या कित्येक निवळ मराठी व फारशी शब्दां पुढें हा प्रत्यय लागतो; जसें—**अकडबाज कुर्रेबाज, इष्कबाज, नखरेबाज, दगलबाज, दारूबाज,** इ०.

हें मूळचें **बाख्तन** ( खेळणें ) या फारशी धातूचें धातुसाधित होय; याचा अर्थ खेळणारा.

**भर**—— कालवाचक व परिमाणवाचक शब्दावरून 'तो अवधि व्यापून असलेला,' अथवा, 'त्या त्या परिमाणा पर्यंत,' अशा अर्थी हा प्रत्यय होऊन विशेषणें आणि क्रियाविशेषणें साधतात; जसें—**क्षणभर, घडीभर, प्रहरभर, दिवसभर, वर्ष-**

भर, पसाभर, शेरभर, मणभर, खंडीभर, पल्लाभर, रतिभर, तोळाभर; कोसभर, बिघाभर, हाकभर, गुढगाभर, कमरभर; इ०.

यांत परिमाणवाचकां वरून विशेषणें आणि क्रियाविशेषणें, आणि कालवाचकां वरून केवळ क्रियाविशेषणेंच होतात.

**मत-मान्**- 'तें ज्यास आहे,' या अर्थी संस्कृत शब्दां वरून त्या भाषेच्या नियमा प्रमाणें हे प्रत्यय होऊन विशेषणें होतात; यांत **मान्** हा शुद्ध संस्कृत प्रत्यय आणि त्याचाच प्राकृत मंत; जसें—श्रीमंत, बुद्धिमंत, श्रीमान्, बुद्धिमान्, इ०. संस्कृतांत स्त्रीलिंगीं **मती** हा प्रत्यय होतो; जसें—**बुद्धिमती, श्रीमती**, इ०. परंतु प्राकृतांत बहुधा बुद्धिमान् स्त्री असेंच ह्मणतात.

**या**— 'तें ज्यास आहे,' असा अर्थ असून कुत्सितार्थाची विवक्षा असतां, अथवा 'तो नाद अ० व्यसन ज्यास आहे,' अ० तशा सारखा, अ० त्या त्या पदार्थाचा धंदा, काम, करणारा, अशा अर्थाची विवक्षा असतां, कित्येक नामा वरून पुलिंगीं अंत्यस्वराच्या स्थानीं हा प्रत्यय होतो; जसें—**दम्या, खोकल्या, धाप्या, बायक्या, चौघड्या, सारंग्या, तबल्या, गवत्या, अडत्या**, इ०.

**भांग्या** याच्या इतर लिंगांचीं रूपें आकारान्त विशेषणाच्या रूपा प्रमाणें ईकारान्त आणि एंकारान्त होतात; जसें—

**भांग्या, भांगी, भांगें** याच प्रमाणें—**धां-दल्या, धांदली, धांदलें,** इ० आणखी शब्द जाणावे.

**रा**—— लाज, खाज, इ० कित्येक शब्दां वरून 'तें ज्यास अतिशय आहे,' अशा अर्थी हा प्रत्यय होऊन साधित नामें आणि विशेषणें होतात; जसें—**लाजरा, खाजरा, शिवरा,** इ०.

**ला**—— स्थलवाचक क्रियाविशेषण अव्ययें व शब्दयोगी अव्ययें यां वरून 'तत्प्रदेश-संबंधी,' या अर्थी लिंगवचनपरत्वें हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात; परंतु अंत्य-स्वरास **अ** आदेश होतो; जसें—**तेथला, एथला, जेथला, वरली, खालली, पुढले, मागले,** इ०.

**वट**—— 'तत्संबंधी' या अर्थी, अथवा 'ईषदर्थी' कित्येक शब्दां वरून हा प्रत्यय होतो; जसें—**रानवट, भोळवट, कडवट,** इ०.

**वत्**—— 'त्या सारखें,' असा अर्थ विवक्षित असतां प्रौढ भाषणांत संस्कृत शब्दां व-रून हा प्रत्यय होऊन अविभक्तिक वि-शेषणें होतात; जसें—**शूद्रवत्, स्वप्नवत्, सर्पवत्, पशूवत्, विषवत्,** इ०.

**वंत-वान्**— अकारान्त संस्कृत शब्दां शिवाय इ-तर संस्कृत शब्दां पुढें **मंत** आणि **मान्** प्रत्यय लागत असतां **म**च्या स्थानीं **व** आदेश होतो, असा बहुधा नियम आहे;

जसें—यशवंत, जयवंत, द्रव्यवान्, धर्मवान्, इ०. स्त्रीलिंगीं संस्कृतांत वती हा प्रत्यय होतो; जसें—पुत्रवती, सौभाग्यवती, इ०. यांत वान् हा संस्कृत आणि वंत हा प्राकृत प्रत्यय जाणावा.

वार—— फारशी शब्दां वरून 'तें ज्यांत आहे,' अ० 'तद्युक्त,' अशा अर्थीं हा प्रत्यय होऊन विशेषणें व क्रियाविशेषणें होतात; जसें—सरफेवार, किफायतवार, बयादवार, तपसीलवार, इ०.

वाणा—— स्वार्थीं, सादृश्यार्थीं, 'तें ज्याला आहे,' या अर्थीं आणि कोठें 'ईषदर्थीं,' कित्येक शब्दां वरून हा प्रत्यय होतो; तेंव्हां लाजरा इ० कित्येक शब्दांच्या उपांत्यास ई आदेश होतो; जसें—गरीबवाणा, बापुडवाणा, दीनवाणा, दैन्यवाणा, लाजिरवाणा, गोजिरवाणा, इ०.

वाला—— 'तें ज्यास आहे,' अथवा 'त्याचा धनी,' अथवा 'त्याचा जो धंदा करितो,' अशा अर्थीं हा प्रत्यय होऊन शब्दसाधित नामें होतात; जसें—दुकानवाला, घरवाला, लेंकुरवाला, आंबेवाला, तेलवाला, भाजीवाला, दूधवाली, पैकेवाले, इ०.

सर—— कित्येक शब्दांस अकारान्त करून त्यां वरून ईषदर्थीं हा प्रत्यय होतो; जसें—काळसर, लालसर, भोळसर, वेडसर, इ०.

सा—— बहुधा सर्व विशेषणां वरून अथवा नामां

वरून ईषदर्थी व समानार्थी हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात; जसें—**लहानसा, पिवळीशी, काळेंसें, ब्राह्मणसा, थोडेंसें** इ०.

**सा** हा प्रत्यय **असा** याचें संक्षिप्त रूप होय; हा प्रत्यय विशेष्याच्या लिंगवचनानुरूप होतो; आणि हें संक्षिप्त रूप मूळ शब्दा प्रमाणें सर्व शब्दां पुढें यथेच्छ योजितात; जसें—**केलेसें गेलीसी, भरेसें, जावीशी,** इ०.

**स्थ**—— 'त्या त्या स्थळीं अथवा प्रदेशीं राहणारा,' अशा अर्थी त्या त्या प्रदेशवाचक शब्दा पुढें हें संस्कृत धातुसाधित जोडल्यानें ते ते शब्द सिद्ध होतात; जसें—**कोंकणस्थ, देशस्थ ग्रामस्थ, मध्यस्थ, मार्गस्थ, आकाशस्थ, जलस्थ, हृदयस्थ, उदरस्थ, गर्भस्थ,**इ०.

५९० मराठींत कित्येक शब्दांशीं कित्येक शब्दांचा सामासिक योग होत असतां त्यांत उत्तर शब्दांच्या स्थानीं तत्तदर्थवाचक कांहीं अनुकल्पित शब्द अथवा आदेश होऊन एक जातीचे साधित शब्द सिद्ध होतात; ते असे—

**पाणी** या शब्दाच्या स्थानीं 'त्याचें जें पाणी' या अर्थी कित्येक मराठी शब्दां वरून **वणी** हा आदेश होऊन शब्दसाधितें सिद्ध होतात; जसें—**चिंचवणी, सोलवणी, ताकवणी, दुधवणी, गुळवणी ,अकळवणी, कळसवणी,** इ०.

**तेल** या शब्दाच्या स्थानीं 'त्याचें जें तेल,' या अर्थी ज्या पदार्थांतून तेल निघतें त्या पदार्थांचा वाचक अ-

शा मराठी शब्दां वरून (अंत्यस्वराच्या स्थानीं)**एल** हा आदेश अ० प्रत्यय होऊन कित्येक शब्दसाधितें सिद्ध होतात; जसें–**धुपेल, तिळेल, खोबरेल एरंडेल, मोगरेल, उंडेल, बिबेल,** इ०.

**घाण** या शब्दाच्या स्थानीं 'त्याची जी घाण' या अर्थीं कित्येक शब्दां वरून (अंत्यस्वराच्या स्थानीं) **आण** व कोठें कोठें याच्या स्थानीं **टाण,** हे आदेश होऊन शब्दसाधितें सिद्ध होतात; जसें–**आंबटाण. करपटाण, कुजटाण, तेलटाण, आंबष्टाण, तेलष्टाण,** इ०.

**वेळ** याच्या स्थानीं **ओळ** हा अनुकल्पित प्रत्यय होऊन, **केवढा, एवढा, तेवढा, वाढता,** इ० कित्येक शब्दां पुढें तो जोडत असतां यांच्या स्थानीं **केढ, एढ, तेढ, वाढ,** असे आदेश होऊन देशीं ग्राम्य शब्द साधतात; जसें–**केढोळ, एढोळ, तेढोळ, वाढोळ,** इ०.

५९१ या शिवाय आणखी थोडेबहुत एकदेशीय असे अनेक प्रकारचे प्रत्यय होऊन परोपरीचे शब्द सिद्ध होतात; जसें–**डोळस, कानपिशा, गांवठी, खोलगट, पाणचैट, धुपट, पाणवठा दिवठाण, खर्चिक** इ०.

५९२ कित्येक शब्दां वरून 'ती ती क्रिया करितो' अ० करणारा,' या अर्थीं धातुसाधित प्रत्यय होऊन एक जातीचीं साधित नामें होतात; जसें–**पोटभरू, भाडखाऊ, गरजकाढू, वाघमाऱ्या, भाजीविक्या, लांकूडतोड्या, कळलाव्या, मासरांध्या, धोतरबडव्या,** इ०.

**५९३ या शिवाय आणखी मराठींत शब्दसाधितांचा मोठा भरणा संस्कृत शब्दां वरून संस्कृत प्रत्यय अथवा शब्द लागून होतो. या विषयीं जर यथाक्रम सं-**

पूर्ण व्याख्यान करूं लागलों, तर बहुधा संस्कृत व्याकरणांतील सर्व तद्धितप्रकरण घेतलें पाहिजे; यास्तव संक्षेपरूपेंकरून जितके व्यवहारप्रसिद्ध संस्कृत शब्द या भाषेंत मिश्र झालेले आहेत, अथवा केव्हां केव्हां प्रत्यय अथवा शब्द लावून साधावे लागतात, त्यांतून मुख्य मुख्य अगत्याचे असे निवडून त्यांचेंच खालीं ग्रहण केलें आहे. 'तें ज्यास आहे,' 'तेणेंकरून युक्त,' अथवा 'तेणेंकरून पीडित,' इत्याद्यर्थी संस्कृत शब्दांशीं—अन्वित, आकुल, आक्रांत, आतुर, आपन्न, आवह, आविष्ट, ग्रस्त, शाली, इ० हे शब्द जोडून परोपरीचीं आणि अत्यंत उपयोगी अशीं शब्दसाधितें होतात; जसें—क्रोधान्वित, भयाकुल, तृषाक्रांत, कामातुर, दुःखापन्न, सुखावह, लोभाविष्ट, रोगग्रस्त, पापग्रस्त, भाग्यशाली, दैवशाली, पुण्यशाली, इ०.

गुण-गुणित— सर्व संस्कृत संख्यावाचकां वरून 'आवृत्त्यर्थी' हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात; जसें—द्विगुण-गुणित, त्रिगुण-गुणित, चतुर्गुण-गुणित, शतगुण-गुणित, इ०.

युक्त—— 'तेणेंकरून युक्त' अशा अर्थीं त्या त्या शब्दां पुढें हा शब्द लागून विशेषणें होतात; जसें—गुणयुक्त, भययुक्त, संशययुक्त, शर्करायुक्त, इ०.

रूप—— 'सादृश्यार्थी' अथवा 'स्वार्थी' कित्येक शब्दां पुढें हा शब्द लागून साधित विशेषणें होतात; जसें—दोषरूप, संकटरूप, भवरूप, ब्रह्मरूप, इ०.

अतिरिक्त-रहित-विरहित-व्यतिरिक्त-शून्य- हीन-

तत्तदर्थाची व्यावृत्ति अ० अभाव असा अर्थ असतां त्या त्या शब्दांशीं या शब्दांचा योग होऊन विशेषणें व क्रियाविशेषणें होतात; जसें—**ज्ञानातिरिक्त, विद्यारहित, धर्मविरहित, कर्मव्यतिरिक्त, ज्ञानशून्य, बुद्धिहीन, मतिहीन,** इ०.

**स–सहित**— त्या त्या अर्थाचें साहचर्य विवक्षित असतां, अथवा 'तेणेंकरून युक्त,' अथवा 'तें ज्यास आहे,' अशा अर्थाची विवक्षा असतां त्या त्या शब्दाच्या आरंभीं **स** या आगमाचा, अथवा त्याच्या शेवटीं **सहित** या शब्दाचा, योग होऊन विशेषणें अथवा क्रियाविशेषणें होतात; जसें—**सकुटुंब, सपरिवार, साश्रित, सदय, साकार, साकांक्ष, वस्त्रसहित, अलंकारसहित, व्याजसहित,** इ०.

९९४ आणखी संस्कृत शब्दां वरून भावार्थीं अंत्य स्वराच्या स्थानीं **य** प्रत्यय होऊन भाववाचकें होतात, तेव्हां त्या त्या शब्दांतील प्रथम स्वरास वृद्धि होत्ये; जसें—मधुर-**माधुर्य**, सुंदर-**सौंदर्य**, कुरूप-**कौरूप्य**, ईश्वर-**ऐश्वर्य**, शीत-**शैत्य**, उदार-**औदार्य**, कृपण-**कार्पण्य**, दृढ-**दार्ढ्य**, एक-**ऐक्य**, चोर-**चौर्य**, गौण-**गौण्य**; इ०.

आणखी संस्कृत शब्दां वरून 'तत्संबंधी,' 'त्याचें अपत्य अ० वंशज,' 'त्या पासून उत्पन्न झालेलें,' इत्याद्यनेकार्थीं ते ते प्रत्यय होऊन ते ते शब्द सिद्ध होतात; जसें—अश्वसंबंधि जें तें-**आश्व**, अरण्यसंबंधी जें तें-**आरण्य**, शरीर-**शारीर**, इंद्र-**ऐंद्र**, इंद्रिय-**ऐंद्रियक**,

विष्णु-**वैष्णव**, शिव-**शैव**, शूद्र-**शौद्र**, शुंडा-**शौंड**, गृह-पति-**गार्हपत्य**, केशिक-**कैशिक**, केदार, **कैदार**, गो-**गव्य** नौ-**नाव्य**; कयाधूचा पुत्र तो-**कायाधव**, कुरूचा जो पुत्र अ० वंशज तो-**कौरव**, मधु-**माधव**, गंगा-**गांगेय**, शांडिल **शांडिल्य**, दिति-**दैत्य**, तित्तिरि-**तैत्तिरीय**, विनता-**वैनतेय**, द्रुपद-**द्रौपदी**, पुत्र-**पौत्र**, उत्स-**औत्स**, भृगु-**भार्गव**, पृथा-**पार्थ**, पृथु-**पार्थव**, पृथिवी-**पार्थिव**, केकय-**कैकयी**, द्रोण-**द्रौणि**, व्यास-**वैयासिक**; व्याकरण-**वैयाकरण**, श्वापद-**शौवापद**; इ०.

या प्रमाणें शतावधि साधित नामें आणि विशेषणें संस्कृत व्याकरणाच्या नियमा प्रमाणें सिद्ध होतात, त्या सर्वांचा एथें विस्तार करवत नाहीं. तें सर्व यथास्थित समजायास त्या शास्त्राचें अध्ययन अपेक्षित आहे.

हे सविस्तर विषय ईश्वरेच्छेनें पुढें माझ्या भावी व्याकरणपूर्णकंत व शब्दार्थसाधनिकेंत येणार आहेत, असा मी भरंवसा धरितों, प्रसिद्ध झाल्यावर त्या ग्रंथांत जिज्ञासूनीं दृष्ट असल्यास पहावें.

---

## भाग ३.

### सामासिकशब्दविचार.

५९५ **सामासिक** शब्द ह्मणजे दोन किंवा अधिक शब्द एकत्र जुळून त्यांपासून झाला जो एक शब्द तो; जसें—**विटीदांडू**, **साखरभात**, **चांदणीचौक**, **महारवाडा**, **देवाज्ञा**, **चक्रपाणि**, इ०. आतां पहा कीं **विटीदांडू** एथें **विटी** आणि **दांडू** हे दोन शब्द मिळून **विटीदांडू** हा एक शब्द झाला आहे. या प्रमाणें दुसरीं उदाहरणें जाणावीं.

[अ] निवळ मराठी शब्दांचे असे समास घडत असतां, कोठें कोठें पूर्व शब्दांच्या अंत्य स्वरास अकारादि थोडा आदेशरूप विकार होऊन मग पुढला शब्द जोडण्यांत येतो; जसें—**तांबडमाती** ( तांबडी माती ), **घोडदवड** ( घोडे दवड ), **पोळपाट** ( पोळीपाट ), **घोडेराऊत** (घोडा राऊत), **प्यादेमात** ( प्यादा-दें मात), इ०.

१९६ या मध्यें परस्परांचा जो संबंधप्रकार त्यास **समास** ह्मणतात; जसें—**साखरभात** याचा मध्यमपदलोपी समास होय.

१९७ हा समास करून दाखिवण्याचा जो प्रकार त्यास **विग्रह** ह्मणतात; जसें—पूर्व उदाहरणांत- साखरयुक्त जो भात ' हा विग्रह, आणि मध्यमपदलोपी हा समास.

१९८ हे समास आठ आहेत—द्वंद्व, तत्पुरुष, **कर्मधारय, द्विगु, मध्यमपदलोपी, बहुव्रीहि, अव्ययीभाव**, आणि **नञ् समास**. यांचीं लक्षणें उदाहरणांत सुद्धां पृथक् पृथक् विभाग करून त्यांत दाखवितों.

मागल्या आवृत्तींत सातच मुख्य समास सांगितले होते; **नञ्** समासा विषयींचा निराळा विभाग करून दाखविला नव्हता, तो हा आठवा **नञ्** समास म्हणून एथें नव्या विभागा खालीं प्रविष्ट केला आहे.

---

## विभाग १.

### द्वंद्व.

१९९ दोन अथवा अधिक शब्दांचा संयोग होऊन मधल्या **आणि** या समुच्चयार्थक अव्ययाचा ज्यांत लोप होतो त्यास द्वंद्व समास ह्मणतात; जसें—**आईबाप** ह्मणजे 'आई आणि **बाप** तो,' **विटीदांडू** ह्मणजे '**विटी** आणि

**दांडू** तो;' याच प्रमाणें—**बहीणभाऊ, बापलेक, हात-पाय, मातापिता, ब्रह्माविष्णुमहेश, ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र**, इ० आणखी उदाहरणें.

६०० यांत कधीं **आईबापें, दादलाबायलें, बहिणभावंडें**, असाहि एक प्रकार थोड्या शब्दां विषयीं होतो, तेव्हां या सामासिक शब्दाचें नपुंसक लिंग आणि अनेकवचन असतें.

६०१ मराठी भाषेंत आणखी एक द्वंद्वाचा प्रकार होतो; तो असा कीं,—दोन शब्द जोडले असतां त्यांपासून तदंतर्गत आणखी तत्साधर्म्यवाचक अशा पुष्कळ शब्दांचा संग्रह होतो; यास **समाहारद्वंद्व** ह्मणतात; जसें—**हातपाय** ह्मटलें ह्मणजे केवळ **हात** आणि **पाय** या दोन अवयवांचेंच ग्रहण होतें असें नाहीं; परंतु यणेंकरून इतर अवयवांचाहि संग्रह होतो; उदाह०—'हातपाय सुखी असले तर सर्व सुख.' अशीं समाहारद्वंद्वघटित नामें या भाषेंत पुष्कळ आहेत, त्यांतून कांहीं सांगतों;—**भाजीपाला, कोळीमाळी, शेटसावकार, पानपत्रावळ, घरदार, देवब्राह्मण, शेतमळा, फंदाफितूर, दिवाणदरबार, मीठभाकर**, इ०.

अशा समाहारद्वंद्वघटित शब्दांचा अनेकवचनीं प्रयोग केला असतां सामान्यतः सर्वांचा, आणि एकवचनीं प्रयोग केला असतां त्यांतून सामान्यतः अनियमित कोणत्याहि एका व्यक्तीचा बोध होतो; उदाह०—

'आंधळ्यापांगळ्यांस धर्म केला असतां अधिक पुण्य लागतें,' ह्मणजे सर्व आंधळ्यापांगळ्यासारखे जे अंगहीन त्यांस, आणि 'या गावांत आंधळापांगळा, अथवा कोणी शेट सावकार, नाहीं,' ह्मणजे 'आंधळ्यापांगळ्या सा-

रखा कोणी अंगहीन, अथवा शेटसावकारां सारखा कोणी पैकेवाला, किंवा उदमी, नाहीं,' असा अर्थभेद जाणावा.

६०२ पूर्व शब्दाचा अनुकरणवाचक अथवा कोणता तरी एक प्रतिशब्द कल्पून त्यास त्या शब्दाशीं जोडिलें असतां आणखी एक प्रकारचा समाहारद्वंद्व होतो; जसें—**भाकरीबिकरी, धोंडागिंडा, दगडगिगड, वाईटसाईट, लहानसहान,** इ०.

[ अ ] यांत आणखी एक सामान्य नियम असा आहे कीं, कोणत्याहि शब्दाच्या आद्य अक्षराच्या स्थानीं **बि** किंवा क्वचित् **गि** आदेश करून जो अनुकरणवाचक शब्द होतो त्याचा त्या शब्दा पुढें योग केला असतांहि 'त्या सारखे आणखी,' 'इत्यादि,' 'वगैरे,' या अर्थी, व कोठें स्वार्थी, सामासिक शब्द होतात; जसें—**घोडाबिडा, घरबीर,*** **कागदबिगद, लेखणीबिखणी, तंटाबिंटा, दगडगिगड, धोंडागिंडा,** इ०. असे शब्द क्वचित् स्वार्थीहि होतात; जसें—**लेखणीबिखणी,** म्हणजे लेखणी हाच अर्थ.

६०३ कित्येक द्वंद्वसमासघटित शब्दां मध्यें शब्दांची पूर्वापर योजना नियमित असत्ये; जो बहुमानार्थी दुसऱ्या पेक्षां अधिक मान्य, म्हणून तद्वाचक शब्दाची योजना प्रथम करावी लागत्ये; जसें—**आईबाप** या द्वंद्वसमासघटित शब्दांत **आई** शब्दाची योजना पूर्वी, आणि **बाप** शब्दाची योजना मागून, असें बहुधा असतें; **बापआई** म्हणायाची फारशी रूढि नाहीं; तसेंच—**बहीणभाऊ, दादलाबायको, रामलक्ष्मण, ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र,** इ०.

---

*घरबीर एथें उपांत्यास जें दीर्घत्व झालें आहे त्याच विषयींचा नियम पुढें सांगण्यांत येईल.

## विभाग २.

### तत्पुरुष.

६०४ तत्पुरुष ह्मणजे उत्तर शब्द मुख्य असून पूर्व शब्दाशीं ज्याचा संबंध असतो, अथवा पूर्व शब्दाचा विभक्तिसंबंध उत्तर शब्दाशीं असून त्या विभक्तीचा ज्यांत लोप होतो तो; ह्मणूनच–द्वितीयातत्पुरुष, तृतीयातत्पुरुष, चतुर्थीतत्पुरुष, इ० द्वितीये पासून जितक्या विभक्ति तितके बहुधा या समासाचे प्रकार होतात.

[अ] जेथें द्वितीयेचा लोप होतो तेथें त्यास द्वितीयातत्पुरुष ह्मणतात; जसें–अंगचोर, ह्म० 'अंग चोरितो तो,' द्विजदंड,ह्मणजे 'द्विजास अ०द्विजा प्रत जो दंड तो;' तसेंच—विप्रताडण, आर्तविमोचन, परपीडा, इ०.

[आ] जेथें तृतीयेचा लोप होतो तेथें त्यास तृतीयातत्पुरुष ह्मणतात; जसें–तोंडपाठ, ह्मणजे तोंडानें जें पाठ ह्म० पाठ केलेलें, कृपावलोकन, ह्मणजे कृपेनें अथवा कृपेंकरून जें अवलोकन, तें; तसेंच—दयार्द्र, भक्तिवश्य, द्रव्यसाध्य, इ०.

[इ] जेथें चतुर्थीचा लोप होतो तेथें त्यास, चतुर्थीतत्पुरुष ह्मणतात; जसें—बाजारवाडा, ह्म० बाजारा करतां जो वाडा तो, पोळपाट (पोळी करतां पाट), जांवईआग्रह ( जांवया करतां आग्रह ); तसेंच—कृष्णार्पण, ह्म० कृष्णा कारणें जें अर्पण तें, यज्ञस्तंभ, पूजाद्रव्य, इ० आणखी उदाहरणें.

[ई] जेथें पंचमीचा लोप होतो तेथें त्यास पंचमीतत्पुरुष ह्मणतात; जसें—पापविमोचन, ह्मणजे 'पापापासून जें विमोचन तें,' तसेंच–स्वर्गपतन, भवतारण,इ०.

[उ] जेथें षष्ठीचा लोप होतो तेथें त्यास **षष्ठीतत्पुरुष** ह्मणतात; जसें—**केळफूल** ह्मणजे केळीचें जें फूल तें; तसेंच—**हातचाळा, पिंपळपान, राजदरबार,** देवपूजा, इ०.

[ऊ] जेथें सप्तमीचा लोप होतो तेथें त्यास **सप्तमीतत्पुरुष** ह्मणतात; जसें—**स्वर्गवास,** ह्मणजे 'स्वर्गात अथवा स्वर्गाच्या ठायीं जो वास तो,' तसेंच—**गृहप्रवेश, कर्मकुशल, शास्त्रनिपुण, शिल्पपाटव,** इ०.

[ऋ] मराठींत आणखी एक तत्पुरुषसमासघटित शब्दांचा मोठा भरणा आहे, तो असा कीं, ज्यांत पूर्व शब्द पुढल्या धातुसाधिताशीं कर्मकरणसंप्रदानादिकारकसंबंधानें संयुक्त असतो; जसें—**आगलाव्या,** ह्मणजे 'आगीतें लावणारा,' यांत आग हें पुढल्या **लाव्या** या धातुसाधिताचें कर्म होय; **घृतपक्क,** ह्मणजे घृतानें जें पक्क तें,' यांत **घृत** हें **पक्क** या धातुसाधिताचें करण होय, याच प्रमाणें—**कंबरमोड्या, पायमळया, मानमोड्या, भाजीविक्या, मासखाऊ,** व्याजखाऊ, इ०.

६०९ प्रौढ भाषणांत अथवा लेखनांत जेव्हां सर्वनामांशीं इतर संस्कृत शब्दांचा समास करण्याचा प्रसंग येतो, तेव्हां तीं सर्वनामें संस्कृत योजावीं लागतात, नंतर तीं संधीच्या नियमां प्रमाणें पुढल्या शब्दांशीं जुळतात. हें खालीं दाखवितों—

| मराठी स०. | संस्कृत स०. | उदाहरणें. |
|---|---|---|
| मीं | मत् | **मत्कार्य, मदुद्धरण, मज्जन्म, मट्टीका, मत्तात, मन्मन, मच्छास्त्र,** इ०. |
| तूं | त्वत् | **त्वत्सौंदर्य, त्वच्छील, त्वद्गुण,** इ०. |

| | | |
|---|---|---|
| तो, ती, तें / ते, त्या, तीं | .तत्.... | तच्चरित्र, तद्गौरव, तच्छाखा, तद्रूप, इ० |
| आह्मीं........ | अस्मत्.... | अस्मद्भाग्य, अस्मदपराध, अस्मच्छक्ति, इ०. |
| तुह्मीं........ | युष्मत्........ | युष्मत्कीर्ति, युष्मदौदार्य, युष्मन्नाम, इ०. |
| हा, ही, हें, / हे, या, हीं | ....एतत् | एतद्देशीय, एतन्मात्र, एतच्छाखीय, इ०. |

**आपलें** या सर्वनामाच्या ठिकाणीं **स्व**, **निज**, हीं संस्कृत सर्वनामें येऊन मग त्यांशीं इतर शब्दाचा समास होतो जसें—**स्वजाति**, **स्वदेश**, **स्वधर्म**, **स्वकर्म**, **स्वहस्त**, **स्वगोत्र**, **स्वभाषा**, **स्वस्थान**, इ०.

कोठें **आपलें**, अथवा **स्वाचें**, **स्वाचें खास**, अशा अर्थीं **निज** हें सर्वनाम बहुधा ग्रंथभाषेंत येतें; जसें—**निजकार्य**, **निजगूज**, **निजधाम**, **निजतनू**, **निजमाता**, **निजधन**, इ०. आणि कोठें **आपलें** या सर्वनामाचा अंश **आप** राहून याशीं इतर शब्दाचा समास घडतो; जसें—**आपस्वार्थ**, **आपसुख**, **आपबुद्धि**, **आपमतलब**, इ०.

६०९ संस्कृत नियमा प्रमाणें नामास **इन** प्रत्यय लागून जे ईकारान्त शब्द होतात, त्यांशीं इतर शब्दांचा संयोग होऊन जर विग्रह होत असला, तर संस्कृत भाषेच्या नियमा प्रमाणें त्या ईकारास ऱ्हस्व होतें; जसें—**हस्तिदंत**, **प्राणिमत्सर**, इ०, एथें मूळचे **हस्ती** आणि **प्राणी** असे शब्द होत.

# विभाग ३.

## कर्मधारय.

६०७ **कर्मधारय** ह्मणजे वक्त्याच्या मनांत उभय शब्दांचा भाव ज्यांत समान असतो, किंवा उभय शब्दांचा परस्पर उपमानोपमेयभावसंबंध ज्यांत असतो, असा जो समास तो होय; अथवा, विशेष्यविशेषणांचें सान्निध्य असून त्यांचा जो समास घडतो तो होय; जसें—**भक्तिमार्ग**, याचा विग्रह 'भक्ति तोच मार्ग,' किंवा 'भक्तिरूप जो मार्ग तो;' तसेंच—**काळपुरुष, ब्रह्मराक्षस, भवसागर, संसाराटवी, नीलोत्पल**, इ० संस्कृत, आणि—**तांबडमाती, काळमांजर, भोंगळभट, पोकळखर्च**, इ० निवळ मराठी उदाहरणें.

६०७ शरीरादिसंबंधवाचक शब्द कर्मधारयसमासघटित शब्दांत विशेषणरूप उपपद होत असतां जे त्यांस विकार होतात ते उदाहरणांत सुद्धां खालीं दाखवितों.

| **शब्द.** | **विकार.** | **उदाहरणें.** |
|---|---|---|
| चुलता | चुलत | **चुलतभाऊ, चुलतबहीण, चुलतसासू, चुलतचुलता.** |
| मामा | मामे— | **मामेभाऊ, मामेबहीण, मामेसासू, मामेसासरा.** |
| मावशी | माऊस— | **माऊसभाऊ, माऊसबहीण. माऊससासू, माऊससासरा.** |
| आत | आते | **आतेभाऊ, आतेबहीण, आतेसासू, आतेसासरा, आतेगौरव, आतेचीर.** |
| आजा, आजी | आजे— | **आजेसासरा, आजेसासू, आजेचीर, आजेगुरु.** |

| | | |
|---|---|---|
| नातू, नात | नात— | नातजांवई, नातसून. |
| पणतू, पणती | पणत- | पणतसासरा, पणतसासु, पणतसून, पणतजांवई इ०. |
| भाचा, भाची | भाचे अ० } | भाचेजांवई, भाचेसून, अ० |
| | भाच } | भाचजांवई, भाचसून. |

## विभाग ४.

### द्विगु.

६०९ संख्यावाचक पूर्वपद असतां पूर्वोत्तर पदांचा जेथें समास होतो, आणि हा समास बहुधा समाहारार्थी असतो त्यास **द्विगु** समास ह्मणतात; जसें—**पंचपाळें,** ह्मणजे पांचा पाळ्यांचा समूह, **पंचारती, पंचखाजें, तीनताळ, तीनवार, चारखाणी, चारअक्षरें, चारखंड, पांचशेर-री, पांचपावली, बारभाई, अठराबाबू, अठराटोपी, अठरापगडी, चतुर्युग, अष्टाध्यायी,** इ०.

## विभाग ५.

### मध्यमपदलोपी.

६१० **मध्यमपदलोपी** ह्मणजे दोन शब्दांच्या मध्ये त्यांचा अन्वय दाखविणाऱ्या पदांचा ज्यांत लोप होऊन त्यांचा समास होतो त्यास ह्मणतात; जसें—**साखरभात** ( याचा विग्रह पूर्वी करून दाखविला आहे. ) तसेंच—**कर्वेतकीस, लांकूडकाम, कातरविडा, घरजांवई,** इ०.

सामासिक नामांत दोन किंवा अधिक शब्दांचा विग्रह करण्यांत, ह्मणजे त्यांचा यथार्थ अन्वय लावण्यांत, शब्दांतरांची व समर्थी वाक्याची अपेक्षा असल्ये, म्हणोन या समासाची इतर

समासा पेक्षां अधिक व्याप्ति असल्यास नवल मानूं नये. पहा- **गर्भश्रीमंत**, व **बाळमित्र**, यांतून पहिल्याचा पंचमी अथवा सप्तमीतत्पुरुष समास केला, आणि दुसऱ्याचा षष्ठी तत्पुरुष केला, म्हणजे 'गर्भी पासून, अ० गर्भांत जोश्रीमंत तो,' बाळाचा जो मित्र तो,' असा विग्रह केला, तरीं अर्थ बसतो; परंतु त्यांत मनाचें चांगलें समाधान होत नाहीं; तर **गर्भश्रीमंत** म्हणजे 'गर्भसंभवल्यापासून जन्मल्यावर बहुत दिवस पर्यंत जो श्रीमंत राहिला तो,' आणि **बाळमित्र** म्हणजे 'बाळपणापासून जो मित्र तो,' असे विग्रह करून मध्यमपदलोपी समास केल्यानें चांगलें समाधान होतें.

---

## विभाग ६.

### बहुव्रीहि.

६११ जेणेंकरून दोन शब्दांचा संयोग असतां त्यांवरून तिसऱ्या पदार्थाची उपलब्धि होत्ये, त्यास **बहुव्रीहि** समास ह्मणतात; जसें–**चक्रपाणि**, याचा विग्रह––'**चक्र** आहे पाणीच्या ठायीं ह्मणजे हातांत ज्याच्या तो'–विष्णु; याच प्रमाणें–**शशिशेखर**, ह्मणजे **शशी** ह्म० चंद्र आहे शेखरीं ह्म० मुकुटीं ज्याच्या तो–शिव. **चतुर्भुज**, **मृगनयना**, इ०. हे बहुव्रीहिसमासघटित शब्द बहुधा विशेषणें असतात.

कोणी **एकडोळ्या**, **बावरओठ्या**, **उंचमान्या**, **घोडतोंड्या**, इत्यादि शब्दांचा–'एक आहे डोळा ज्याचा तो' एकडोळ्या, असा विग्रह करून यांस बहुव्रीहिसमासघटित शब्द मानितात; परंतु मला हें प्रशस्त दिसत नाहीं; कारण, या बहुव्रीहि समासाचें जें लक्षण कीं–दोन शब्दांचा संयोग असतां ज्या वरून तिसऱ्या पदार्थाची उपलब्धि होत्ये, त्याची पूर्णपर्याप्ति होत नाहीं. हीं केवळ शब्दसाधितें होत; **एकडोळा**

ज्यास आहे तो **एकडोळ्या, घोडतोंड,** ज्यास आहे तो **घोडतोंड्या,** इ०. पहा नि० ५८९, पृ० ३०८. **या**–

६१२ जर उत्तरपद आकारान्त स्त्रीलिंग आहे, आणि त्याचा पूर्वपदाशीं बहुव्रीहि समास होऊन तें सारें पद पुल्लिंग शब्दाचें विशेषण होतें, तर संस्कृत नियमाप्रमाणें तें आकारान्त पद अकारान्त होतें; जसें–**लक्ष्मीभार्य, गौरीकांत,** इ०.

एथें 'लक्ष्मी आहे भार्या ज्याची तो' **लक्ष्मीभार्य,** 'गौरी आहे कांता ज्याची तो' **गौरीकांत,** असा विग्रह जाणावा.

---

## विभाग ७.

### अव्ययीभाव.

६१३ वर जे समास सांगितले त्यां शिवाय आणखी बहुतेक विद्वान् मराठी भाषेंत नामां पुढें शब्दयोगी अव्यय असतां त्याचा संस्कृता प्रमाणें अव्ययीभाव समास मानितात; जसें–**झाडावर,** झाडाच्या **वर–झाडावर** असा **वर** या शब्दयोगी अव्ययाचा झाडाशीं समास करून **झाडावर** एथें अव्ययीभाव मानितात. परंतु माझ्या विचारास हें अगदीं ठीक दिसत नाहीं. संस्कृता प्रमाणें मराठी भाषेंत हा समास अशा स्थळीं संभवत नाहीं. संस्कृतांत उपसर्ग पूर्वीं येऊन त्याशीं ज्या शब्दाचा योग असतो, त्यास नपुंसकत्व होऊन अकारान्तास पुढें अम् होतो; आणि तें सर्व पद क्रियाविशेषण असतें; जसें–'स उपगंगं प्राप्तः,' ह्मणजे–तो गंगे जवळ आला,' यांत **उपगंगं** एथें संस्कृत वैयाकरण अव्ययीभाव समास मानितात हें योग्यच आहे; कांकीं प्रथम तर त्या भाषेंत उप हा उपसर्ग पहिला येऊन त्या-

चा 'गंगायाः समीपं-उपगंगं,' असा विग्रह होऊन तें सर्व विकृतरूप क्रियेचें विशेषण होतें. तेव्हां अशा ठिकाणीं त्यांस हा समास मानिल्या शिवाय गत्यंतर नाहीं. परंतु **गंगेजवळ** यांत कांहीं तसें विलक्षण रूप नाहीं, अथवा तशी अडचणाहि नाहीं, **गंगे** हें **जवळ** या शब्दयोगी अव्ययाच्या योगानें **गंगा**शब्दाचें सामान्यरूप झालें आहे; कारण, शब्दयोगी अव्यय आणि विकृत विशेष्य यांच्या योगानें नाम, सर्वनाम, आणि विशेषण, यांचें सामान्यरूप होत असतें, हा नियम मराठी भाषेंत सर्वव्यापक आहे. तेव्हां या नियमास न अनुसरितां जर **गंगेजवळ, घरावर, वाड्यासमोर,** इ० पदांचा अव्ययीभाव समास मानला, तर या सर्व पदांस क्रियाविशेषण अव्ययें मानलींच पाहिजेत; कारण, हीं जीं अव्ययीभावसमासघटित पदें होतात त्यांस अव्ययें मानणें आवश्यक आहे, दुसरा निर्वाह नाहीं; तेव्हां **घरावर, गंगेजवळ, परमदेदिप्यमानविमानारूढदेवांसह,** या सर्व पदांस अव्ययें मानणें हा मला केवळ अप्रशस्त मार्ग दिसतो. ज्यांस असें दिसत नसेल ते यांस अव्ययें भले मानोत.

६१४ परंतु मराठी मध्यें **दर, हर, प्रति,** इ० कित्येक उपसर्गांचा नामांशीं अनुयोग असतां तन्निमित्त त्या नामांस अव्ययत्व प्राप्त होऊन जर तें सारें पद अव्ययरूप होत असलें, तर तेथें **अव्ययीभाव** समास मानिला असतां संभावनीय होय; जसें—**दरमजल, दरदिवस, हरघडी, हरवक्त, प्रतिदिवस, प्रतिरात्र, प्रतिवर्ष,** इ०. उदाह०.—'सरकार शिपायांस **दरमजल,** अ० **दरदिवस** दोन आणे भातें देतें,' इत्यादि वाक्यांत—**दरमजल,**

दरदिवस, इ० शब्दांत अव्ययीभाव समासाची उपलब्धि होऊन तीं सारीं क्रियाविशेषण अव्ययें होतात; ह्मणोन अशा शब्दांत अव्ययीभाव मानावा असें माझें मत आहे.

---

## विभाग ८.

### नञ् समास.

६१५ 'त्याचा अभाव,' 'त्यापासून भिन्न,' अथवा 'तद्भावविशिष्ट,' असा अर्थ विवक्षित असतां संस्कृत शब्दांच्या मागें अ या वर्णाचा योग होऊन जो एक प्रकारचा समास होतो, त्यास संस्कृतव्याकरणांत **नञ् समास** ह्मणतात. उदाह०—'नव्हे जो ब्राह्मण,' अथवा 'ब्राह्मणापासून जो भिन्न' तो—**अब्राह्मण**, 'ज्ञानाचा जो अभाव' तें **अज्ञान**, अथवा 'ज्ञानाभावविशिष्ट जो' तो—**अज्ञान**.

शब्दाचा प्रथम वर्ण जर स्वर असला, तर हा **अवर्ण** आणि पुढला शब्द यां मध्यें न् विकरण होतें; जसें—अ+ओळखी=**अनोळखी**, अ+आदर=**अनादर**, अ+ईश्वरवादी=**अनीश्वरवादी**, अ+उपपत्ति==**अनुपपत्ति**, अ+एक=**अनेक**, इ०.

या नियमाच्या अज्ञानानें असा प्रथम वर्ण स्वर नसतांहि कित्येक शब्दांत हें **न्** विकरण उगीच येऊन शब्द घडले असतात; जसें—**अनमान** ( अ + मान ), **अनभग्न** ( अ + भग्न ), **अनवाणा** ( अ + वहाण ), **अनहित** ( अ + हित ), इ०.

---

## विभाग ९.

### समासां विषयीं स्फुट विचार.

६१६ मराठी भाषेंत जर सामासिक नामांचें पूर्वपद अकारवर्जितस्वरान्त असलें, तर त्यास अकारादेश किंवा

एकारादेश होतो; जसें–जितकोळसा, काळसांवळा, तोंडलेभात, घोडेराऊत, घोडेमात, इ०.

६१७ एका सामासिक शब्दाचे समयीं दोन तीनाहि समास संभवतात; परंतु त्यांतून कोणता समास ग्राह्य हें अर्थानुसंधाना वरून समजावें; जसें–'त्या राजाचा **सत्यव्रताचा** नियम मोठा आहे,' ह्मणजे-'सत्यरूप जें व्रत' त्याचा नियम, असा कर्मधारय समास होतो; आणि 'तो राजा मोठा **सत्यव्रत** होता,' ह्मणजे–सत्य आहे व्रत ज्याचें' असा होता, एथें बहुव्रीहि समास होतो; तो राजा **सत्यव्रत** पाळण्या विषयीं मोठा दक्ष आहे,' या वाक्यांत 'सत्याचें जें व्रत तें' असा षष्ठीतत्पुरुष, अथवा,'सत्य पाळण्या विषयीं आणि एकादश्यादि व्रत पाळण्या विषयीं' दक्ष, असा द्वंद्व समासहि संभवतो.

व्याकरणपदच्छेद करते समयीं अशी अडचण फार येत असत्ये; एकादे समयीं दोन तीन प्रकारचे विग्रह केले तरीं ते सर्व अर्थास अनुकूल असतात, अशा प्रसंगीं ज्यास जो नीट दिसेल, व ज्याची जशी अर्थो विषयीं रुचि असेल, तदनुरूप त्याणें तो समास मानावा. हीं व्याकरणांत निरंतर वादाचीं स्थळें असतात.

संस्कृत काव्यांत, व मोरोपंतवामनादिकृत जीं मोठीं प्रौढ प्राकृत काव्यें त्यांताहि बहुधा अनेक शब्द अनेक प्रकारच्या समासांनीं युक्त असून तें सर्व पद सामासिक असतें, व असें सामासिक पद इतर शब्दांचें विशेषणाहि असतें; उदाह०–'त्याकाळीं **श्रीमद्रघुवंशभूषणकोदंडपाणि** राम **भ्रातृशुश्रूषैकनिष्ठ लक्ष्मणा** सह पंपासरतटीं आगमन करिता झाला,' या वाक्यांत–**श्रीमत्** असा, आणि 'रघूचा जो वंश तो'–**रघुवंश** (षष्ठीतत्पुरुष), 'श्रीमत् असा जो रघुवंश' हा सारा कर्मधारय,

'रघूचें जें भूषण तें' -**रघुवंशभूषण** ( षष्ठीतत्पुरुष ), अथवा, 'रघुवंशास आहे भूषण ज्याणेंकरून' असा बहुव्रीहि समास करून,-**रघुवंशभूषण**, आणि 'कोदंड आहे पाणीच्या ठायीं म्हणजे हस्तीं ज्याच्या' तो-**कोदंडपाणि** ( बहुव्रीहि ), या तिन्ही विशेषणांचा पुनः द्वंद्व समास करून तें सारें **राम** याशब्दाचें विशेषण करावें. यांत एक कर्मधारय, एक द्वंद्व, दोन तत्पुरुष, आणि दोन बहुव्रीहि, असे समास आहेत. तसेंच 'भ्रात्याची जी शुश्रूषा ती' **भ्रातृशुश्रूषा** ( षष्ठीतत्पुरुष ),' एक अशी जी निष्ठा ती **एकनिष्ठा** ( कर्मधारय ), 'भ्रातृशुश्रूषा आहे एकनिष्ठा ज्याची तो ' -**भ्रातृशुश्रूषैकनिष्ठ** असा शेवटीं बहुव्रीहि समास करून तें सर्व पद **लक्ष्मणाचें** विशेषण करावें.

---

## खंड ५.

### कारकविचार.

६१८ क्रियेच्या अन्वयें जो विभक्तीचा अर्थ त्यास **कारक** असें ह्मणतात. हीं कारकें सहा आहेत;-**कर्त्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान,** आणि **अधिकरण.**

---

### भाग १.

#### प्रथमा.

६१९ ही विभक्ति कोणत्याहि शब्दास असतां क्रियेच्या अन्वयें तिचे मराठी भाषेंत तीन अर्थ असतात;-**कर्त्ता, कर्म,** आणि **परिमाण.**

[ अ ] प्रथमाविभक्त्यंत जितके शब्द तितक्यांतून कित्येकांच्या ठायीं क्रियाजनकत्वधर्म संभवतो, ह्मणजे ज्यांपासून क्रिया उत्पन्न होत्ये, असा अर्थ असतो,

तेव्हां त्यांस त्या क्रियांचे कर्ते ह्मणावे; जसें–'**रामा मारितो**,' यांत **मारितो** या क्रियेचा उत्पन्न कर्त्ता रामा, ह्मणजे रामापासून ही क्रिया उत्पन्न होत्ये असा अर्थ; ह्मणोन **रामा** हा प्रथमान्त शब्द **मारितो** या क्रियेचा कर्ता होय. सांगायास तात्पर्य कोणत्याहि क्रियेचें कर्तृत्व प्रथमाविभक्त्यन्त अथवा तृतीयाविभक्त्यन्त शब्दावर असतें, मग ती क्रिया स्पष्ट त्या वाक्यांत उक्त असो, अथवा अध्याहृत असो; जसें–'**सूर्य उगवतो**,' या वाक्यांत **सूर्य** ही प्रथमा विभक्ति होय, आणि **उगवतो** या क्रियेचा कर्ता होय; तसेंच–'काय चांगला मुलगा,' एथें **मुलगा** हें प्रथमान्त नाम, **आहे** इत्यादि अध्याहृत क्रियेचा कर्ता होय.

[ आ ] अथवा, ज्या वर एकाद्या क्रियेचा व्यापार घडतो, असा ज्याच्या विभक्तीचा त्याचे क्रियेशीं संबंध असतो, आणि ज्यास त्या क्रियेचें **कर्म** असें ह्मणतात, अशा अर्थाचे दर्शकहि कित्येक शब्द प्रथमान्त असतात; जसें–'**पारधी वाघ मारितो**,' यांत **मारणें** या क्रियेचा व्यापार पारध्यापासून उत्पन्न होऊन वाघा वर घडतो, ह्मणोन **वाघ** ही जी प्रथमा विभक्ति आहे तिचा अर्थ **कर्म** जाणावें.*

क्रियाजनकत्वधर्माचा संभव नसतां केवळ त्या त्या क्रियेचा व्यापार ज्या पदार्थी वर होतो तद्वाचक जो प्रथमान्त शब्द तो त्या क्रियेचें कर्म जाणावें; जसें—पूर्वे उदाहरणांत **पारधी** हें प्रथमान्त नाम कर्त्ता, आणि **वाघ** हें प्रथमान्त नाम **कर्म** होय. हा प्रथमा विभक्तीचा कर्तृकर्मरूपभेद केवळ अर्था वरून जाणावा.

---

* हा भेद पुढें वाक्यरचनेंत कर्तृक्रियासंबंधा विषयीं जे नियम दाखविले आहेत, त्यांत स्पष्ट केला आहे.

[इ] जर वाक्यांत एक कर्ता आहे, आणि दुसरे तत्पर्यायवाचक शब्द प्रथमान्त असले, तर क्रियाजनकत्व ज्याच्या ठायीं संभवतें, त्यास कर्ता मानून वरकड प्रथमाविभक्तींचाहि कर्त्रर्थ मानावा; परंतु त्यांत जर एकाद्या अर्थाचें विधान आहे, तर त्या विधेयार्थवाचक शब्दांच्या प्रथमेस **विधानार्थी** अथवा **विधेयार्थी** प्रथमा मानावी; आणि त्या विधेयाचें उद्देश्य असेल त्याची तत्संबंधानें **उद्देश्यार्थी** प्रथमा मानावी; उदाह०—'तो गृहस्थ ब्राह्मण आहे,' एथें **तो** हें प्रथमान्त सर्वनाम **आहे** या क्रियेचा कर्त्ता होय, आणि **गृहस्थ** या पर्यायवाचक शब्दाचीहि प्रथमा कर्तरि होय; परंतु एथें गृहस्थास उद्देशून त्याच्या ब्राह्मणत्वाचें विधान केलें आहे, ह्मणोन **ब्राह्मण** ही **विधानार्थी** अथवा **विधेयार्थी** प्रथमा ह्मणावी, आणि **गृहस्थ** ही **उद्देश्यार्थी** प्रथमा ह्मणावी.

[ई] या शिवाय आणखी जेथें कोणत्याहि द्रव्याच्या परिमाणाचें विधान केलें असतें तेथें परिमाणवाचक शब्दा वरून जी प्रथमा होत्ये ती **परिमाणार्थी** प्रथमा जाणावी; जसें—'एक पायली मीठ,' 'दोन तोळे सोनें,' 'पांच चाहूर जमीन,' 'पन्नास हात पागोटें;' इ०.यांत—**पायली, तोळे, चाहूर, हात,** या शब्दाची परिमाणार्थी प्रथमा जाणावी.

---

## भाग २.

### द्वितीया.

६२० पूर्वोक्त कर्मरूप अर्थ द्वितीयेच्या ठायींहि संभवतो; जसें—'पारधी सशास पळवितो,' एथें **सशास** या द्वितीयेचा अर्थ कर्म होय; तसेंच—'बाप मुलांस पोशि-

तो,' 'आई मुलीस सासरीं पाठवित्ये,' 'कावळे कबुतरांस चोंचितात'; या वाक्यांत जितकीं द्वितीयान्त नामें तितकीं सारीं कर्मे होत. कर्मार्था व्यतिरिक्त इतर अर्थ संभवत असतां ती चतुर्थी मानावी. ( पहा, पृ० ६३, नि० १७८, टीप. )

---

## भाग ३.

### तृतीया.

६२१ तृतीयेचे मुख्य अर्थ पांच आहेत;–**कर्ता**, **करण**, **हेतु**, **अंगविकार**, आणि **साहित्य**.

[अ] **कर्ता**–पूर्वोक्त कर्त्रर्थीं तृतीया होत्ये; उदाह०–'गोपाळानें गाय बांधिली,' 'विनायकानें आपली पोथी लिहिली,' इ०. एथें **गोपाळानें**, **विनायकानें**, हे तृतीयान्त शब्द अनुक्रमेंकरून **बांधिली**, **लिहिली**, या क्रियापदांचे कर्ते होत.

[आ] **करण**-कोणतीहि क्रिया करावयास जें साधन त्यास त्या क्रियेच्या अन्वयें **करण** असें ह्मणतात; जसें–'रामानें **बाणानें** रावण मारिला,' यांत **मारणें** या क्रियेचें साधन **बाण** आहे, असा अर्थ **बाणानें** हा तृतीयान्त शब्द दर्शवितो; ह्मणोन **बाणानें** ही करणी तृतीया होय. तसेंच–'गोपाळानें **दाव्यानें** गाय बांधिली,' 'विनायकानें **लेखणीनें** पोथी लिहिली,' **भक्तीनें** ईश्वर प्राप्त होतो,' '**द्रव्यानें** सर्व मिळतें,' इ०. आणखी करणी तृतीयेचीं उदाहरणें.

[इ] **हेतु**–कोणतीहि क्रिया व्हावयास अथवा करावयास जें निमित्त अथवा कारण असतें, तद्वाचक जे शब्द त्यां वरून तृतीया होत्ये; उदाह०–'**पैक्यानें**

महाग', '**वयानें** वडील ', 'तो गांव **दुष्काळानें** ओस पडला', तुह्मीं **आल्यानें** माझें कार्य झालें;' इ०. यांत **पैक्यानें**, **वयानें**, **दुष्काळानें**, **आल्यानें**, इ०. ही हेत्वर्थीं तृतीया होय.

[ई] **अंगविकार**—कोठें अंगविकाराची विवक्षा असतां विकृतांगवाचक शब्दां वरूनहि तृतीया होत्ये; **ईस अंगविकारी** तृतीया ह्मणतात; उदाह० – **अंगानें** पुष्ट,' '**पायानें** लंगडा', '**मुखानें** जड', ' **रंगानें** गोरा', '**डोळ्यांनीं** आंधळा', इ० ही अंगविकारी तृतीया.

[उ] **साहित्य**-कर्ता कोणतीहि क्रिया करित असतां त्याच्या साहचर्यानें राहणारा जो पदार्थ तद्वाचक शब्दां वरून तृतीया होत्ये; उदाह०—' भिकंभट एका **अंगवस्त्रानें** आले', यांत **अंगवस्त्रानें** ह्मणजे अंगवस्त्रा सहित; तसेंच—'अशा मळक्या **पागोट्यानें** तूं तेथें जाऊं नको', ' त्या काळीं बारा हजार **स्वारांनीं** शिवाजी मुसलमानां वर पडला', इ०. यांत—**अंगवस्त्रानें**, **पागोट्यानें**, **स्वारांनीं**, इ० साहित्यार्थीं तृतीया होय.

[ऊ] तृतीयेचा अर्थ **कर्ता** आणि **करण** असतां बहुधा **नें**, **एं**, हे प्रत्यय होतात, आणि **सन्निधान** अ० **बरोबरी** असा अर्थ असतां **शीं** प्रत्यय होतो, असा बहुधा या भाषेंत नियम आढळतो. 'पारध्यानें **बंदुकीनें** वाघ मारिला', 'त्या उंदराम त्याणें मांपळ्यानें धरिलें,' 'रामें दिलें तिस उपद्रव कोण देता,' या उदाहरणांत तृतीयेचे अर्थ अनुक्रमें कर्ता आणि करण होत. 'त्याणें **त्याशीं** मारामारी केली,' 'तूं **मजशीं** कांहीं बोलूं नको,' एथें **त्याशीं**, **मजशीं**, या तृतीयेनें **सन्निधान**, **संघट्टन**, अशा अर्थाची उपलब्धि होत्ये.

कोठें करण अर्थ असतांहि **शीं** या प्रत्ययाचा प्रयोग करितात; जसें—'त्याणें चोरास **काठीशीं** मारिलें,' 'इंग्रेज लोक तरवारीशीं लढत नाहींत,' इ०. परंतु असा प्रयोग बहुधा मुंबई प्रांतीं आढळतो; अशा ठिकाणीं **नें** याचा प्रयोग करणें हाच उत्तम पक्ष.

कोठें **करण** अथवा **साहित्य** अर्थ असतां **नीं** आणि **शीं** हे तृतीयेचे दोन्ही प्रत्यय एकत्र जोडून लावितात; जसें—'पंवारानें एक हजार **स्वारांनिशीं** तो किल्ला घेतला,' 'महमूद वीस हजार **घोड्यांनिशीं** पंजाबांत शिरला,' इ०.

या ठिकाणीं **नीच्या** स्थानीं ऱ्हस्व **नि** होतो व कोठें **नहि** होतो;—**स्वारांनशीं, घोड्यांनशीं,** असाहि प्रयोग आढळतो.

---

## भाग ४.

### चतुर्थी.

६२२ विभक्तिप्रकरणीं सांगितलेंच आहे कीं मराठींत द्वितीयेचीं आणि चतुर्थीचीं रूपें सारखींच होतात; ह्मणोन हा विभक्तिभेद अर्थावरून जाणावा लागतो. त्यांत जेथें **कर्म** अर्थ असतो ती द्वितीया, आणि या शिवाय इतर सर्व अर्थ असतां चतुर्थी मानावी.

संप्रदान ह्मणजे ज्या अर्थी अथवा ज्या कारणें, अथवा ज्यास उद्देशून, एकादी क्रिया घडत्ये असा जो त्या क्रियेशीं विभक्तीचा संबंध असतो तें; जसें—'रावजी **ब्राह्मणाला** दक्षिणा देतात,' 'ती **मुलांनां** दूधभात जेऊं घालित्ये,' 'त्याणें हा आंबा **मला** कापिला आहे,' या वाक्यांत **ब्राह्मणाला, मुलांनां,** आणि **मला,** ही चतुर्थी जाणावी.

कित्येक ठिकाणीं देशकालवाचक शब्दां वरून अधिकरणार्थीं चतुर्थी होत्ये; जसें—'तो **पुण्यास** गेला,' 'त्याचें लष्कर **दिल्हीला** जाऊन पोंहचलें,' तो **दिवसास** निजतो, आणि **रात्रीस** जागतो,' इ०. तसेंच—'**डोक्यास** पागोटें,' **अंगास** अंगरखा,' अशा ठिकाणीं ही अधिकरणीं चतुर्थी जाणावी; उदाह०—'तो आला त्या वेळेस त्याच्या डोक्यास पागोटें होतें,' इ०.

---

## भाग ५.

### पंचमी.

६२३ एकाद्या क्रियेशीं विभक्तीचा संबंध असतां जेणें करून अवधीचा अथवा वियोगाचा अथवा न्यूनाधिक्याचा बोध होतो, त्यास **अपादान** ह्मणावें. पंचमी विभक्ती वरून अशा अर्थाची उपलब्धि होत्ये; जसें—**मुंबईहून** पुणें साठ कोश आहे,' एथें **मुंबईहून** या पंचमीपासून **मुंबई** आणि **पुणें** यांतील अवधीचा बोध होतो; तसेंच—'तो **घरून** आला,' '**काशीहून** कलकत्ता दूर आहे,' **गोपाळाहून** रावोबा अधिक देखणा आहे.' इ०.

---

## भाग ६.

### सप्तमी.

६२४ ज्या स्थळीं, किंवा ज्या वर, किंवा ज्याच्या ठायीं, एकादी क्रिया घडत्ये त्यास **अधिकरण** ह्मणावें. सप्तमीचा अर्थ **अधिकरण** असतो; जसें 'तो **घरांत** जेवित नाहीं,' एथें **घरांत** हें अधिकरण होय; तसेंच—

'ती **देशांत** फिरतो,' '**लोकांत** वागतो,' 'त्या **पुरुषांत** चातुर्य फार आहे,' इ०.

मन रामीं रंगलें अवघें मनचि राम झालें. एकनाथ.

६२५ जीं वस्त्रालंकारादिक त्यांचा आधाराधेयभाव-संबंध असतां या भाषेंत जनरूढी प्रमाणें आधेया वरून सप्तमी होत्ये; जसें—'**जोड्यांत** पाय' असा अर्थ असतां '**पायांत** जोडा' असें बोलण्याची रूढि पडून गेली आहे; तसेंच—'**अंगांत** अंगरखा,' '**डोकींत** पागोटें,' '**बोटांत** आंगठी,' '**पायांत** जोडवें,' इ०. आणखी उदाहरणें.

अकारान्त शब्दां वरून क्वचित् करणार्थींहि सप्तमी होत्ये; जसें—'हें काम त्याणें आपल्या **हातीं** केलें,' 'तो आपल्या **तोंडीं** बोलला,' 'ती **पायीं** आली,' इ०.

कोठें सप्तमीचाहि साहित्यार्थीं तृतीये सारखा अर्थ होतो; जसें—'रिकाम्या **हातीं** बाजारांत जाऊं नये,' 'उघड्या **पायीं** रानांत फिरूं नये,' इ०.

## भाग ७.

### षष्ठी.

६२६ संस्कृत वैयाकरण षष्ठीचा अर्थ जो **संबंध** तो कारकांत लेखित नाहींत हें सयुक्तिक आहे; कारण, **षष्ठी** कांहीं साक्षात् क्रियेशीं संबंध ठेवित नाहीं; षष्ठीचा संबंध इतर शब्दांशीं होऊन त्या शब्दांचा संबंध क्रियेशीं राहतो. उदाह०—'गोपाळाच्या बापानें एक दुकान घातलें,' यांत **घातलें** या क्रियेशीं जो कर्त्रन्वयें संबंध तो **बाप** या शब्दाशीं होय; **गोपाळ** या शब्दाशीं **घातलें** या क्रियापदाचा कांहीं संबंध नाहीं; ह्मणोन **षष्ठी** **कारकांत गणित नाहींत.**

आतां हा षष्ठीचा संबंध अनेक प्रकारचा असतो, त्याचा विस्तार केला असतां ग्रंथ वाढेल, ह्मणोन त्यांतील कांहीं मुख्य प्रकार एथें सांगतों.—

**अंगांगिभावसंबंध.** जसें—हाताचें बोट.
**स्वस्वामिभावसंबंध.** जसें—बाजीरावाचा वाडा.
**सेव्यसेवकभावसंबंध.** जसें—राजाचा दूत.
**आधाराधेयभावसंबंध.** जसें—नदीचा मासा, रात्रीचा अंधार.
**जन्यजनकभावसंबंध.** जसें—या बाईचें अपत्य.
इ०. इ०.

६२७ क्वचित् अधिकरणार्थींहि षष्ठी होत्ये; जसें—'तो **दिवसाचा** निजतो आणि **रात्रीचा** काम करितो,' यांत **दिवसाचा** आणि **रात्रीचा** ह्मणजे दिवस असतो त्या काळीं, आणि रात्र असत्ये त्या काळीं, असा अर्थ; तसेंच—'तो **शिमग्याचा** बाहेर पडत नाहीं,' 'ती **पहाटेची** उठून ईश्वराचें स्मरण करित्ये.'

यां मधून कित्येक क्रियाविशेषण अव्ययें मानिलीं तरीं चालेल (पहा. पृ० २७८, नि० ५७०).

६२८ क्वचित् करणार्थीं व हेत्वर्थींहि षष्ठी होत्ये; जसें—'माझ्या **बोलण्याचा** ह्याला राग येतो,' ह्मणजे माझ्या **बोलण्यानें**—**बोलण्या मुळें**, असा अर्थ.

६२९ क्वचित् कालवाचक अथवा स्थलवाचक कित्येक शब्दां वरून अपादानार्थीं षष्ठी होत्ये; जसें—'मी **कालचा** त्यास सांगतों आहें, परंतु तो ऐकत नाहीं,' ह्मणजे कालपासून असा अर्थ. 'तो **केव्हांचा** एथें उभा आहे,' ह्म० केव्हांपासून.

या प्रमाणें हें कारकप्रकरण एथें संक्षेपरूपानें सांगितलें.

यांत शिकणारांनीं लक्षांत ठेवावें कीं एका विभक्तीचे जे अनेक अर्थ होतात, ते त्या त्या प्रसंगीं जसे अर्थास अनुकूल दिसतील तसे मानावे.

---

## खंड ६.

### वाक्यरचना.

६३० वाक्या मध्यें शब्दांची योजना कसकशी करावी, व कोणता शब्द कोणत्या शब्दांशीं संबंध ठेवितो, व जो ज्याशीं संबंध ठेवितो तो त्या वाक्यांत तत्संबंधानें मागें पुढें कसा असावा, हा विचार या खंडांत केला आहे. वाक्यरचनेंत जे नियम आहेत, त्यां विषयीं पुढें कित्येक रीति सांगून त्यांचें विवेचन केलें आहे, त्या वर शिकणाराचें लक्ष अवश्य असावें.

६३१ **वाक्य** ह्मणजे, ज्यांस उद्देशून आपण कांहीं एक विधान करितों ते उद्देश्य शब्द, आणि ज्यांचें विधान करितों ते विधेय शब्द, यांचा समाहार; अर्थात्, उद्देश्य तो **कर्ता**, आणि विधेय ती **क्रिया**, ह्मणजे कर्ता आणि क्रियापद यांचा जो समाहार त्यास वाक्य ह्मणावें; उदाह०—'रामा येतो,' यांत रामास उद्देशून **येतो** या शब्देंकरून त्याच्या येण्याचें विधान केलें आहे; ह्मणोन यांत **रामा** हा कर्ता, आणि **येतो** हें क्रियापद; हे दोन शब्द मिळून वाक्य झालें आहे.

या वरून कोणीं असें समजूं नये कीं वाक्यांत कर्ता आणि क्रियाच असल्ये; नाहीं, तर निदानपक्षीं कर्त्ता आणि क्रिया तरीं असली पाहिजे; या दोहों शब्दां वाचून वाक्याची पूर्णता होत नाहीं इतकेंच एथें समजलें पाहिजे.

६३२ वाक्यांत जो शब्दांचा परस्पर संबंध त्यास **अन्वय** ह्मणतात; जसें–'दशरथाचा परम देदीप्यमान व अत्यंत पराक्रमी पुत्र जो राम,' यांत **दशरथाचा** या शब्दाचा अन्वय **पुत्र** या शब्दा कडे आहे; तसेंच–'गोपाळानें केलेली जी काळ्या बोरूची लेखणी,' यांत **केलेली** या धातुसाधित विशेषणाचा **लेखणी** या नामा कडे अन्वय आहे.

६३३ एका शब्दाचा अन्वय दुसऱ्या शब्दा कडे असून त्या अन्वित शब्दाच्या रूपांत विकार करण्याचें जें त्याच्या ठायीं सामर्थ्य असतें त्यास **अधिकार** ह्मणतात; जसें–'गोविंदाच्या बापानें,' यांत **बापानें** या तृतीयाविभक्त्यंत शब्दाचा अधिकार **गोविंदाच्या** या शब्दा वर आहे; कारण, त्याच्या विभक्तीच्या योगानें **गोविंदाचा** (बाप) असा मूळचा शब्द असतां त्याचें **गोविंदाच्या** असें विकृत रूपांतर आलें आहे.

६३४ वाक्यें तीन प्रकारचीं असतात,–**पूर्ण**, **अपूर्ण**, आणि **संयुक्त**.

६३५ **पूर्ण** वाक्य ह्मणजे ज्या वाक्यांत कर्त्ता आणि क्रिया असून अर्थाची समाप्ति होत्ये तें; जसें–'रामा आला,' 'गोपाळानें गाय बांधिली,' 'ते उद्यां जातील,' 'काल शाळेंत अध्यक्षां समोर त्याची परीक्षा झाली,' इ०.

६३६ **अपूर्ण** वाक्य ह्मणजे ज्या वाक्यांत अर्थाची समाप्ति होत नाहीं, आणि ती होण्यास इतर शब्दाची अपेक्षा असत्ये तें; जसें–'जो माणूस काल आला होता, त्याणें तें काम करून,' यांत अर्थाची समाप्ति होत नाहीं; करून नंतर काय केलें हें सांगायाचें राहिलें, ह्मणून हें अपूर्ण वाक्य.

६३७ **संयुक्त** वाक्य ह्मणजे अनेक वाक्यें पूर्ण किंवा अपूर्ण एकत्र होऊन जें एक वाक्य होतें तें; जसें–'रामा तेथें आला, आणि तो रावजीचा निरोप त्या गृहस्थांस सांगून, मग त्या गोष्टीच्या योजनेस लागून, ती मसलत त्याणें सिद्धीस नेली, परंतु मला कांहींच कळविलें नाहीं.'

६३८ **संयुक्त** वाक्यांत मुख्यार्थाचें प्रतिपादक जें वाक्य त्यास **मुख्य** वाक्य ह्मणावें, आणि तदंतर्गत जीं अवांतर वाक्यें तीं **गौण** वाक्यें ह्मणावीं; जसें–'त्याणें तें पत्र बारीक कागदावर लिहून पुण्यास कालचेकाल रवाना केलें,' यांत 'त्याणें तें पत्र रवाना केलें' हें मुख्य वाक्य, 'आणि बारीक कागदा वर लिहून कालचेकाल' हें अपूर्ण **गौण** वाक्य जाणावें.

या प्रमाणें वाक्यांत मुख्यार्थी वर दृष्टि ठेऊन त्यांतील सर्व शब्दांचा व पदांचा यथायोग्य अन्वय लावणें हें कार्य विद्वत्तेचें व विचाराचें आहे, असें समजलें पाहिजे. व अशा विचारानें वाक्यांत मुख्यगौणादि भेद, व त्यांतील पदांचे उपभेद पडतात, त्यांचें अर्थशास्त्रांत विस्तारपूर्वक निदर्शन केलें असतें; परंतु त्यांचें एथें मासल्या करतां उगीच दिग्दर्शन केलें आहे, कारण तो विषय मोठ्या ग्रंथाचा होय.

## नियम १.

६३९ जर वाक्यांत एकच विशेष्य असलें, तर त्याचें लिंग, वचन, आणि विभक्ति, यां वरून तदन्वित विशेषण आणि विशेषणसर्वनाम, यांचीं रूपें फिरतात; जसें–'त्या वर्गांत सर्व मुलां मध्यें तो मुलगा **चांगला** आहे,' 'त्या घरांत रमा समजूत घेण्या **जोगी** आहे,' 'तीं फुलें **पिवळीं** आहेत;' 'या पोरी **दांडग्या** आहेत,' इ०.

परंतु ज्या विशेषणादिकांचें रूपांतर विशेष्याच्या

लिंगादिभेदेंकरून होत नाहीं, त्यांस हा नियम लागत नाहीं; जसें—'**नारंगी** रंग,' '**गुलाबी** जांब,' '**लुटारू** वाटाडे,' '**तासींव** पाटल्या,' '**गोड** फळें,' '**सुंदर** फुलें,' इ०.

जर त्या वाक्यांत एका पेक्षां अधिक विशेष्यें असलीं, तर जें जवळचें विशेष्य असेल त्याशीं तीं विशेषणादि संबंध ठेवितात; जसें—'त्या शिपायाची पगडी, डगलें, पट्टा, **तांबडा** आहे,' 'माझी **लिहिलेली** पोथी, कागद, सर्व त्या जवळ राहिले,' '**हा** अंगरखा, टोपी आणि धोतर, कोणाचें? **या साऱ्या पिवळ्या** साड्या, पितांबर, आणि पागोटीं हीं कोठून आणिलीं.

**नियम २.**

६४० जर एकलिंगी अनेक शब्द वाक्यांत उभयान्वयी अव्ययाच्या योगानें सांगडले असले, तर त्यांच्या विशेषणादिकांचीं त्याच लिंगीं अनेकवचनाचीं रूपें योजावीं. परंतु बहुधा त्या शब्दां पुढें **हा** किंवा **असा**, या सर्वनामांचीं लिंगादिभेदेंकरून योजना करावी हें चांगलें. नुस्तें चांगलें इतकेंच नाहीं, परंतु कित्येक ठिकाणीं तर अवश्य केली पाहिजे. तसेंच आणखी जर ते शब्द भिन्न भिन्न जातीचे वाचक असले, तर ज्या शब्देंकरून त्या अवघ्या व्यक्तींचा संग्रह होऊं शकतो, अशा सामान्य शब्दाची योजना करावी लागत्ये. उदाह०—'तूं आणि मीं फळ भक्षणारे,' 'खोबरेल आणि तिळेल सस्तीं आहेत;' 'गौरी, मथुरा, आणि काशी, या मोठ्या शहाण्या आहेत,' 'घोडा, बैल, उंट, हत्ती, आणि गाढव, हे मोठे उपयोगी पशु आहेत,' 'त्यांहीं त्या वेळीं आपल्या बंदुकी' तलवारी 'आणि ढाला अशीं हत्यारें बरोबर घेतलीं.'

[ अ ] मराठी भाषेंत **हा**, **असा**, या सर्वनामांचा

या प्रमाणें योग असतो ह्मणून अशा वाक्यांत मधल्या उभयान्वयी अव्ययाची समयविशेषीं अपेक्षा ठेवित नाहींत; जसें—'घोडा, बैल, उंट, गाढव, हे मोठे उपयोगी पशु आहेत,' 'कागद, लेखणी, शाई, चाकू, हीं लिहिण्याचीं साहित्यें होत.'

[ आ ] एकलिंगी अनेक शब्द या प्रमाणें एका पुढें एक जोडिले असतां त्यां पुढें त्यांच्या जातिवाचकाचा प्रयोग करणें हें मराठी भाषेंत चांगलें दिसतें; व कित्येक ठिकाणीं तो नकेला तर तें वाक्य केवळ पूर्ते असें वाटत नाहीं; जसें पूर्वीं सांगितल्या उदाहरणांत—'गौरी, मथुरा, काशी, या शाहण्या आहेत,' हें वाक्य कांहींसें अपूर्ण दिसतें; यांत—'या शाहाण्या **मुली** अथवा **बाया,**' असा जातिवाचक शब्द असल्यास हें वाक्य चांगलें पूर्ण दिसतें.

### नियम ३.

६४१ जर तीं विशेष्यें भिन्न भिन्न लिंगीं असलीं, तर त्या सर्वांच्या विशेषणाचें रूप नपुंसकीं अनेकवचनीं असलें पाहिजे; परंतु एथेंहि दुसऱ्या रीती प्रमाणें **हा,** अ० **असा,** या सर्वनामाची योजना केली पाहिजे; जसें—'त्याचा मुलगा, मुलगी, भाउ, हीं सारीं चांगलीं आहेत,' 'त्यांहीं घोडा, गाडी, घर, शेत, बाग, हीं सारीं विकून फडशा केला,' 'त्याणें आपले कागद, लेखण्या, दऊत, अशीं आटोपून ठेविलीं,' इ०.

**हा, असा,** यांचा मध्यें प्रयोग केला असतां त्यांचा संबंध जर पुढल्या जातिवाचकाशीं असला, तर त्याचा अधिकार या सर्वनामां वर असतो; असें असलें ह्मणजे वर सांगितला नियम राहत नाहीं. जर तें पुढलें जातिवाचक नसलें, आणि नुसतीं सर्वनामेंच असलीं, तर

मात्र वर सांगितला नियम चालतो. उदाहरण—'तिणें शेला, पागोटें, धोत्रजोडा, आणि एक शालीचें फर्द, **असा** आपल्या जांवयास पोशाक दिला,' या वाक्यांत **असा** या सर्वनामाचा अन्वय पुढला जातिवाचक शब्द जो **पोशाक** त्या कडे आहे, ह्मणोन त्याच्या लिंगवचनानुरूप या सर्वनामाचें व पुढल्या क्रियापदाचें रूप फिरतें.

## नियम ४.

६४२ वाक्यांत विशेषण विशेष्याच्या अगोदर असलें पाहिजे; जसें—'चांगला मुलगा,' 'शहाणी मुलगी,' 'बढाईखोर प्रवासी,' इ०.

[ अ ] परंतु जर त्या विशेष्याच्या गुणाचें विधान कर्तव्य आहे, तर तें विशेषण विशेष्याच्या पुढें येतें; जसें—'तो घोडा पांढरा आहे,' एथें घोड्यास उद्देशून त्याच्या पांढरेपणाचें विधान केलें आहे.

[ आ ] क्वचित् भाषणांत विधिविशेषण विशेष्याच्या मागूनहि येतें, तेथें पूर्वोक्त नियम राहत नाहीं;—'तो पांढरा घोडा आहे,' या वाक्यांतहि घोड्यास उद्देशून त्याच्या पांढरेपणाचें विधान केलें आहे; परंतु जेथें अवधारणानें दुसऱ्याच्या प्रतिज्ञेचा निषेध कर्तव्य आहे, तेथें हें विधिविशेषण विशेष्याच्या पुढेंच असलें पाहिजे; जसें—'तुह्मीं सांगतां तो कांहीं पढला नाहीं, परंतु मीं पाहिलें तो फार विद्वान आहे,' 'ती मोठी शहाणी आहे यांत संशय नाहीं.'

## नियम ५.

६४३ संबंधी सर्वनामाचा ज्या नामा कडे अन्वय असतो, त्याच्या लिंगवचना प्रमाणें त्याचें रूप फिरतें;

आणि तदन्वित जें दर्शक सर्वनाम तें पुढें त्या वाक्यांत याच्या लिंगवचनानुरूप असलें पाहिजे; जसें—'जो मुलगा विद्या शिकेल तो पुढें प्रतिष्ठा मिळवील,' 'जो चाकरी करील तो भाकरी खाईल,' 'जी मुलगी चांगलें शिकेल तिला इनाम मिळेल,' इ०.

[ अ ] जर दोन तीन नामें एकत्र जोडलीं असलीं, तर जवळचें जें नाम त्याशीं या संबंधी सर्वनामाचा अन्वय असतो; जसें—'लिहायाच्या उपयोगी **जो** कागद, लेखणी, शाई, रेखाटणी, हीं निरंतर जवळ असावीं,' 'शिकारीची **जी** कमाण, तीर, कुत्रीं, इ० सामान,' इ०, परंतु अशीं अनेक नामें एकत्र जोडलेलीं असलीं ह्मणजे तें संबंधी सर्वनाम, व पुढलें जें दर्शक सर्वनाम, तें दुसऱ्या आणि तिसऱ्या नियमा प्रमाणें पुढल्या जातिवाचकाच्या लिंगवचनाशीं विशेषेंकरून संबंध ठेवितें. पूर्वोक्त वाक्य असें असावें—'लिहायाच्या उपयोगी **जें** कागद, लेखणी, शाई, रेखाटणी, इत्यादि सामान **तें** निरंतर जवळ असावें,' 'शिकारीचीं **जीं** कमाण, तीर, कुत्रीं, वाद्या, इत्यादि साधनें **तीं**,' 'श्रमपूर्वक साध्य केलें **जें** व्याकरण, न्याय, काव्य, यांचें अध्ययन **तें** विसरूं नये,' 'गायनादि **ज्या** कला **त्या**,' इ०.

## नियम ६.

६४४ अकर्मक धातूचे प्रयोग दोन प्रकारचे होतात, एक कर्तरि आणि एक भावी; त्यांत कर्तरिप्रयोग असतां कर्ता प्रथमान्त पाहिजे, व त्या कर्तृपदाचा अधिकार क्रियापदाच्या रूपा वर असतो. भावीप्रयोग असतां कर्त्ता तृतीयान्त पाहिजे; व क्रियापदाचें रूप नपुंसकीं आणि एकवचनीं असावें. जसें—' तो उठतो,' ' ती ह-

सल्ये,' 'तें उडतें,' 'त्या गेल्या,' 'तीं जावीं,' हा कर्तरिप्रयोग; 'तिणें जावें,' 'जात असावें,' 'म्यां रडत जावें,' हा भावीप्रयोग.

अकर्मक धातूं मध्यें जे भावकर्तृक धातु आहेत, त्यांच्या प्रयोगास भावकर्तारिप्रयोग ह्मणावें, व असा प्रयोग असतां क्रियापदाचें रूप नपुंसकीं एकवचनीं असावें; जसें–' मला वाटतें,' 'त्यास कळमळतें,' ' मला आज सांजावलें,' 'मला असें भासलें.'

## नियम ७.

६४९ सकर्मक धातूंचा वर्तमान व भविष्य काळीं कर्तरिप्रयोग असतो; तेव्हां पहिल्यानें कर्ता, मग कर्म, आणि शेवटीं क्रियापद, असा क्रम असावा; उ०– 'रामा गाई राखितो,' 'गंगा चोळी शिवत्ये,' इ०.

[ अ ] हें कर्म बहुधा प्रथमान्त असतें, व कोठें द्वितीयान्तहि असतें; पूर्वोक्त उदाहरणांत ' रामा गाई राखितो,' एथें 'रामा गाईस राखितो,' असेंहि होतें. परंतु यांत बहुधा कर्म प्रथमान्त असावें हा उत्तम पक्ष.

[ आ ] यांत सर्वनाम जर कर्म आहे, किंवा प्राणिवाचक विशेष नाम कर्म आहे, तर तें द्वितीयान्त असलें पाहिजे; उदाह०–'तो त्यास धरितो,' 'गोविंदा विठूला मारितो,' परंतु प्राणिवाचक जर सामान्य नाम असलें तर तें बहुधा प्रथमान्त असलें पाहिजे; उदाह०–'अरे तूं एक शिपाई तर घेऊन ये,' 'मीं एक गडी बलावितों.'

( इ ) जर वाक्यांत संप्रदानीं चतुर्थी असली तर जें कर्मरूप नाम असतें तें जरीं विशेष नाम असलें तरीं तें बहुधा प्रथमान्त असावें; उदाह०–'मीं तुला रामा दाखवितों,' 'जनक रामास जानकी देतो,' इ०.

[ई] या वरल्या नियमास कोठें अर्थाच्या विपर्यासें-करून व्यभिचारहि येतो; म्हणजे, कर्मवाचक पद प्रथम येऊन मग कर्तृवाचक पद येतें; जसें—'गाय रामा राखितो,' 'चोळी गंगा शिवत्ये.' यांत अर्थभेद इतकाच कीं प्रथम गाय म्हटल्यानें इतर—म्हशी, शेळया, इ० जीं संभाव्य कर्मवाचक पदें त्यांची व्यावृत्ति होत्ये. 'गाई रामा राखितो,' म्हणजे अर्थात् बोलणाराच्या मनांत—म्हशी इत्यादि दुसरा कोणी राखितो, असा आशय असतो; सारांश, जें मुख्य पद असेल, म्हणजे ज्या वर त्याचा श्लेष किंवा नेट असेल, तें पद प्रथम येतें, असें समजावें. पहा,—'तूं जातोसना,' यांत तूं या सर्वनामा वर, आणि 'जातोसना तूं' यांत **जाणें** या क्रिये वर बोलणाराचा नेट आहे असें स्पष्ट दिसून येतें.

## नियम ८.

६४६ **उमज** धातूचा गण वर्जून सकर्मक धातूंचा प्रयोग स्वार्थी भूतकाळीं, व विध्यर्थी कर्मणि आणि भावी असतो; जेव्हां कर्मणिप्रयोग असतो, तेव्हां कर्ता तृतीयान्त आणि कर्म प्रथमान्त असलें पाहिजे; आणि त्या कर्मवाचक नामाचा अधिकार क्रियापदाच्या रूपां-वर असतो; म्हणजे क्रियापदाचें रूप कर्माच्या लिंगवचना प्रमाणें फिरतें; ( वाक्यांत शब्दांचा अनुक्रम वर ७ व्या नियमांत सांगितल्या प्रमाणें असावा. ) उदाह०—'त्याणें पुस्तक वाचिलें,' 'कृष्णीनें आपला परकर रंगविला;' 'त्याणें तें काम करावें,' 'म्यां गाई सोडाव्या,' 'त्वां ईश्वर भक्ति करावी,' 'सर्वांनीं सत्कर्में करावीं,' इ०.

[ अ ] अकरणरूपींहि स्वार्थी भूतकाळीं आणि विध्यर्थी तृतीयान्त कर्त्ता असतो, आणि कर्मणिप्रयोग होतो;

जसें—'त्याणें घोडा बांधिला नाहीं, गाई बांधल्या नाहींत;' 'त्याणें तो घोडा न धुवावा ह्मणोन त्यास म्यां सांगितलें;' आणि विध्यर्थी भावीप्रयोग होतो, जसें—'त्याणें तेथें जाऊं नये,' 'मनुष्यानें इतर क्षुद्र जीवांस त्रास देऊं नये.'

[आ] जेव्हां भावीप्रयोग असतो तेव्हां तें कर्म द्वितीयान्तच असलें पाहिजे; उदाह०—'त्याणें गाईस धरिलें,' 'रामानें आपल्या बापास पाहिलें,' 'त्याणें त्यास मारूं नये.'

कोणी म्हणतात कीं हा नियम चालत नाहीं; म्हणोन हें एक आणखी वादाचें स्थळ आहे. ते ह्मणतात, जरीं कर्म द्विती-यान्त असलें, तथापि कर्मणिच प्रयोग होतो; जसें—'तिणें त्यास धरिला,' 'त्याणें तिला पाहिली,' 'त्यांहीं त्या बापास मारिला,' इ०. व हा नियम हिंदुस्तानी आणि गुजराथी भाषेस अनुसरून आहे, जसें हिंदुस्तानींत—'उन्ने उसको पकडा,' 'मैंने उस घोडीको बोहत प्यारसे पाली;' तसेंच गुजराथींत—'में ते माणसने मार्यो,' 'तेणे आजे छोकरीनें जमवा तेडी,' इ०. या उदाहरणांत कर्म द्वितीयान्त असून त्यांचा अधिकार क्रियापदाच्या रूपां वर असतो. त्यांत,/हिंदुस्तानींत तर मुळींच नपुंसकलिंग नाहीं; आणि भावी प्रयोगहि नाहीं. तेव्हां हिंदुस्तानी भाषेच्या नियमानें एथें कांहीं विशेष समाधान होत नाहीं. आतां गुजराथी भाषेंत मात्र द्वितीयान्त कर्म असतां कर्मणिप्रयोग होतो; परंतु तींत मराठी भाषे प्रमाणें विकल्प नाहीं; म्हणजे, मराठी भाषेंत जसा विकल्पें कर्मणिप्रयोग अथवा भावीप्रयोग होतो, तसा तींत मुळींच विकल्प नाहीं. तेव्हां आतां या विकल्पांत काय तो तारतम्यभाव पहायाचा. वास्तविक सूक्ष्म बुद्धीनें पाहतां कर्त्ता आणि कर्म हीं प्रथमांत

असतां त्याचा अधिकार क्रियापदां वर असावा, आणि तीं सविभक्तिक असतां क्रियापदाचें भावी रूप व्हावें, हा उत्तम पक्ष दिसतो,–'त्याणें वाघ मारिला,' 'शेळ्या धरिल्या,' हा कर्मणिप्रयोग शुद्ध आहे; परंतु 'त्याणें त्यास धरिला,' या पेक्षां–'त्याणें त्यास धरिलें,' हा प्रयोग विशेष ग्राह्य होय. 'म्यां तुला चोरी वर भली धरिली,' या पेक्षां–'म्यां तुला चोरी वर भलें धरिलें,' हें व्याकरणदृष्ट्या अधिक शुद्ध होय; कारण मराठी भाषेंत कर्त्ता अथवा कर्म जें क्रियापदास वागविते, त्याचें सूक्ष्म दृष्टीनें रहस्य पाहतां, व इतर भाषेशींहि ताडून पाहतां, असें लक्षांत येतें कीं, तेथें त्याचा आणि क्रियापदाचा विशेष्यविशेषणभावसंबंध असतो; व तें जें कर्त्ता आणि कर्म यांहींकरून वागणारें क्रियापद, तें मूळचें धातुसाधित विशेषण असून क्रियापदाच्या रूपांत आलेलें असें असतें; 'त्याणें वाघ मारिला,' अथवा, 'तीं चमत्कार करिते,' यांत पूर्व वाक्यांत 'त्याणें वाघ मारिला,' म्हणजे तो जो त्याणें वाघ जो तो मारिला गेला, अथवा मारिलेला असा आहे, असा मूळचा अर्थ; तेव्हां एथें **मारिला** हें मूळचें वाघाचें धातुसाधित विशेषण होय. तसेंच—'तें चमत्कार करिते,' यांत मूळ **करता** या धातुसाधित विशेषणाचें **करती** हें स्त्रीलिंगीं एकवचनाचें रूप होय. आत मराठी भाषेंत असा नियम आहे कीं जेथें हा विशेष्यविशेषणभावसंबंध असतो, तेथें विशेष्य जर प्रथमान्त असलें, तर त्याच्या विशेषणाचें रूप त्याच्या लिंगवचनाच्या अनुरोधानें प्रथमान्त तटस्थ असतें; परंतु जर त्या विशेष्यास कांहीं विकार झाला, तर विशेषणाचें जें असें तटस्थ राहिलेलें रूप त्या सामान्यरूपादि लागलाच विकार होतो. परंतु 'त्याणें **वाघास मारिला**, अथवा, 'त्याणें आपल्या **बायकोला घरीं ठेविलें** यांत **वाघ** आणि **बायको** हे विशेष्यरूप शब्द जर प्रथम

असतें, तर तें **मारिला** आणि **ठेविली** या मूळच्या विशेषण-रूप धातुसाधितांस लागवितें; परंतु हीं विशेषणें सविभक्तिक आहेत, तेव्हां एथें केवळ शुद्ध भूत काळाच्या क्रियापदाचें साधारण जें नपुंसक रूप तें असून भावीप्रयोग व्हावा, असा निर्णय केला म्हणजे या वैकल्पिक प्रयोगा मध्यें विशेष ग्राह्यत्व या भावीप्रयोगा कडेमच येतें. म्हणोन, माझ्या विचारास सकर्मक धातूंच्या भूतकाळीं कर्म जर सविभक्तिक आहे, तर तेथें भावीप्रयोग करावा, हें चांगलें दिसतें; 'त्याणें वाघाला मारिला,' 'त्याणें आपल्या बायकोला घरीं ठेविली,' या पेक्षा–'त्याणें वाघाला मारिलें,' आणि, 'त्याणें आपल्या बायकोला घरीं ठेविलें,' असा भावीप्रयोग विशेष ग्राह्य होय.

[ इ ] परंतु केव्हां केव्हां कर्म द्वितीयान्त असून क्रियाविशेषण जर त्याच्या लिंगवचना वरून साधत असलें, तर कर्मणिप्रयोग करण्याचा परिपाठ आहे; जसें–'त्याणें तिला बरी केली,' 'त्याणें आपल्या घोड्याला चांगला पुष्ट केला,' 'त्या मुलीनें आपल्या बाहुलीस पाटा वर उभी केली,' इ०.

परंतु अशा ठिकाणीं कर्म प्रथमान्त केलें असतां वर जो नियम सांगितला त्यास बाध येत नाहीं; जसें—'त्याणें ती बरी केली,' 'त्यां आपला घोडा चांगला पुष्ट केला,' इ०. अथवा, तें क्रियाविशेषण नपुंसकी करून भावीप्रयोग करावा; जसें–'त्याणें तिला बरें केलें,' 'त्याणें आपल्या घोड्याला चांगलें पुष्ट केलें,' असा नियम ठेवला ह्मणजे वरल्या अपवादाची कांहीं विशेष अपेक्षा राहत नाहीं. परंतु लोकांत व्याकरणाच्या नियमा पेक्षां प्रयोगाची सत्ता बलवत्तर असत्ये.

[ ई ] जर वस्तुवाचक अथवा प्राणिवाचक सामान्य

नाम कर्म असलें तर बहुधा कर्मणिप्रयोग योजितात; जसें–'त्याणें हवेली बांधिली,' 'त्याणें एक सुंदर पशु पाहिला;' परंतु सर्वनाम किंवा मनुष्यवाचक विशेषनाम जर कर्म असलें, तर बहुधा निरंतर भावीप्रयोग योजितात; उदाह०–'तिणें त्याला शिकविलें,' 'गोपाळानें खंडूला बोलाविलें'.

'रमानें विष्णु आराधिला,' 'पार्वतीनें शिव प्रार्थिला,' अशीं या नियमास विरुद्ध उदाहरणें कोठें कोठें आढळतात; परंतु हीं काव्यांतच शोभतात, व्यवहारी लिहिण्यांत अथवा भाषणांत–'विष्णूस आराधिलें,' 'शिवास प्रार्थिलें,' अशीं द्वितीयान्तच रूपें असलीं पाहिजेत.

६४७ **उमज** धातूचा गण वर्जून असें या नियमाच्या आरंभीं ह्मटल्या वरून त्या धातूंच्या गणांतील सर्व धातूंचा अकर्मक धातू प्रमाणें भूतकाळीं कर्तरिप्रयोग होतो, असें एथें समजलें पाहिजे. हें मागें प्रयोगविचारांत विशद करून दाखविलें आहे (पहा–पृ० १७२, नि० ४२३). उदाह०–'मीं जेवलों,' 'ती शिकली,' 'तो पढला,' इ०. एथें कर्माची सत्ता असली तरीं कर्तरिप्रयोगच होतो; पहा—'मीं भात जेवलों,' 'तूं पक्कान्नें जेवलास,' 'ती धडा शिकली,' 'ते त्या श्लोकाचा अर्थ उमजले,' इ०.

'मीं तोंड धुतलों,' 'तो अंग धुतला,' 'ती स्नान केली,' अशी कोंकणस्थांत बोलण्याची रूढि आहे; परंतु अशा ठिकाणीं—'मीं तोंड धुतलें,' 'त्याणें अंग धुतलें,' 'तिणें स्नान केलें,' असा कर्मणिप्रयोग करावा हेंच शुद्ध; कांकीं धू धातूचा इतर सर्वत्र भूतकाळीं कर्मणिप्रयोग होतो; जसें—'मीं पाय धुतले,' 'मीं धोत्र

धुतलें,' 'घोडा धुतला' इ०; मग-अंग, तोंड, स्नान, इ० थोडकेच शब्द असतां हा अपवाद कशास पाहिजे.

### नियम ९.

६४८ जर एका क्रियापदास अनेक कर्ते असले, तर शेवटचा जो कर्ता त्याच्या लिंगवचना वरून तें क्रियापद फिरतें; उदाह०-'हा आणि तो गेला.' 'तुझा तो आणि त्या बाया हंसल्या,' 'हा हत्ती आणि तुमचे घोडे तेथें गेले असते तर बरें होतें,' इ०.

### नियम १०.

६४९ जर एका क्रियेस अनेक कर्मे असून कर्मणि-प्रयोग होत असला, तर शेवटच्या कर्माचा अधिकार क्रियापदा वर असतो; जसें—'तुह्मीं आपले कागद, लेखण्या, चाकू, आणि रेखाटणी, कोठें मांडिली,' 'त्यांहीं आपले घोडे, रथ, उंट, गाड्या, शिपायांच्या स्वाधीन केल्या,' 'त्या रंगाऱ्यानें माझी पागोटी, व चार शेले रंगविले,' इ०.

### नियम ११.

६५० कोणतेंहि क्रियापद ह्मटलें ह्मणजे त्यास कर्ता पाहिजे, मग तो कर्ता त्या वाक्यांत प्रत्यक्ष असो, किंवा अध्याहृत असो उदाह०-'रामा काल गोपाळा कडे गेला होता, परंतु त्याचा सन्मान केला नाहीं,' या वाक्यांत **केला नाहीं** या क्रियेस कर्ता नाहीं, ह्मणोन हें वाक्य अशुद्ध होय; यांत—'परंतु त्यानें त्याचा सन्मान इ० केला नाहीं,' असें असलें पाहिजे.

### नियम १२.

६५१ मराठींत कोठें कोठें क्रियापदाचा अध्याहार

करितात; उदाह०—'कोश ह्मणजे शब्दसंग्रहाचें पुस्तक,' यांत **आहे** किंवा **होय** हें क्रियापद अध्याहृत आहे. जेथें एकाद्या गोष्टीचें सामान्यतः विधान कर्तव्य आहे, ह्मणजें एकाद्या क्रियेच्या कर्तृत्वाचें आरोपण निश्चयपूर्वक अमुक्यां वरच करितां येत नाहीं, तो कर्तृत्वरूप अर्थ, सामान्येंकरून ज्यांच्या ज्यांच्या ठायीं तत्तत्क्रियासंपादकशक्तीची संभावना असत्ये, त्यांच्या त्यांच्या ठायीं आरोपित केला असतां संभवतो, तेथें कर्त्याचा अध्याहार करावा लागतो. उदाह०—'ओल्या जमिनी वर **निजलें** तर लागलेंच अंग धरतें,' 'पुष्कळ **पढलें**, आणि मोठमोठे ग्रंथ **पाहिले**, पण जर सारासारविवेचक बुद्धि **नसली**, तर तें सर्व निष्फळ,' 'लोकांचे गुण नघेतां दोष **पहावे** हा दुष्टांचा स्वभाव,' 'या गांवांत सर्व पदार्थ तोलून **विकतात**,' 'पूर्वीं शंभर वर्षां वर **लिहित होते** खरे, परंतु आतां जसें डौलदार अक्षर **काढितात** तसें तेव्हां कोणास काढितां येत नसे.' या सर्व उदाहरणांत जितकीं क्रियापदें मोठ्या अक्षरांत दिसतात तितक्यांचे कर्ते अध्याहृत जाणावे.

या भाषेंत असा हा कर्तृपदाचा अध्याहार केल्यानें बहुधा कर्मकर्तरिप्रयोगाचें कार्य साधतें. तें प्रकरण पहा. त्यांत या विषया वर विस्तारपूर्वक उपपादन केलें आहे.

## नियम १३.

६५२ जर एका क्रियेचे अनेक पुरुषवाचक सर्वनामें कर्ते असले, तर शेवटचें जें सर्वनाम, त्याच्या पुरुषलिंग वचनाच्या अनुरोधानें पुढल्या क्रियेचें रूप फिरतें; जसें—'मी, तूं, आणि तो गेला', 'तो, तुह्मी, आणि त्या, तेथें हो-

त्या,' 'तूं, ती, आणि मीं जातों,' 'तो आणि तूं गेलास तर माझें काम होईल,' इ०.

### नियम १४.

६९३ जर एका वाक्यांत प्रथम, द्वितीय आणि तृतीय पुरुष, अथवा प्रथम आणि द्वितीय पुरुष, कर्ते असले, तर आज्ञाकाळीं क्रियापदाचें रूप प्रथम पुरुषीं असलें पाहिजे; जसें—'मीं, तूं, आणि तो, तेथें जाऊं,' 'तूं आणि मीं तें काम करूं.' जर द्वितीय आणि तृतीय असे दोन पुरुष कर्ते असले, तर क्रियेचें रूप द्वितीय पुरुषीं असलें पाहिजे; जसें–'तूं आणि ती जा,' 'तुह्मीं आणि त्या हें घ्या,' इ०.

परंतु अशा प्रसंगीं क्रियापदास अनुकूल जो पुरुष असेल तो याच्या जवळ आणावा हें बरें.

### नियम १५.

६९४ जर–**राजश्री, महाराज, साहेब, सरकार,** इ०. बहुमानवाचक शब्द द्वितीय पुरुषीं असले, तर त्यांचें क्रियापद तृतीय पुरुषीं अनेकवचनीं असलें पाहिजे, अशी बहुधा रूढि पडून गेली आहे; जसें–सरकार जसा हुकूम करतील तसें करायास मीं तयार आहें,' 'राजश्री तेथें गेले होते मग कार्य झालें!' क्वचित्—'राजश्री तेथें गेलां होतां,' असाहि प्रयोग आढळतो; 'कालच मीं महाराजांस विनंति केली, कीं महाराज जसें सांगतील त्या बाहेर मीं वागणार नाहीं,'इ०.

### नियम १६.

६९५ स्त्रियांस अत्यादरपूर्वक बोलावयाचें असतां तृतीय पुरुषीं नपुंसकाच्या अनेकवचनाचीं रूपें योजिलीं पाहिसेत. उदाह०—'ती बाई तेथें गेलीं,'• 'माईसाहेब

काळच आलीं असतीं,' इ०. कोठें 'त्या बाई गेल्या,' 'माईसाहेब आल्या असत्या' असाहि प्रयोग आढळतो.

## नियम १७.

. ६९६ पदार्थांची जात, समुदाय, किंवा अतिशयपणा, दाखवायाचा असतां बहुधा एकवचनाचा प्रयोग होतो; उदाह०—'पुढल्या साली हरबरा फार सस्ता होईल,' 'शिवाजीच्या स्वारी बरोबर दहा हजार घोडा निघत असे,' 'यंदा यात्रेस हजारों माणस लोटलें होतें, इ०.

## नियम १८.

६९७ द्रवरूप पदार्थ, आणि धातु इ० पदार्थ, जातिस्थानपरत्वें भिन्न भिन्न प्रकारचे असल्यास, त्यांस क्वचित् अनेकवचनींही बोलतात, उदाह०—'बाजारांत दोन चार प्रकारचीं तुपें आलीं आहेत,' 'यंदा तीळ पिकल्या नाहीं, व नारळाचाहि नाश झाला, ह्मणोन तिळेल, खोबरेल, हीं तेलें महाग होतील;' 'बाजारांत दोन तीन दराचीं सोनीं आहेत,' असेंहि कोणी क्वचित् बोलतात.

## नियम १९.

६९८ जर अनेक नामांस एकच विभक्ति लावायाची आहे, तर ती त्या सर्वांस पृथक् पृथक् लावावी हें बरें; जर असें नकलें, तर त्यांच्या शेवटीं हा या सर्वनामाची योजना करून त्यास लावावी; जसें—' तुह्मीं जेवूं नका' पण सुपारीस, पानास, आणि नारळास तर चिंता नाहीं,' 'रामा, गोपाळा, यांस धरून आण,' कृष्णी, वेणू, आणि साळू, यांची ही खेळायाची बाहुली आहे,' 'मुंबई, दिल्ही, मद्रास, यांहून कलकत्ता शहर मोठें आहे.'

(अ) त्या नामांची जरी प्रथमा विभक्ति असली तरी त्या पुढें **हा** अथवा **असा** या सर्वनामांचा प्रयोग

करितात; जसें—'रामा, गोपाळा, आणि दाजी, हे अ०
असे तेथें गेले,' 'हत्ती, घोडे, व बैल, यांस चारा नाहीं.'

( आ ) जो वर विभक्ती विषयीं नियम सांगितला
तोच शब्दयोगी अव्ययां विषयींहि लागू पडतो; जसें—
'रामा, सखी, गोपाळा, आणि मनी, यां पेक्षां लक्षुमण
आणि शिवराम यांज वर बापाची प्रीति अधिक आहे,'
'घोडा, बैल, गाढव, या तिघां वर जितकें ओझें लादावें
तितकें एक उंट वेतें.'

( इ ) जर एकादें नाम फारसें प्रसिद्ध नसलें, अथ-
वा फार लांब असलें, तर मराठी भाषेंत त्यास विभक्ति
अथवा शब्दयोगी अव्यय नलावितां त्याज पुढें **हा** या
सर्वनामाची योजना करितात; तेव्हां त्याचें लिंगवचन,
पुढें जर जातिवाचक शब्द असला, तर त्याच्या अनु-
रोधानें असतें; जसें 'महम्मद जलालुद्दीन याणें त्या-
काळीं फौजेस कुमक केली,' 'क्रिस्टाफर कोलंबस या
कडून अमेरिका खंडाचा शोध लागला,' 'सेंटपीटर्स्बर्ग
ही रूस देशाची राजधानी,' 'औरंगजेब हा शहाजहान
बादशाह याचा पुत्र,' 'द्रौपदी ही द्रुपदाची कन्या,' इ०.

प्रथमा विभक्ति असतां **हा** याचा प्रयोग केवळ स्वे-
च्छे वर आहे; जसें—'रामा माझा चाकर,' अ० 'रामा
**हा** माझा चाकर,' 'माझी मुलगी सगुणा तेथें होती,'
अ०, 'माझी मुलगी सगुणा ही तेथें होती,' 'माझा चाकर
रामा मोठा विश्वासु आहे,' अ०, 'माझा चाकर रामा
हा मोठा विश्वासु आहे.'

( ई ) स्थलवाचक शब्दास पंचमी आणि सप्तमी वि-
भक्ति नलावितां क्वचित् त्या पुढें **एथून, एथें,** या अ-
व्ययांचा प्रयोग करितात; जसें—'तो कोरेगांव एथून

निघून झांसीस गेला,' 'नंतर तो हिंदुस्तान एथें जाण्यास निघाला,' इ०.

## नियम २०.

६५९ ज्या नामाशीं अथवा सर्वनामाशीं शब्दयोगी अव्ययाचा अन्वय असतो, त्या नामाचें अथवा सर्वनामाचें, त्या शब्दयोगी अव्ययाच्या योगानें सामान्यरूप होतें; जसें—झाडा खालीं, डोंगरा वर, त्या पुढें इ०.

जर दोन तीन नामां पुढें शब्दयोगी अव्यय लावायाचें असलें, तर त्यांचीं निरनिराळीं सामान्यरूपें नकरितां पुढें **हा** किंवा **असा** या सर्वनामाचा योग करून त्याच्या सामान्यरूपा पुढें तें अव्यय लिहावें; जसें—'त्याणें बैल, घोडा, उंट, **यां** वर ओझें लादलें,' 'चोर, चहाड, लबाड, व्यसनी, **अशां** बराबर व्यवहार ठेवूं नये.'

## नियम २१.

६६० नामाचें, विशेषणाचें, आणि विशेषणरूप सर्वनामादि शब्दांचें, जें सामान्यरूप व्हावयाचें, तें पुढल्या शब्दयोगी अव्ययाच्या योगानें, अथवा सविभक्तिक, सशब्दयोगिक, आणि सामान्यरूपी अशा विकृत विशेष्याच्या योगानें होतें; जसें—**घरा** पुढें, **गांवा** समोर, **तुझ्या** कडे; उ०—'**एका** शिपायानें **दोघां** मनुष्यांस धरिलें;' '**शहाण्या** पुत्रा वर **चांगल्या** बापाची प्रीति असत्ये,' '**भल्या** स्त्रियेनें द्वाड स्त्रियांच्या वाऱ्यासहि उभें राहूं नये,' '**माझ्या फडताळाच्या समोरच्या कोनाड्यांतल्या बटव्या** मध्यें पुडी आहे ती आण.'

आकारान्त विशेषणासच सामान्यरूप असतें, या विषयीं पहा—पृ० १४३, नि० ३४९ वा.

*हें पूर्वोक्त विशेषण वाक्यांत कितीहि दूर असलें

तथापि त्याचें विशेष्य जर वर सांगितल्या प्रमाणें विकृत होण्यास प्रवण आहे, तर त्याचें सामान्यरूपच असलें पाहिजे; जसें—'त्या परमप्रतापी, शौर्यौदार्याद्यनेकगुणयुक्त, परमदेदीप्यमान, **अशा** अवंतीच्या **राजपुत्रानें**,' इ०.

आकारान्त विशेषणाचीं रूपें विशेष्याच्या योगानें दोन प्रकारचीं विकृत होतात; कोणी **बऱ्या** मनुष्यानें ह्मणतात, कोणी **बरे** मनुष्यांनें ह्मणतात; कोणी **भल्या** बायकोस ह्मणतात, कोणी **भले** बायकोस ह्मणतात; परंतु केवळ व्याकरणरीतीनें पाहिलें तर **बरा, भला,** इत्यादि आकारान्त विशेषणाचीं सामान्यरूपें **बऱ्या, भल्या,** अशींच होतात. ह्मणोन विशेष्याच्या नियमावर कांहीं धोरण न ठेवितां हीं विभक्तिसामान्यरूपें योजावीं हें बरें. या विषयीं विस्तारपूर्वक उपपादन केलें आहे तें पहावें—पृ० १४३, नि० ३५० वा. वर सांगितलें या वरून पदांतसामान्य रूपाचा नियम असाच समजावा.

## नियम २२.

६६१ क्रियेचा शक्यभेद असतां कर्त्ता सविकरणतृतीयान्त असावा; अथवा, चतुर्थ्यन्त असावा, जसें—'**माझ्यानें** अ० **मला** तें काम करवत नाहीं,' '**तुझ्यानें** अ० **तुला** तेथें जाववतें,' 'आमच्यानें अ० **आह्मांला** तितकी दक्षिणा देववती असती तर आह्मांहि दिली असती,' '**देवादिकांच्यांनीं** जें आलें नाहीं, तें तुह्मां **मनुष्यांच्यांनीं** कसें करवेल,' इ०. [ हा नियम वादास्पद असून माझ्या मतें निरसनीय आहे, पहा पृ० १६९, नि० ४१०.]

हें स्थळ मोठें वादाचें आहे. 'माझ्यानें अथवा मला तें काम करवत नाहीं,' इत्यादि वाक्यांत **माझ्यानें** आणि **मला** हा कर्ता, **काम** हें कर्म, आणि **करवत नाहीं**, हें सकर्मक क्रियापद मानून सर्वत्र सर्व निर्वाह करितात; व असा निर्वाह करण्यास

कांहींसा संस्कृत भाषेचा आधारहि आहे असें मानितात. तथापि भाषेच्या रहस्या वर दृष्टि देऊन पाहिलें असतां, अथवा अर्थाचा सूक्ष्म विचार केला असतां, माझ्या विचारास हें मत प्रशस्त दिसत नाहीं. माझ्या बुद्धीस असें येतें कीं, क्रियेस शक्यभेदाच्या रूपांत आणिलें ह्मणजे तिच्या ठायीं अकर्मकत्वाची उपलब्धि होत्येः—'माझ्यानें अ० मला तें काम करवत नाहीं,' एथें सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां **काम** हा कर्ता, आणि **करवत नाहीं** हें क्रियापद होय; **माझ्यानें** ही कर्तरितृतीया नव्हे. यास या भाषेचा निबंधच मोठें प्रमाण आहे; पहा; इतर सर्व ठिकाणीं कर्तरितृतीया असतां **म्यां, त्वां, त्यानें,** अशीं तृतीयेचीं नियमित रूपें होतात; आणि हा शक्यरूप भेद होतांच **माझ्यानें, तुझ्यानें, त्याच्यानें, देवादिकांच्यांनीं,** इ० अशीं सविकरण-तृतीयेचीं रूपें, ज्यांचा इतर प्रसंगीं कधींहि प्रयोग होत नाहीं, तीं या अवसरीं अपरिचित आगंतुका सारखीं येऊन बसतात. जर **करवतें** इ० शक्यभेदाच्या रूपाचा **मीं** हाच वस्तुतः कर्त्ता असता, तर जसें-'म्यां केलें' 'त्वां देवविलें' इ० सकर्मक क्रिया असतां **म्यां, त्वां,** इ० तृतीयेचीं नियमित रूपें प्रयोजिलीं जातात, तशीं तींच शक्यभेदीं सकर्मक क्रियापद असतां कां जात नाहींत? म्हणजे '**म्यां** तें काम **करवलें,**' '**त्याणें** तें पुस्तक **लिहववलें** असें कां होत नाहीं? तेव्हां **म्यां** च्या स्थानीं ज्यापेक्षां **माझ्यानें** असें विलक्षण रूप होतें, अथवा **मला** असें चतुर्थीचें रूप होतें, त्यापेक्षां मराठी भाषेच्या मतें **माझ्यानें** हा कर्त्ता नव्हे, असें स्पष्ट दिसतें. आणखी, जितकीं शक्यभेदाच्या रूपांत आणिलेलीं क्रियापदें तित-क्यांच्या वर्त्तमान काळाचीं आणि भविष्य काळाचीं रूपें अकर्मक क्रियापदांच्या नियमास अनुसरून असतात; हें एक शक्यभेदीं क्रियापद अकर्मक असतें यास मोठें प्रमाण होय. जसें-'त्या-च्यानें तें काम **करवितें** अथवा **करवील,**' अशी इतर सकर्मक

धातूंच्या नियमां प्रमाणें रूपें होत नाहींत; परंतु अकर्मक धातूच्या नियमां प्रमाणें- 'त्याच्यानें तें काम **करवतें**, अथवा **करवेल,**' अशीं रूपें होतात. 'माझ्यानें तें काम करवतें,' म्हणजे, 'मीं जो त्या मद्द्वारा, अथवा, साधनरूप जो मीं त्या मज करवीं, तें काम करवतें म्हणजे केलें जातें' असा, या वाक्याचा अर्थ होतो; म्हणोन माझ्या विचारास असें येतें कीं, **'माझ्यानें** अ० **मला** तें काम करवतें' इ० वाक्यांत **माझ्यानें** त्यास करणी तृतीया करून, अथवा **मला** ही चतुर्थी करून, **काम** हें या वाक्यांत **करवतें** या क्रियापदाचा कर्ता मानावें; तसेंच.- 'माझ्यानें अ० मला धांववतें,' इ० मूळच्या अकर्मकधातूं वरून शक्य भेदाच्या रूपाचा प्रयोग असतां त्यास भावकर्तरिक्रियापद मानावें, हें बरें दिसतें.

परंतु ज्या पेक्षां हें केवळ नवीन मत होय, आणि आज पवेतों सर्वत्र 'माझ्यानें अ० मला तें काम करवतें' इ० स्थळीं **माझ्यानें** अ० **मला** यास कर्ता मानून **काम** हें **करवतें** या क्रियापदाचें कर्म मानण्याचा परिपाठ पडला आहे, व 'मया तत्कार्यं क्रियते, इ० संस्कृत वाक्यास अनुसरून हें वाक्य आहे असें सर्व आतून सूक्ष्म विचार न करितां मानितात, [ कारण, संस्कृतांत **मया** या तृतीयान्त रूपास **माझ्यानें** अशा सारखा कांहीं नवा विकार झाल्याचें दिसत नाहीं, ] त्यापेक्षां एथें मला विशेष आडवें येतां कामा नये. परंतु मी आपलें मत वर स्पष्ट उपपादून दाखविलें आहे.

## नियम २१.

६६२ **लाप्रत्ययान्त** भूतकालवाचक क्रियापदां पुढें **तोंच** हा सावधारण शब्द असतां, लाप्रत्ययाचा लोप होतो, आणि **तों** या अव्ययास **तां** आदेश होतो; असें—'धन्यानें हाक **मारतांच** चाकर उठला,' 'एकानें

आंब्यास हात **लावतांच** त्या वर सर्वांची उडी पडली,' 'त्याणें पिश्वींत हात **घालतांच** त्यास मोहोर सांपडली,' 'राजानें आज्ञा **करतांच** सर्व धांवले,' इ०.

हें स्थळ मोठें विचारणीय आहे. हीं जीं वर उदाहरणें सांगितलीं त्यां विषयीं जर चांगला खोल विचार नकेला तर त्यांतील **मारतां, लावतां, घालतां, करतां,** हीं प्रथमदर्शनीं **तां**-प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधितें अशीं दिसतात; परंतु अमळ विचार केला असतां लागलेंच ध्यानास येतें कीं हीं या प्रकारचीं धातुसाधितें नव्हत; जर हीं वर्तमानकालवाचक धातुसाधितें म्हणावीं, तर **यांस** तृतीयान्त कर्ता आहे; व यांपासून वर्तमानकालाचाही स्पष्ट बोध होत नाहीं; यांपासून भूतकाल ध्वनित होतो; आतां जर भूतकालवाचक क्रियापदें मानावीं, तर **तां**प्रत्ययान्त धातुसाधितें कदापि भूतकालवाचक असत नाहींत; तेव्हां ही दुर्निवार अडचण येऊन पडत्ये; इच्या दूरीकरणास वर जो नियम सांगितला त्या शिवाय दुसरी सयुक्तिक कल्पना मला दिसत नाहीं. 'धन्यानें हाक **मारतांच,**' 'एकानें आंब्यास हात **लावतांच,**' 'त्याणें पिश्वींत हात **घालतांच**' राजानें आज्ञा **करतांच,**' म्हणजे–हाक **मारिली तोंच**; हात **लावला तोंच**; हात **घातला तोंच**; आज्ञा **केली तोंच**; यांत **तोंच** या सावधारण शब्दाच्या योगानें– **मारली, लावला,** यांतील **ला** प्रत्ययाचा लोप होऊन **मार, लाव,** हीं रूपें अवशिष्ट राहिलीं, आणि **तोंच** यांतील **तों**च्या स्थानीं **तां** आदेश होऊन–**मारतांच, लावतांच,** अशीं रूपें झालीं आहेत असें दिसतें. **घालतांच, करतांच,** यांतहि हाच नियम उमगतो; पहा,– **तोंच** याच्या योगानें **घातला, केली,** यांतल्या **ला**प्रत्ययाचा लोप झाला असतां तन्निमित्त जे **घाल, कर,** या धातूंस **घात, के,** एतदादेशरूप कार्य, त्याचाहि नाश होऊन–**घाल, कर,** हीं जीं मूळचीं रूपें तींच राहिलीं; कारण–निमित्ताभावे नैमित्तिकस्याप्य-

भाव:-ह्मणजे निमित्ताचा नाश झाला असतां नैमित्तिक कार्या-चाहि नाश होतो, असा न्याय आहे; तेव्हां-**घाल**, **कर**, अशीं मूळचीं अंगें अवशिष्ट राहून-**घालतांच**, **करतांच**, अशीं रूपें झालीं असें समजावें.

या खेपेस या नियमा वर आणखी विचार केल्यानें मला असें दिसून येतें कीं-**मारतांच**, **लावतांच**, **घालतांच**, **करतांच**, हीं मूळचीं **मारी तोंच**, **लावी तोंच**, **घाली तोंच**, **करी तोंच**, या दोन्ही पदांचीं संक्षिप्त रूपें होत. **मारी**, **लावी**, **घाली**, **करी**, इ० हीं ग्रंथभाषेंतलीं भूतकाळाचीं रूपें जाणावीं. **मारतांच**, म्ह० मारी इतक्यांत, मारी त्याच क्षणीं, इ० असा अर्थ करावा, परंतु असें मानल्यावर 'धन्यानें हाक मारताच चाकर उठला,' इत्यादि स्थळीं धन्यानें इ० तृतीयान्त कर्ता न करितां प्रथमांत कर्ता केला पाहिजे. म्हणजे 'धनी हाक मारितांच चाकर उठला,' असा बोलण्याचा व लिहिण्याचा शुद्ध प्रघात घातला पाहिजे. तो घातल्या वर अशाच बोलण्याची, व लिहिण्याची रूढि जेव्हां पडून जाईल, तेव्हां वरल्या कलमांत दर्शविल्या कल्पनेची विशेष अपेक्षा राहणार नाहीं.

परंतु सांप्रत अशा स्थळीं तृतीयान्त कर्ता विशेषेंकरून आढळतो, ह्मणोन हा इतका पाल्हाळ करण्याचें अगत्य पडलें असें वाचकांनीं समजलें पाहिजे.

## नियम २४.

६६३ समासघटित शब्दांत, मध्येंच उभयान्वयी अव्ययें आणून, त्यांतील एका पदाचा अन्वय, या अव्ययानें निराळीं पडलीं जीं पदें अ० शब्द, त्यांशीं लावूं नये; जसें—'**सन्मार्ग**, आणि **सद्धर्मप्रवर्तक** जे आचार्य,' हा वाक्यांश—'**सन्मार्गसद्धर्मप्रवर्तक** जे आचार्य,' अथवा,—**सन्मार्गप्रवर्तक** आणि **सद्धर्म**-

**वर्तक** जे आचार्य,' असा पाहिजे; अथवा—'सन्मार्ग आणि सद्धर्म यांचे प्रवर्तक जे आचार्य,' असा पाहिजे; कारण, मूळच्या वाक्यांत **आणि** हें उभयान्वयी अव्यय मध्यें आल्या मुळें **सद्धर्मप्रवर्तक** या समासघटित शब्दांतील **प्रवर्तक** या पदाचा अन्वय मागल्या **सन्मार्ग** या शब्दाशीं होत नाहीं.

[ अ ] **ज्ञापक, वाचक, बोधक, सूचक, दर्शक, विशिष्ट, पूर्वक,** इत्यादि प्रकारचे शब्द, वाक्यांत अनेक शब्दांस जोडायाचे असतां सर्वांस पृथक् पृथक् नजोडितां, अथवा, उभयान्वयी अव्यय मध्यें आणून शेवटल्या शब्दास नजोडितां, त्या सर्व शब्दांच्या पुढें **हा** किं० **असा** या सर्वनामाचा योग करून, त्या शब्दांतून जी ज्यास अनुकूल विभक्ति असेल तींत तें सर्वनाम आणून, त्याशीं हे शब्द जोडावे, हा उत्तम पक्ष. समयविशेषीं जर ते दोन शब्द असले तर यांतून एकेका शब्दाशीं हे शब्द पृथक् पृथक् जोडिले असतां, अथवा, ते एका योग्यतेचे प्रौढ संस्कृत शब्द दोहों पेक्षां अधिक असले तरी त्यांस समासांत आणून मग त्यांशीं हे शब्द जोडिले असतां, चिंता नाहीं; परंतु तिहीं पेक्षां अधिक शब्द असतां वर नियम सांगितला तोच चालवावा हें उत्तम. उदाह०—'**संबंध** अथवा **अधिकरणवाचक**,' अशी योजना करूं नये;—'**संबंधवाचक** अथवा **अधिकरणवाचक**,' अशी योजना करावी, ' अथवा **संबंध** अथवा **अधिकरण यांचे वाचक**,' अशी योजना करावी. मध्यें पक्षांतरबोधक अव्यय नसून समुच्चयार्थक असल्यास—'**संबंधाधिकरणवाचक** अशीहि योजना करावी. परंतु पहिल्या उदाहरणांत जी योजना दाखविली ती केवळ अशुद्ध जा-

णावी. तसेंच—'काम, क्रोध, मोह, आणि मत्सरप्रेरित जीं जीं कर्मे,' ही योजना अशुद्ध जाणावी. '**कामक्रोधमोहमत्सरप्रेरित** जीं जीं कर्मे,' अशी योजना असावी; अथवा,—'**काम, क्रोध, मोह,** आणि **मत्सर, यांनीं प्रेरित** जीं जीं कर्मे,' अशी शुद्ध मराठी योजना असावी. 'सौजन्य, सौंदर्य, सरलता, किंवा नम्रताविशिष्ट पुरुष कोणत्याहि कुळांत जन्मलेला असला, तथापि तो प्रीतीस पात्र होतो,' ही शब्दयोजना अशुद्ध जाणावी. '**सौजन्य, सौंदर्य, सरलता,** किंवा **नम्रता, येणेंकरूनविशिष्ट** पुरुष इ०,' अथवा,—'**सौजन्य, सौंदर्य, सरलता,** किंवा **नम्रता,** यांतून कोणत्याही **गुणानें विशिष्ट** पुरुष इ०,' अशी पदयोजना असावी. 'आदर, स्नेह, आणि नम्रतापूर्वक जें भाषण,' अशी योजना असूं नये;—'आदर, स्नेह, आणि **नम्रता, एतत्पूर्वक** जें भाषण,' अथवा, '**आदरस्नेहनम्रतापूर्वक** जें भाषण,' अशी योजना असावी.

नियम २९.

६६४ **रूढींत** असल्या शिवाय बहुधा प्राकृत आणि संस्कृत शब्दांचा परस्परांशीं समास करूं नये; 'घरप्रवेश,' 'गांवप्रदक्षिणा,' 'हत्तीचर्म,' 'टोळउंदीरअग्निउपद्रव,' 'श्यामरक्तरंग,' 'आम्लकडूखारटऔषध,' 'ढालतरवारबंदूकबाणादि शस्त्रें,' इ० असा संस्कृत आणि प्राकृत शब्दांचा विजातीय संकर कदापि करूं नये; हे शब्द—गृहप्रवेश;' 'ग्रामप्रदक्षिणा;' 'हस्तिचर्म,' अ० 'गजचर्म;' '**टोळ,** उंदीर, अग्नि, यांचा उपद्रव,' अ०, 'शलभमूषकाग्न्युपद्रव;' काळा आणि तांबडा रंग,' अ०, 'श्यामरक्तवर्ण;' 'आंबट, कडू, आणि खारट असें औ-

षध,' अ०, 'आम्लकटुक्षारौषध;' 'ढाल, तरवार, बंदूक, बाण, आदिकरून शस्त्रें;'–असे असले पाहिजेत.

**राज्यकारभार, बायकोमनुष्य, बापजन्मीं, गांवदेवी, पायमार्ग, मालधनी, राजदरबार, राजवाडा, अंगमर्दाई**, इत्यादिनेक शब्द रूढींत आल्यामुळें त्या वर आतां दुःसह विजातीयसंकरत्वाची छाया मारत नाहीं. हे, आणि यांच्या कोटींतले शनैःशः आणखी शब्द, आतां कर्णास सुसह झाले आहेत; ह्मणोन वरल्या नियमांत जो निषेध सांगितला आहे तो असा रूढींत आलेल्या शब्दां विषयीं लागू होत नाहीं.

## नियम २६.

६६५ वाक्यांत शब्दांची मागें पुढें योजना करायाची ती ज्या ज्या शब्दांशीं ज्या ज्या शब्दांचे यथार्थ अन्वय ह्मणजे संबंध असतात, त्या त्या प्रमाणें करावी; ह्मणजे, पूर्ण अथवा मुख्य वाक्यांत प्रथम कर्ता, त्या पुढें जर कर्म असलें तर कर्म, आणि शेवटीं क्रियापद, असा अनुक्रम असावा. उदाहरणें–'रामा चालतो,' या पूर्ण वाक्यांत **रामा** हें कर्तृपद पहिलें येतें, आणि त्याच्या पुढें त्याचें क्रियापद. 'गणू पोथी लिहितो,' यांत **गणू** हा कर्त्ता, **पोथी** हें कर्म, आणि **लिहितो** हें क्रियापद. 'गोदेनें आपली साडी नदी वर धुवायास नेली,' या वाक्यांतहि असाच कर्ता, कर्म, आणि क्रियापद, यांचा अनुक्रम आहे, ह्मणजे **गोदेनें** हा प्रथम कर्ता, त्याच्या पुढें **साडी** हें कर्म, आणि शेवटीं **नेली** हें भूतकालवाचक क्रियापद. 'माझ्या शेजाऱ्याचा मुलगा रामा उद्यां मला वाळुकेश्वरीं यात्रेंत खेळ घेऊन देईल,' यांतहि तसाच अनुक्रम जाणावा.

[ अ ] आतां कोठें बोलणाराच्या मनांत ज्या शब्दा वर नेट देऊन बोलायाचें असतें तेथें तो आपला सावधारण शब्द पहिला आणितो; परंतु तसा आणिल्यानें तो बोलणारा आपल्या मनांतील दुसरा गूढार्थ स्पष्ट न बोलतां कळवितो. उदाह०—'पोथी गणू लिहितो.' या वाक्यांत कर्मवाचक **पोथी** हा शब्द पहिला उच्चारल्यानें पोथी शिवाय दुसरीं कर्मे दुसरा कोणी करितो, ह्मणजे 'रामा पत्र लिहितो,' अथवा 'पत्रावळी लावितो,' असा अर्थ ध्वनित होतो. 'आपली साडी नदी वर धुयास गोदेनें नेली,' असें ह्मटलें असतां—'तूं आपली साडी अथवा लुगडें जेथें धुवायाचें असेल तेथें धु, अथवा हवें तसें कर,' असा बोलणाराच्या ह्मणण्याचा कल दिसून येतो.

## नियम २७.

६६६ विशेषण अथवा विशेषणरूप ह्मणजे कोणत्याहि गुणाचे अथवा प्रकाराचे वाचक जे शब्द ते त्यांच्याच विशेष्यांच्या मागें असावेत; ह्मणजे विशेषण पहिलें, आणि त्याचें विशेष्य त्याच्या पुढें, असा अनुक्रम वाक्यांत असावा. उदाहरणें—'तो पांढरें पागोटें वापरितो,' 'ती काल काळी चंद्रकाळा नेसली होती,' 'मी उद्यां आपल्या अरबी घोड्या वर बसेन,' 'अशा विद्वान् मनुष्यानें जर त्या नव्या शाळेचें काम आरंभानें चालविलें, तर विद्यार्थी लौकर तयार होतील,' या सार्‍या वाक्यांत गुणवाचक शब्द पहिले येऊन त्यां मागून त्यांचीं विशेष्यें आलीं आहेत.

[ अ ] जेव्हां त्या त्या गुणांचें विधान करायाचें असतें, ह्मणजे त्या त्या गुणाच्या संबंधीच कांहीं विशेषकरून सांगायाचें असतें, तेव्हां विशेषण विशेष्य

यांचा उलटा क्रम होतो, ह्मणजे पहिलें विशेष्य आणि मागून त्याचें विशेषण येतें. उदाह०—'त्या मुलाची टोपी आज लाल होती,' एथें वक्त्याच्या मनांत टोपीचा लालपणा मुख्यत्वें सांगायाचा आहे, असें दिसतें; तसेंच—'तो घोडा अरबी आहे,' 'ते आंबे दोन दिवसांनीं पिवळे जर्द होतील,' 'संन्याशांनीं आपलीं वस्त्रें भगवीं केलीं पाहिजेत,' इ० आणखी उदाहरणें.

## नियम २८.

६६७ वाक्यांत संबंधी सर्वनाम प्रथम येऊन तदनंतर त्याचें प्रतिसंबंधी जें दर्शक सर्वनाम असेल तें यावें. उदाहरणें—'**ज्याणें** मला काल मारिलें तो हा पोरगा आहे,' यांत **ज्याणें** हें संबंधी सर्वनाम पहिल्यानें येऊन मागून त्याचें प्रतिसंबंधी **त्याणें** हें दर्शक सर्वनाम आलें आहे. '**जी** पहावी **ती** दुभाळ गाई,' 'त्या रानांत जें पाखरूं पहाल तें बहुधा तुह्मांस काळें सांपडेल,' '**जो** याचक **जें जें जितकें** मागे **त्यास** तो उदार राजा **तें तें तितकें** देई,' 'जसें कर्म करावें **तसें** त्याचें फळ भोगावें,' इ०. आणखी उदाहरणें.

## नियम २९.

६६८ पूर्ण अथवा मुख्य वाक्यांत, आणि त्यांतील गौण वाक्यांत, अथवा वाक्यांगांत, धातुसाधितें अथवा क्रियाविशेषणें प्रथम येऊन, पुढें शेवटीं त्याच वाक्यांतलि अथवा गौण वाक्यांतलि मुख्य जें क्रियापद असेल तें यावें. उदाह०—'तो आतांच येऊन गेला,' यांत **आतांच हें येऊन** या पूर्वकालवाचक धातुसाधिताचें क्रियाविशेषण त्याच्या आगोदर येऊन, नंतर **येऊन हें**

धातुसाधित आल्यावर शेवटीं गेला हें मुख्य क्रियापद आलें. तसेंच--'तो गेला असल्यास मीहि जाईन,' 'त्याणें मला न कळवितां रामाच्या घरीं जाऊन आपलें पुस्तक त्यास नेऊन दिलें,' 'मी त्यास न सांगत असतां त्याणें आपलें पागोटें रंगवायास दिलें' इ० आणखी उदाहरणें.

## नियम ३०.

६६९ वक्त्याच्या अथवा लिहिणाराच्या मनांत एकादा शब्द वाक्यांतील शब्दांच्या संदर्भानें स्पष्टसमजायाजोगा असला, अथवा उघड रीतीनें तो बोलून दाखवायाचा नसला, तर त्या शब्दाचा तो अध्याहार करितो, ह्मणजे बोलून किंवा लिहून दाखवित नाहीं. उदाह०—'म्यां जेव्हां त्याच्या तोंडा वर लगावली, तेव्हां तो उगीच बसला;' अर्थात् एथें 'चपराक' हा शब्द समजाया जोगा असून बोलणाराच्या मनांत तो गुप्त ठेवायाचा आहे, ह्मणोन त्याणें त्याचा अध्याहार केला आहे. आणखी उदाहरणें—' तो प्याला आहे त्याशीं बोलूं नको,' ' त्याणें ह्याची त्या वेळेस भली काढली,' 'उलटी सुलटी केली,' 'गोड करून खावें, मऊ करून निजावें,' इ० या वाक्यांत सर्व कर्मवाचक नामांचा अध्याहार समजला पाहिजे.

समयास ह्मणी, उखाणे, अशा प्रकारच्या संक्षिप्त परंतु सर्वांच्या माहितीच्या अशा बोलण्यांत पुष्कळ शब्दांचा अध्याहार केला असतो, आणि अशा ह्मणींचे यथास्थित अर्थ लावायास पुष्कळ बाहेरचे शब्द आणावे लागतात तेव्हां ते बसतात. उदाह०—'गाईचे गेळीं आणि ह्मशीचे वेळीं दूध काढलें ह्मणजे बरें;'—एथें 'गाईचे गेळीं,' ह्मणजे गाई गोठ्यांत येतांच तिचे खुर पसरून त्यांचा गळ दिसत्ये त्या वेळीं, आणि, 'ह्मशीचे वेळीं' ह्मणजे तिचा

दूध काढण्याचा जो नेमलेला वेळ असतो त्या वेळीं, अशी बाहेरच्या शब्दांची पुरवणी केली पाहिजे, तेव्हांच अर्थ यथास्थित बसतो.

हे वर सांगितलेले सर्व नियम फार उपयोगी आहेत, यांज वर शिकणाराचें फार लक्ष असावें. या नियमांस आणखी गौणनियम व बाधकेंहि पुष्कळ आहेत, त्यांच्या विचारांत पडलें असतां ग्रंथविस्तार फार होईल, ह्मणोन या प्रसंगीं इतकेंच सांगतों कीं, आपल्या अभिप्रायानुरूप वाक्यरचना करण्याचें ज्यास अगत्य वाटत असेल, त्याणें या नियमां वर मुख्यत्वेंकरून लक्ष द्यावें.

याप्रमाणें वाक्यरचने संबंधी जे कित्येक मुख्य नियम प्रसंगीं सुचले त्यांचा म्यां एथें उपन्यास केला आहे.

## खंड ७.

### लेखनपद्धती.

६७० मराठी भाषेंत गद्यात्मक ग्रंथ लिहिण्याची विशेष प्रवृत्ति नव्हती. महाराष्ट्र देशांत जे जे ग्रंथकार आणि कवि झाले त्यानीं ओंव्या, श्लोक, आर्या, अभंग, पदें, सवाया, कटिबंध, साख्या, लावण्या, इत्याद्यनेक प्रकारचे छंद बांधून पद्यात्मक ग्रंथ पुष्कळ लिहून ठेविले आहेत. परंतु पूर्वोक्तप्रकारें ग्रंथ लिहिण्याची अलिकडेस नूतन प्रवृत्ति पडली आहे; आणि मागल्या चाळीस पन्नास वर्षांत जितके व्हावे तितके तर नाहींत, परंतु बरेच ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत, व पुढें उत्तरोत्तर अधिकाधिक होत जातील असा संभवहि होतो. ह्मणोन या ग्रंथाच्या शेवटीं लेखनपद्धती विषयीं कांहीं उपयुक्त नियम सांगणें आवश्यक आहे; कारण, मराठी लि-

हिण्यांत अद्यापि अव्यवस्था फार आढळत्ये; ती मोडून जाऊन सर्वांची लेखनपद्धति सारखी करण्या विषयीं प्रयत्न करणें फार इष्ट आहे.

१ पंक्तींत शब्द तोडून निरनिराळे लिहावे.

२ समासघटित शब्द एक जाणून एका पंक्तींत अव्यवहित असावे; ह्मणजे, ज्या शब्दांचा समास होतो ते पंक्तींत तोडून लिहूं नयेत; जसें—विटीदांडू, काळमांजर, तांबडमाती, भक्तवत्सल, सर्वगुणैकरत्नाकर, अखंडलक्ष्म्यलंकृतराजैश्वर्यविराजित, इ०.

३ विभक्त्यंत शब्दां प्रमाणें सामान्यरूपाहि तोडून निराळें लिहावें; जसें—बऱ्या मनुष्यानें, आदाच्या दाहळी वर, मज जवळ, त्या पुढें, मज पासून, तारां बाहेर इ०.

बहुधा सर्वत्र सामान्यरूप पुढल्या शब्दयोगी अव्ययाशीं जोडून लिहिण्याचा परिपाठ अद्यापि मोडत नाहीं हें येथें आश्चर्या सारखें मला दिसतें. परंतु या व्याकरणाच्या नियमानुरूप, संबोधना प्रमाणें सामान्यरूप हें एक विभक्तीचें नवें रूप मानिलें आहे, ह्मणोन त्यास हा नियम लागू असून, आणि वरील नियमास अनुसरावें हें बरें आहे. समासाचा आणि विशेषणाच्या सामान्यरूपा पासून शब्दयोगी अव्ययें, व अशीं सामान्यरूपें ज्या इतर **सारखें, उलट, सन्मुख,** इत्यादि कित्येक शब्दांच्या योगानें होतात असे शब्द, निराळे काढून ठेवणें इष्ट असून तसें लोक का करित नाहींत, याचें कारण मला अगदी समजत नाहीं.

जर सविभक्तिक विशेष्याच्या योगानें जें विशेषणाचें सामान्यरूप होतें तें त्या विशेष्याशीं जोडून लिहिण्याचा परिपाठ दिसत नाहीं, तर मग शब्दयोगी अव्ययाच्या योगानें जें सामान्यरूप होतें तेंच त्या अव्ययाशीं जोडून लिहिण्यास त्यांचा विशेष

हेतु कोणता, तो माझ्या ध्यानांत येत नाहीं. जर, '**बहिऱ्याभिकंभटानें**,' अथवा **मानकाप्यामांगाचा**,' असें कोणी जोडून लिहित नाहींत, **बहिऱ्या भिकंभटानें**' अथवा, '**मानकाप्या मांगाचा**' असें तोडूनच लिहितात; तर मग '**मजकडून**' '**डोंगरासमोर**,' अशाच ठिकाणीं हीं सामान्य रूपें जोडून का लिहावीं, या पूर्वपक्षाचें यथास्थित समाधान झाल्या शिवाय या नियमास अनुसरणें आवश्यक आहे. अस्तु, एथें सद्य: तर विकल्प आहे; परंतु हा विकल्प दूर करून सर्वांची लिहिण्याची एक पद्धति पडली असतां बरें आहे.

४ '**च**, **हि**, **ना**, हीं जीं एकाक्षरी शुद्ध शब्दयोगी अव्ययें तीं तोडून लिहूं नयेत; ज्या शब्दांशीं यांचा योग असतो त्यांशीं जोडून लिहावीं; जसें—'चतुष्पदांत हत्तीमच सोंड आढळत्ये,' 'तूंहि ये,' 'ती तेथें जात्येना?' इ०.

५ तृतीया विभक्त्यर्थदर्शक जें **करून** हें शब्दयोगी अव्यय, तें तृतीयान्त शब्दांशीं जोडून लिहिण्याचा परिपाठ पडला आहे, तो वाउगा नाहीं; कारण, त्या अव्यया सुद्धां तीं सारीं तृतीयेचींच रूपें होतात; जसें—तेणेंकरून, बाणेंकरून, त्यांहींकरून, यांहींकरून, शस्त्रांनींकरून, इ०.

६ तसाच अपादानार्थीं **पासून** हें अव्ययहि जोडून लिहिण्याचा परिपाठ पडला आहे तोहि वर सांगितल्या कारणानें मला वाउगा दिसत नाहीं.

७ वाक्यां मध्यें जे सावधारण व सांकेतिक शब्द असतील, ह्मणजे ज्या शब्दां कडेस वाचणारानें लक्ष विशेष असावें असा लिहिणाराचा अभिप्राय असेल, ते शब्द चालत्या अक्षरांहून कांहीं भिन्न तऱ्हेनें लिहावे, जसें—'बहुधा **सामू** आदिकरून शब्दांचीं **सासवेला**

**सासवेस**, अशीं रूपें लिहिण्याचा प्रघात पडला आहे.

८ **असा**, **अहो**, **अरे**, **अगे**, हे शब्द इतर शब्दांशीं जुळून लिहिले असतां, यांतील अचा लोप होतो; जसें—'तो **जातोसा** दिसतो,' 'ती **आजारीशी** दिसत्ये,' 'गड्हो तुह्मीं असें करूं नका,' 'भवरे तरा बापहो,' 'बाईगे माझा धंदा,' इ०.

९ या भाषेंत **किं**—**कीं**, **हि**—**ही**, हीं अव्ययें लिहिण्यांत अद्यापि एक नियम बसत नाहीं; कोणी ऱ्हस्व आणि कोणी दीर्घ लिहितात. परंतु मला वाटतें जेथें बोलणाराचा आशय अर्थान्वयानें अथवा स्वेच्छेनें ज्या वर नेट देऊन बोलायाचें नसेल तें अव्यय ऱ्हस्व, आणि ज्या वर तो देऊन बोलायाचें असेल तें दीर्घ लिहावें; जसें—'ती संख्या कोणती **किं** जीस पांचानें गुणिलें असतां वीस होतात,' आणि 'तो मागतो **कीं**, जर तुह्मीं जाल तर माझें काम होईल;' 'त्याचेंहि काम झालें,' आणि '**तुझें** तर काम झालेंच, पण त्याचेंही झालें;' या उदाहरणांत बोलणाराच्या मनांतील आशया प्रमाणें त्या त्या शब्दां वर नेट निराळे पडतात, आणि तसे तो ऱ्हस्व दीर्घ स्वरानें बोलतो असें दिसतें.

परंतु हा नियम स्वेच्छानुरूप आहे, म्हणोन या विषयींचा विचार माझ्या भावी पूरणिकेंत काहींसा विस्तारानें केला आहे, तो प्रसिद्ध झाल्यावर पहावा.

१० **ण**, **न**, **म**, या अनुनासिक वर्णां वर अनुनासिकाचें टिंब देणें तेंहि सद्यः स्वेच्छेवरच आहे. याचाहि विचार माझ्या पूरणिकेंत पहावा.

---

# भाग १.

## विरामचिन्हें.

६७१ अलिकडेस जे मराठी भाषेंत ग्रंथ झाले आहेत, व होताहेत, त्यांत इंग्लिश भाषतील ग्रंथांच्या नियमा प्रमाणें विरामचिन्हें देण्याचा प्रघात पडून गेला आहे; आणि वाक्यार्थ स्पष्ट होण्या करतां या चिन्हांचा उपयोग फार आवश्यक आहे, यांत अगदीं संशय नाहीं; ह्मणोन त्यां विषयींचे जे नियम आहेत ते एथें संक्षेपरूपानें तरीं सांगितले पाहिजेत. परंतु ते सांगायाच्या पूर्वीं तीं विरामचिन्हें दाखविणें इष्ट आहे.

| विरामचिन्हें. | संज्ञा. |
|---|---|
| , | स्वल्प विराम. |
| ; | अर्ध विराम. |
| : | अपूर्ण विराम. |
| . | पूर्ण विराम. |
| ? | प्रश्नचिन्ह. |
| ! | उद्गारचिन्ह. |
| — | संयोगचिन्ह. |
| “ ” | अवतरणचिन्ह. |
| ( ) | कौंस. |

६७२ जें वाक्य सरळ आहे, ह्मणजे ज्यांत दुसरीं वाक्यें अथवा वाक्यांगें नाहींत, त्यांत विरामचिन्हें लिहिण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. मात्र वाक्य संपल्या वर पूर्णविरामाचें टिंब द्यावें लागतें. जसें—वाघ रानांत असतो. गाई पेक्षां ह्मैस अधिक दूध देते. राजा न्यायेंकरून प्रजेचें पालन करितो. या आपल्या महाराष्ट्र

देशांत व्याकरणरीतीनें शुद्ध लिहिण्याची चाल .आतां आतां पडत चालली आहे.

## स्वल्प विराम.

६७३ सरळ वाक्यांत जर मध्येंच दुसरीं वाक्यें अथवा वाक्यांगें आलीं, तर त्या वाक्यांच्या अथवा वाक्यांगांच्या पूर्वी व शेवटीं स्वल्प विराम दिले पाहिजेत; उदाह० - 'एक मुलगा, आपल्या आंधळ्या बापास हातीं धरून, भीक मागत होता.' 'मनुष्यानें जर आपल्या सामर्थ्याचा विचार न केला, आणि एखाद्या कार्यास हात घातला, तर तो बहुधा फसल्या वांचून राहणार नाहीं.

यांत प्रथम उदाहरणांत —'एक मुलगा भीक मागत होता,' हें सरळ व मुख्य वाक्य, यांत—'आपल्या बापास हातीं धरून,' हें दुसरें अपूर्ण अथवा गौण वाक्य अथवा वाक्यांग मध्यें आलें आहे; तेव्हां याच्या आरंभीं व शेवटीं स्वल्प विराम देऊन यास निराळें पाडिलें आहे. कोणी हें सर्व सरळ वाक्य मानिलें, आणि हे स्वल्प विराम नदिले, तरी विशेष बाध येतो असें नाहीं. परंतु वाचणारास चांगल्या स्पष्टपणें वाचतां यावें म्हणोन ते द्यावे हें बरें. याच प्रमाणें दुसरें उदाहरण जाणावें.

( अ ) जर वाक्यांत दोन तीन अथवा अधिक कर्ते, अथवा कर्में, अथवा धातुसाधितें, अथवा क्रियापदें, अथवा कोणत्याहि एका जातीचे शब्द, एका पुढें एक आले, तर त्यां मध्यें स्वल्प विराम देऊन ते शब्द निरनिराळे दाखवावे; जसें—'रामा, हरी, गोपाळा, यमुना, आणि तिचा बाप गोपाळशेट, इतकीं मनुष्यें तेथें जेवायास आलीं होतीं.' 'म्यां काल एका वाडींत कुत्रा, मांजर, आणि कोंबडा, यांस झुंजतां पाहिलें.' 'त्या मुलीस लिहितां, वाचतां, गातां, नाचतां, आणि शिवतां

येतें.' 'तो गेला, फसला, मेला, तरी मीं त्याची गोष्ट मना वर घेणार नाहीं.' तो मोठा शहाणा, विचारी, आणि विद्वान् पुरुष आहे.'

( आ ) या प्रकारच्या दोहों शब्दां मध्यें जर उभयान्वयी अव्यय आलें, तर स्वल्प विरामाचें प्रयोजन लागत नाहीं. जसें—'बाळा आणि हरी जेवायास बसले आहेत.' 'साळू आणि मनी फुलें आणायास गेल्या.' 'तो बारीक परंतु सुवाच्य अक्षर लिहितो.' 'तो एथून तेथें जातो आणि तेथून एथें येतो.'

(इ) जर या उभयान्वयी अव्ययांच्या योगानें निरनिराळीं सरळ वाक्यें, अथवा वाक्यांगें पडत गेलीं, तर तीं दाखविण्या करतां स्वल्प विराम दिले पाहिजेत; जसें—' मीं तेथें गेलों, आणि तूं तेथें नसलास, तर मग मात्र कठीण.' 'इतका विलाप केला, परंतु त्यास दया आली नाहीं.' 'पृथ्वी निराधार आहे ह्मणतां, तर मग ती पडत कां नाहीं?' 'माझें सर्वस्व गेलें, किंबहुना प्राणाहि गेला, तथापि मीं असत्य बोलणार नाहीं.'

( ई ) वाक्यारंभीं अथवा वाक्यांत कोठेंहि संबोधन आलें, तर त्याच्या पुढें स्वल्प विराम देऊन त्यास निराळें दाखवावें; जसें—'देवा, मला क्षमा कर.' 'बाळा, तूं काल शाळेंत कां गेला नाहींस?' 'रावसाहेब, आपण मज वर ही इतकी दया करावी.' 'मी त्यास ह्मणालों, गड्या, तूं असें करूं नको.'

( उ ) वाक्यांत एकाद्या शब्दा पुढें जर त्याचाच पर्यायशब्द आला, तर त्याच्या मागें व पुढें स्वल्प विराम देऊन तो पर्यायशब्द निराळा दाखवावा हें बरें; जसें—'मुसलमानांचा पैगंबर, महंमद, याची जन्मभूमि

मज्जा.' 'मराठ्यांनीं त्या काळीं आपली मोठी भयंकर तोफ, महाकाळी, किल्लया वर चढविली.'

हा नियम सर्वत्र चालता असें नाहीं. 'माझा भाऊ विश्वना थ, यास जर तूं पाहशील, तर तूं अधिक विस्मय करशील; असेंहि लिहिण्याचा प्रचार आढळतो.

( ऊ ) जर हें अव्यय, किंवा कोणतेंहि संबंधी सर्वनाम, जर एकाद्या मोठ्या वाक्याच्या आरंभीं असलें, तर अनुक्रमें त्यांचें प्रतिसंबंधि जें तर हें अव्यय, किंवा पुरुषवाचक सर्वनाम, अथवा दर्शक सर्वनाम, यांच्या मागें स्वल्प विरामचिन्ह दिलें पाहिजे; जसें—'या प्रकरणां-त जर तुह्मी मला बोलूं देत नाहीं, तर मग तह्मी आपलें संभाळा.' 'ज्या घोड्या वर काल मी स्वार झालों होतों, तोच आज घेऊन ये.' 'जशी त्याणें आपल्या भावाची अवस्था केली, तशीच तो तुमची करील.'

( ऋ ) लांब वाक्य असून जर त्यांत वर्तमानकाल-वाचक, भूतकालवाचक, पूर्वकालवाचक, अथवा विधि-वाचक धातुसाधितें आलीं, तर त्यां पुढें स्वल्प विराम द्यावा हें बरें; जसें—'शिवाजी आपल्या बरोबर दहा ह-जार स्वार घेऊन नर्मदा उतरत असतां, त्याची आणि औरंगजेबाच्या स्वारांची गांठ पडली.' 'त्याणें परगाम जाऊन, आपणा करतां दरबारांत इतकी मेहनत घेतली असतां, आतां त्यास या कामांतून दूर करावें, हें मला ठीक दिसत नाहीं.' 'हें वर्तमान ऐकतांच, त्यांहीं आप-ल्या हाता खालच्या सर्व मानकरी लोकांस बलावून, तु-ह्मीं आतां लागलीच आपली तयारी करून मज बरोबर निघावें, असें त्यांस मांगितलें.'

( ॠ ) कीं हें अव्यय वाक्यांत असतां याच्या मागें

अथवा पुढें स्वल्प विराम देणें, तो बहुधा अर्थास अनुकूल आणि कानास गोड लागे, अशा समजुतीनें द्यावा; आणि हें अव्यय न्हस्व दीर्घ लिहिणें तेंहि अशाच धोरणानें लिहावें; जसें—'तो ह्मणाला, किं आतां जर या कामांत तुह्मां कडून सुस्ती झाली, तर मज कडेस दोष नाहीं.' 'त्या कामाचा त्याणें उलगडा केला, तो असा कीं, ज्याणें ही मसलत प्रथम दिली, त्याणें तें नुकसान भरावें.'

( ऌ ) दुसऱ्याचा स्वल्प लेख अथवा ह्मणणें जर वाक्यांत आणायाचें असलें, तर त्या लेखाच्या अथवा ह्मणण्याच्या आरंभीं व शेवटीं स्वल्पविराम द्यावा: जसें—'साहेब ह्मणतात, तुह्मीं येऊं नका, मींच येईन.' 'तो लिहितो, तुह्मी पहिलें तेथें जा, मग मी येईन.'

## अर्ध विराम.

६७४ जेथें एकादें मोठें सरळ वाक्य संपतें, आणि पुढें दुसऱ्या वाक्यास आरंभ होतो; अथवा एकादें मोठें लांब वाक्य आहे, आणि त्यांत एका अर्थास मुख्य करून त्याचे सोईवार विभाग करून तें वाक्य जोडायाचें असलें; तर हीं विभक्त केलेलीं जीं निरनिराळीं त्याच्या पोटांतलीं वाक्यें, त्यां पुढें अर्ध विराम द्यावा. जसें—'ईश्वराची भक्ति मनानें केली पाहिजे; मनानें अर्पण नकरितां नुसत्या द्रव्यानें अर्पण केल्यानें देव प्रसन्न होईल असें दिसत नाहीं; आणि या प्रकारचीं महंतांचीं वाक्येंहि आहेत; परंतु त्यांना लोक अगदीं विचार करित नाहींत.'

## अपूर्ण विराम.

६७५ एकाद्या लांब आणि पूर्ण वाक्यांत सरळवाक्यरूपानें अथवा वाक्यांगरूपानें विभाग पडले असतात,

तेथें जेव्हां एकाद्या उक्तार्थाचें समर्थन करण्यास कांहींसें दृष्टांतरूप वाक्यांतर प्रविष्ट करावें लागतें, तेव्हां अशा वाक्यांतराच्या पूर्वी अपूर्ण विराम द्यावा लागतो. उदाह०—'ईश्वरभक्तिपरायण साधु सर्व देशांत होऊन गेले आहेत; ते सारे असेंच ह्मणतातः दुराचरणानें देवास क्रोध येतो, आणि सदाचरणानें देव प्रसन्न होतो; ह्मणोन हीच गोष्ट प्रमाण.

हें अपूर्ण विरामाचें चिन्ह बहुधा कोठें आढळत नाहीं; याच्या ठिकाणीं या ग्रंथांत बहुधा–असें संयोगचिन्ह मांडलें आहे. कोणी याच्या ठिकाणीं स्वल्प विराम देतात, व कोणी अर्ध विरामहि देतात; परंतु यांत सूक्ष्म भेद वर सांगितल्या प्रमाणें आहे, तो शिकणारांनीं लक्षांत ठेविला असतां बरें आहे.

## पूर्ण विराम.

६७६ उद्देश्यार्थाचें यथेष्ट विधान होऊन त्या अर्थाचा संबंध नराहतां वाक्य संपतें, तेथें पूर्ण विरामचिन्ह करावें; जसें–रामा आला. सावित्रीनें पाणी आणिलें. एका कुळंब्यानें एक हरण धरिला, आणि तो त्यास मारित होता, इतक्यांत एका गृहस्थानें तो त्या जवळून विकत घेतला. पुढें हें त्यांचें सदाचरण त्यास चांकरत फळास आलें. ही कथा फारच लांब आहे ह्मणोन मी एथें सांगत नाहीं.

## प्रश्नचिन्ह.

६७७ ज्या वाक्यांत प्रश्न करावयाचा तें वाक्य जेथें संपतें तेथें प्रश्नचिन्ह लिहावें; जसें–तूं कोण आहेस? तूं कोठें जातोस? तुह्मी मला इतकें सांगतां, तर मग तुह्मींच कां करित नाहीं? तूं आतां लिहितोसना?

## उद्गारचिन्ह.

६७८ ज्या शब्दांत, अथवा ज्या वाक्यांत, हर्षशोकविस्मयादि मनोविकारांचें उल्लेखन असतें, त्या शब्दापुढें, अथवा त्या वाक्याच्या शेवटीं, उद्गारचिन्ह मांडावें जसें—अहा! कायहो मौज ही! अरे देवा, या दुष्टांनीं आमची कशी विटंबना मांडली आहे! रावसाहेबां कडेस काल लग्नाचा केवढा समारंभ जमला होता!

( अ ) मनोविकाराचें बाहुल्य दाखवायाचें असतां समयविशेषीं दोन तीनहि उद्गारचिन्हें लिहितात; जसें—दुष्टां पासून अपकार होणें हा स्वभावच होय, परंतु अशा साधू पासून इतकी अन्यायाची गोष्ट झाली यांत किती आश्चर्य आहे तें पहा!!!

## संयोगचिन्ह.

६७९ एकाच शब्दांतील कांहीं अक्षरें लिहून ओळ संपल्या मुळें बाकीचीं अक्षरें पुढल्या ओळीशीं जोडायाचीं असतां, अथवा एकाद्या मोठ्या वाक्यांत मध्येंच एकादें वाक्य अथवा वाक्यांग प्रविष्ट करायाचें असतां, अथवा उक्तार्थ वाक्यांतरेंकरून दाखवायाचा असतां, त्या दोहों अक्षरां मध्यें, आणि त्या प्रविष्ट वाक्याच्या मागें, अथवा कोठें मागें आणि पुढें, संयोगचिन्ह देतात. उदाह०—संसारोपयोगी जे—अन्नवस्त्रादि पदार्थ. तुकोबाहि असेंच ह्मणतात,—तीर्थी जाउनियां काय तुवां केलें, चर्म प्रक्षाळिलें वरच्यावरी. तुकोबाहि ह्मणतात—जित्या पित्रा नमिळे अन्न, मेल्या वरी पिंडदान—मग तुमचेंच अज्ञान प्रमाणभूत मानावें हें आह्मास योग्य वाटत नाहीं.

यांत पहिल्या उदाहरणांत, तुकोबा जें काय ह्मणतात तें त्या

संयोगचिन्हानें लागलेंच त्या पुढें दाखविलें आहे. दुसऱ्या उदाहरणांत या दोन संयोगचिन्हांनीं तुकोबाच्या ह्मणण्याचा ग्रंथकाराच्या वाक्यांत मध्येंच संग्रह दाखविला जातो, असा यांत थोडा भेद जाणावा.

## अवतरण चिन्ह.

६८० वाक्यांत अथवा ग्रंथांत वाक्यांतराचा, अथवा ग्रंथांतरांतील एखादा वेंचा घेऊन त्याचा, संग्रह करायाचा असतां, तें वाक्यांतर अथवा तो वेंचा " " या अवतरणचिन्हांच्या मध्यें आणावा; उदाह०—'एथें जो **ऊहापोह** शब्द योजिला आहे, त्याचा हा लाक्षणिक अर्थ जाणावा; याचा मूळ अर्थ मराठी कोशांत असा लिहिला आहे कीं, "यथाकथंचित लिहिलेलें किंवा ऐकलेलें जे श्लोक, वाक्य, किंवा कोणकाचें भाषण, इ० त्याचा यथास्थित सुसंगतपणा कराया साठीं इकडचें पद तिकडे, तिकडचें पद इकडे, किंवा कांहीं अंश गाळावा, कांहीं नवें आपले पदरचें आंत घालावें, अशी विचारपूर्वक जी योजना तो." या वर वाचणारानें मुख्य दृष्टि ठेविली असतां इतका वादविवाद होणार नाहीं.'

ग्रंथांतरांतून एखादें मोठें अवतरण केलें असलें तर बहुधा तें जाणावया करतां त्याच्या आरंभा पासून शेवट पर्यंत दर पंक्तीच्या आरंभीं " " असें चिन्ह करितात. उदाहरणा करतां लहानसें अवतरण असलें, तर ' ' या प्रमाणें एक एक उलटा स्वल्प विराम दिला म्हणजे पुरे.

## कौंस

६८१ एखाद्या पूर्ण वाक्यांत शब्दांचा अनुक्रम यथास्थित चालत असतां लिहिणारास मध्येंच कांहीं नवें सांगायाचें सुचलें, आणि तें लिहिणें तेथें गौण असलें,

अथवा त्या वाक्यांत नीट जुळत नसलें, तर तें तेथें कौंसांत घालितात; उदाह०—'कित्येक अकारान्त स्त्रीलिंग नामाचें अनेकवचन आकारान्त होतें, ( पहा, पृ० ४५ वें, लेख १४१ वा. ) परंतु तीं नामें जर धातूपासून व्युत्पन्न आलेलीं आणि द्व्यक्षरी असलीं, तर त्यांच्या अनेकवचनीं बहुधा ई विकार होतो ( पहा. पृ० ४६, ले० १४३.) असा नियम आढळतो.'

या प्रमाणें संक्षेपेंकरून लेखनपद्धती विषयींचे व विराम चिन्हा विषयाचे मुख्य मुख्य नियम सांगितले. त्यांत हा लेखनपद्धतीचा विचार लांबविला असतां लांबण्या जोगा आहे, परंतु तें यांत करितां येत नाहीं; ह्मणोन माझ्या भावी व्याकरण पूरणिकेंत याचा कांहीं अधिक विस्तारानें विचार केला आहे तो इष्ट असल्यास पहावा.

---

## खंड ८.

### वाचनविचार.

६८२ मागल्या प्रकरणांत लेखना विषयीं जसे नियम सांगितले तसे वाचना विषयीं सांगतां येत नाहींत; कारण वाचनाक्रिया स्वराधीन पडली; तथापि तिज विषयीं कांहीं सूचना करणें इष्ट आहे. वाचन ही एक कला होय; इचें मुख्य फल हें कीं, ग्रंथकाराचा अथवा लिहिणाराचा जो वास्तविक अभिप्राय, तो ऐकणाराच्या मनांत व्याख्यानादि साधनांतरास न अनुसरितां यथास्थित, व शीघ्र, भरून देणें. ही फलसिद्धि वाचनकालीं विराम, स्वराघात, उदात्तानुदात्तादि स्वरभेद, यांज वर नीट लक्ष दिल्या वांचून यथास्थित होत नाहीं; इतकेंच नाहीं, परंतु जर यां विषयीं दुर्लक्ष केलें, तर समयविशेषीं अर्था-

चे अनर्थहि होतात. या विषयीं एक दंतकथा आहे, तिचा दृष्टांत बहुधा लोकांत वाचण्यापासून अर्थाचा अनर्थ झाला ह्मणजे देत असतात. तिणेंकरून शुद्ध व चांगल्या रीतीनें वाचण्याचा उपयोग जसा शिष्यांच्या मनांत ठसेल, तसा त्यांच्या गुरूच्या मोठ्या पांडित्यानें ठसणार नाहीं. ह्मणोन मीं ती कथा एथें सांगतोंः—पूर्वी कोणा एका न्यायाधीशानें एका चोरास धरून त्याजवर अपराध लागू केला, आणि त्यास योग्य शिक्षा देऊन, पुढें त्याणें अशी वर्तणूक करूं नये ह्मणोन त्याज जवळून मुचलका लिहून घेतला कीं, 'मीं आज पासून चोरी करणार नाहीं केली असतां मला मारावें.' तोच चोर त्या उपरांत पुनः एकदां चोरीच्या अन्यायांत सांपडला; त्या काळीं त्या न्यायाधीशानें त्याचा तो मुचलका आणवून त्यास तो न्यायसभेंत वाचायास सांगितला; तेव्हां त्याणें त्या सभे पुढें या प्रमाणें वाचला— 'मीं आजपासून चोरी करणार, नाहीं केली तर मला मारावें.' यांत त्याणें **करणार** या शब्दापुढें विराम देऊन सर्व सभासदांस हंसविलें, आणि कायद्या बरहूकूम आपणास शिक्षा लागू होत नाहीं ह्मणोन न्यायाधीशा बरोबर तकरार करूं लागला. सारांश, वाचण्यांत विरामादि जीं वाचनाचीं अंगें, त्यांज वर लक्ष देणें फार आवश्यक आहे.

६८३ ग्रंथांत अथवा लेखांत जेथें स्वल्प विराम असेल, तेथें किंचित विराम* द्यावा, आणि पुढें वाचूं लागावें; जसें—' रामा, गोपाळा, आणि सावित्री, हीं जर माझ्या घरीं आलीं, तर मीं त्यांचा मोठा सत्कार क-

---

*वाचणारा जितक्या त्वरेनें वाचित असेल, तितक्याच त्वरेनें एक हा शब्द उच्चारायास जितका काळ लागेल तितका काळ.

रीन.' यांत—रामा गोपाळा आणि सावित्री, या श-ब्दां पुढें स्वल्प विराम घेऊन, पुढें आली या शब्दा पुढें तितकाच विराम घेऊन हें वाक्य वाचावें. 'मनुष्यानें जर आपल्या सामर्थ्याचा विचार नकेला, आणि एका-द्या कार्यास हात घातला, तर तो बहुधा फसल्या वां-चून राहणार नाहीं.' या वाक्यांत नकेला, आणि घात-ला, या शब्दां पुढें स्वल्प विराम घेऊन हें वाक्य वाचावें.

६८४ जेथें अर्ध विराम असेल, तेथें स्वल्प विरा-माच्या दुप्पट विराम घेऊन वाचावें. जसें—'तूं जें मज जवळ बोललास, तें त्याच्या भावानें त्यास जाऊन सां-गितलें; त्याणें तें रावजींच्या काना वर घातलें; बरें, रावजी इतके थोर गृहस्थ ह्मणवितात, त्याणीं ह्मटलें असतां ही गोष्ट पोटांत ठेवायाची होती; तसें नकारितां त्याणीं ती गोष्ट या नारदमुनीस सुचविली; मग हा अ-नर्थ कसा झाला ह्मणून पुसतोस, हें आश्चर्य.' या वा-क्यांत—सांगितलें, घातलें, होती, आणि सुचविली, या शब्दां पुढें स्वल्प विरामाच्या दुप्पट काळ घेऊन वाचावें.

६८५ जेथें पूर्ण विराम असेल तेथें तें वाक्य संपलें असें समजून यथेच्छ विराम घ्यावा. जरी पुढलें वाक्य ला-गलेंच आरंभायाचें असलें तर अर्ध विरामाच्या दुप्पट काळ एथें विराम घेऊन पुढें वाचावें. उदाह०—'एका कुळंब्यानें एक हरण धरिला; आणि तो त्यास मारित होता, इतक्यांत एका गृहस्थानें त्यास त्याज जवळून विकत घेतलें. पुढें हें त्याचें सदाचरण त्यास लौकरच फळास आलें. ही कथा फार लांब आहे, ह्मणोन मीं एथें आतां सांगत नाहीं.' यांत तीन पूर्ण वाक्यें आहेत, बीं-घेतलें, आलें,

आणि नाहीं, या शब्दांच्या शेवटीं संपत गेलीं, ह्मणोन यां पुढें यथेच्छ विराम घ्यावा; अथवा, धरिला या पुढें जितका विराम घेतला असेल त्याच्या दुप्पट यां पुढें विराम घेऊन वाचीत जावें.

६८६ ज्या वाक्यांत प्रश्नचिन्ह असेल, तें वाक्य दुसऱ्यास प्रश्न करितांनां ज्या स्वरभेदानें बोलतों, त्याच स्वरभेदानें वाचावें; जसें—तो कोण तेथें बसला आहे? तूं कोठें जातोस? ही काय रावजीची कन्या? मुला, तूं आतां शाळेंत जातोसना?

६८७ जेथें उद्गारचिन्ह असतें, तेथें हर्षशोकविस्मयादि जे मनोविकार त्यांचें उद्घाटन करायाचें असतां ज्या स्वरभेदानें बोलतों, त्याच स्वरभेदानें तें वाक्य वाचावें; जसें—हरहर! कायहो अनर्थ हा! रावसाहेबां कडेस काल लग्नाचा केव्हढा समारंभ जमला होता! अरे देवा, या दुष्टांनीं आमची कशी विटंबना मांडिली आहे!

६८८ वाक्यांत अनेकार्थदर्शक अनेक शब्द असतात, त्यांतून एकाद्या अर्था विषयीं कांहीं विशेष विधान करायाचें असलें, अथवा विशेषेंकरून त्या विषयीं कांहीं सांगायाचें अथवा पुसायाचें असलें, तर जसा बोलण्यांत तसा वाचण्यांतहि तदर्थदर्शक शब्दा वर स्वराघात द्यावा, ह्मणजे तो शब्द त्या वाक्यांत विशेष नेट देऊन वाचावा. हें आतां उदाहरणांनीं स्पष्ट करून दाखवितों.

| प्रश्न. | उत्तर. |
| --- | --- |
| तूं आज किल्यांत चालत जाशील? | नाहीं, माझा भाऊ जाईल. |
| तूं आज किल्यांत चालत जाशील? | नाहीं, उद्यां जाईन. |

| | |
|---|---|
| तूं आज **किल्यांत** चालत जाशील ? | नाहीं, मीं वाळुकेश्वरीं जाईन. |
| तूं आज किल्यांत **चालत** जाशील ? | नाहीं, घोड्यावर बसून जाईन. |
| तूं आज किल्यांत चालत **जाशील** ? | नाहीं किंवा होय. |

पहा, यांत प्रश्न तर एकच; परंतु पुसणाराच्या अभिप्रायानुरूप त्या त्या शब्दा वर स्वराघात दिल्यानें उत्तरेंहि भिन्न भिन्न येत गेलीं. या वरून ग्रंथकाराच्या अभिप्रायानुरूप वाचणें किती आवश्यक आहे हें स्पष्ट होत

## खंड १.

### व्याकरणपदच्छेद करणें, अ० व्याकरण सांगणें.

६८९ कोणत्याहि एकाद्या वाक्याचा व्याकरणदृष्ट्या पदच्छेद करणें, ह्मणजे आरंभा पासून शेवटा पर्यंत त्यांतील सर्व शब्दांचा, अथवा त्यांतील एका एका शब्दाचा प्रकार व्याकरणरीतीनें दाखिवणें, अर्थात्, नाम किंवा सर्वनाम असल्यास त्याचें लिंग, वचन, विभक्ति, आदिकरून भेद सांगणें; विशेषण असल्यास त्याचें विशेष्य सांगणें; क्रियापद असल्यास त्याचा मूळ धातू, त्याची सकर्मक अकर्मक आदिकरून जाति, रूप, अर्थ, काळ, लिंग, पुरुष, वचन, सांगणें; क्रियाविशेषण असल्यास कोणत्या क्रियेशीं त्याचा संबंध आहे तें सांगणें; आणि अव्यय असल्यास त्याची जाति, आणि वाक्यांत जसा त्याचा शब्दांशीं अन्वय असेल तसा त्या अन्वयें त्याचा भेद सांगणें; आणि शेवटीं त्या वाक्यांत शब्दांचा अन्योन्य संबंध कसकसा आहे हें सर्व दाखिवणें, यास **व्याकरणपदच्छेद**

**करणें** अथवा **व्याकरण सांगणें** ह्मणावें. हा व्याकरण-पदच्छेद वाक्यार्थाच्या यथार्थ ज्ञानाची किल्ली होय; ह्मणोन याची पद्धति या ग्रंथाच्या शेवटीं अवश्य सांगितली पाहिजे. ती खालीं दाखवितों.

**'रामानें वाघ मारिला.'**

**रामानें—** हें **राम** या अकारान्त पुल्लिंगी, विशेष नामाचें, तृतीयेचें एकवचन; ही कर्तरितृतीया; हा **मारिला** या क्रियापदाचा कर्त्ता.

**वाघ—** हें अकारान्त पुल्लिंगी, सामान्य नामाचें, प्रथमेचें एकवचन; ही कर्मणिप्रथमा; हें **मारिला** या सकर्मक क्रियापदाचें कर्म.

**मारिला—** हें क्रियापद, **मार** या सकर्मक धातूचें करण रूपीं, मूळरूप भेदीं, स्वार्थीं, भूतकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन.

यांत **राम** हा कर्त्ता, **वाघ** हें कर्म, आणि **मारिला** हें क्रियापद; हा कर्मणिप्रयोग.

**'हें माझें पागोटें साठ हात लांब आहे.'**

**हें—** हें दर्शक सर्वनाम, नपुंसकलिंगी, तृतीय पुरुषाचें, प्रथमेचें एकवचन; **पागोटें** या नामाचें दर्शक; **आहे** या क्रियापदाचा कर्त्ता.

**माझें—** हें '**मी**' या पुरुषवाचक सर्वनामाचें, पुल्लिंगी, प्रथम पुरुषाचें, षष्ठीचें एकवचन; या षष्ठीचा अर्थ संबंध; **पागोटें** या नामाकडे इचा संबंध.

**पागोटें—** हें एँकारान्त नपुंसकलिंगी, सामान्य नामाचें, प्रथमेचें एकवचन; ही कर्तरिप्रथमा; **आहे** या क्रियापदाचा परंपरेनें कर्त्ता.

साठ— हें संख्या विशेषण, याचें विशेष्य हात.

हात— हें अकारान्त पुल्लिंगी, सामान्य नामाचें, प्रथमेचें एकवचन; ही प्रमाणार्थी प्रथमा.

लांब— हें विशेषण, याचें विशेष्य पागोटें.

आहे— हें क्रियापद, अस या अकर्मक धातूचें, करण रूपीं, मूलरूप भेदीं, स्वार्थी, वर्तमान काळीं, नपुंसक लिंगीं, तृतीय पुरुषाचें एकवचन. यांत पागोटें हा कर्ता; आहे हें क्रियापद;हा अकर्मकर्तरि प्रयोग.

**'कृष्णानें साहाय्य करून पांडवांचें रक्षण केलें.' अशी कथा आम्हीं काल श्रवण केली.'**

**कृष्णानें**— हें **कृष्ण** या अकारान्त पुल्लिंगी, विशेष नामाचें, तृतीयेचें एकवचन; ही कर्तरितृतीया; हा **केलें** या क्रियापदाचा कर्त्ता.

**साहाय्य**— हें अकारान्त नपुंसकलिंगी, सामान्य नामाचें, प्रथमेचें एकवचन; ही कर्मणिप्रथमा; हें करून या सकर्मक धातुसाधित अव्ययाचें कर्म.

**करून**— हें पूर्वकालवाचक सकर्मक धातुसाधित अव्यय.

**पांडवांचें**—हें **पांडव** या अकारान्त पुल्लिंगी, विशेष नामाचें, षष्ठीचें अनेकवचन; ही संबंधी षष्ठी; इचा संबंध **रक्षण** या नामा कडे.

**रक्षण**— हें अकारान्त नपुंसकलिंगी, धातुसाधित नामाचें, प्रथमेचें एकवचन; ही कर्मणिप्रथमा; हें **केलें** या सकर्मक क्रियापदाचें कर्म.

**केलें**— हें क्रियापद **कर** या सकर्मक धातूचें करण रूपीं, मूलरूप भेदीं, स्वार्थीं, भूत काळीं, नपुंसकलिंगीं, तृतीय पुरुषाचें एकवचन; याचा कर्त्ता **कृष्णानें**.

यांत **कृष्ण** हा कर्त्ता, **रक्षण** हें कर्म, आणि **केलें** हें क्रियापद: हा कर्मणिप्रयोग.

**अशी**— हें विशेषण, याचें विशेष्य **कथा**.

**कथा**— हें आकारान्त स्त्रीलिंगी, सामान्य नामाचें, प्रथमेचें एकवचन; ही कर्मणिप्रथमा; हें **श्रवण केली** या सकर्मक संयुक्त क्रियापदाचें कर्म.

**आम्हीं**— हें **मीं** या पुरुषवाचक सर्वनामाचें, सामान्य लिंगी, प्रथम पुरुषाचें, तृतीयेचें अनेकवचन; ही कर्तरितृतीया; हा **श्रवण केली** या संयुक्त क्रियापदाचा कर्ता.

**काल**— हें क्रियाविशेषण अव्यय याचा **श्रवण केली** या क्रियापदा कडे अन्वय.

**श्रवण केली**—हें क्रियापद, **श्रवण करणें** या सकर्मक संयुक्त क्रियेचें करण रूपीं, मूलरूप भेदीं, स्वार्थीं, भूतकाळीं, स्त्रीलिंगीं, तृतीय पुरुषाचें एकवचन.

यांत **आम्हीं** हा कर्त्ता, **कथा** हें कर्म, आणि **श्रवण केली**, हें सकर्मक संयुक्त क्रियापद: हा कर्मणिप्रयोग.

**श्रवण करणें, संपादन करणें, अक्षण करणें, दान देणें, दान घेणें, विकत घेणें**, पाठ करणें, इत्यादि प्रकार च्या पदांच्या जेव्हां सकर्मक क्रियापदां प्रमाणें प्रयोग करितात, तेव्हां व्याकरण साधते समयीं यास संयुक्त क्रियापदें मानून नि-

वांह केल्या शिवाय दुसरा उपाय नाहीं.-' कथा श्रवण केली,' 'अर्थ संपादन केला,' 'मृत्तिका भक्षण करितो,' 'गाई दान देतो,' 'सुवर्ण दान घेतलें,' 'वेद पाठ करितात,' अशा प्रकारच्या वाक्यांचा व्याकरणपदच्छेद करायाचा असतां **श्रवण करणें; संपादन करणें**, इ०, ( पृ० २७१, नि० ५७६ वा. यांत सांगितल्या प्रमाणें ) यांस सकर्मक संयुक्त क्रियापदें मानावें, हा मला उत्तम पक्ष दिसतो. अथवा, **कथा, अर्थ, मृत्तिका, गाई**, इ० या संयुक्त क्रियापदांचीं जीं कर्मे, त्यांची षष्ठी विभक्ति मानून तिचा लोप मानावा; आणि **श्रवण, संपादन, भक्षण, दान**, इ० शब्द-**केली, देतो**, इ० सकर्मक धातूंचीं कर्मे मानावीं. या उभय पक्षांत जो ज्यास सयुक्तिक दिसेल तो त्याणें घ्यावा. मला तर प्रथम सांगितला पक्ष अधिक ग्राह्य दिसतो.

आतां **उत्पन्न करणें, निर्माण करणें, प्रकट होणें, दग्ध करणें**, इ० प्रकारचीं पदेंही पूर्वोक्त संयुक्त क्रियापदां प्रमाणें दिसतात; परंतु विचारानें पाहिलें असतां **उत्पन्न निर्माण, दग्ध**, इ० शब्द संस्कृतांत क्तप्रत्ययान्त धातुसाधित विशेषणें होत; आणि जीं विशेषणें असतात त्यांस कांहीं विशेष नसतांना तीं मराठींत क्रियाविशेषणां प्रमाणेंहि प्रयोजिलीं जातात; म्हणोन,-ईश्वरानें जग उत्पन्न केलें,' 'प्रकाश देण्या करता भगवंतानें सूर्य आणि चंद्र निर्माण केले,' इ० वाक्यांत **उत्पन्न, निर्माण**, हीं **जग, सूर्य**, इ० शब्दांचीं विशेषणें मानावीं; अथवा, हीं त्या त्या क्रियापदांच्या अन्वयानें क्रियाविशेषणें मानावीं; अर्थो कडेस लक्ष दिलें असतां मला हा शेवटला पक्ष अधिक ग्राह्य दिसतो.

**हरी काय करितोस?'**

**हरी**— **हें हरि या इकारान्त पुल्लिंगी, विशेष नामाचें, संबोधनाचें एकवचन.**

**काय**— हें **काय** या प्रश्नार्थक सर्वनामाचें, नपुंसकलिंगी, प्रथमेचें एकवचन; ही कर्मणि-प्रथमा; हें **करितोस** या सकर्मक क्रियापदाचें कर्म.

**करितोस**— हें क्रियापद, **कर** या सकर्मक धातूचें, करण रूपीं, मूलरूप भेदीं, स्वार्थीं, वर्तमान काळीं, पुल्लिंगीं, द्वितीय पुरुषाचें एकवचन.

यांत तूं हा अध्याहृत, कर्ता. **काय** हें कर्म, आणि **करितोस** हें क्रियापद; हा सकर्मकर्तरि प्रयोग.

**'अंकगणित ह्मणजे अंकांनीं मोजण्याची विद्या.'**

**अंकगणित**—हें अकारान्त नपुंसकलिंगी, सामासिक सामान्य नामाचें, प्रथमेचें, एकवचन; ही कर्तरिप्रथमा; हा **आहे** अ० **होय** या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता; **अंकगणित** हा तृतीयातत्पुरुष समास.

**ह्मणजे**— हें उभयान्वयी अव्यय.

**अंकांनीं**— हें **अंक** या अकारान्त पुल्लिंगी सामान्य नामाचें, तृतीयेचें अनेकवचन; ही करणी तृतीया.

**मोजण्याची**—हें **मोजणें** या एकारान्त नपुंसकलिंगी, धातुसाधित नामाचें, षष्ठीचें एकवचन; इचा संबंध **विद्या** या नामा कडे.

**विद्या**— हें आकारान्त स्त्रीलिंगी, सामान्य नामाचें प्रथमेचें एकवचन; ही विधेयार्थी प्रथमा.

यांत **अंकगणित** हा कर्ता, आणि **आहे** अथवा **होय** हें अध्याहृत क्रियापद; हा अकर्मकर्तरिप्रयोग.

'तुम्यानें आपलीं मुलें पोसवत नसलीं तर त्यांस माझ्या स्वाधीन कां करीनास?

**तुम्यानें**— हें तूं या पुरुषवाचक सर्वनामाचें, सामान्य लिंगी, द्वितीय पुरुषाचें सविकरण तृतीयेचें एकवचन.

**आपलीं**— हें **आपण** या सामान्य सर्वनामाचें, सामान्य लिंगी, षष्ठीचें एकवचन; इचा संबंध **मुलें** या नामा कडे.

**मुलें**— हें **मूल** या अकारान्त नपुंसकलिंगी सामान्य नामाचें, प्रथमेचें अनेकवचन; ही कर्तरिप्रथमा; हा **पोसवत नसलीं** या क्रियापदाचा कर्त्ता.

**पोसवत नसलीं**—हें क्रियापद, **पोस** या सकर्मक धातुचें अकरणरूपीं, शक्यभेदीं, संशयार्थीं, वर्तमान काळीं नपुंसकलिंगीं, तृतीय पुरुषाचें अनेकवचन.

यांत **मुलें** हा कर्त्ता, **पोसवत नसलीं** हें क्रियापद; हा अकर्मककर्तरि प्रयोग.

**तर**— हें उभयान्वयी अव्यय.

**त्यांस**— हें तें या पुरुषवाचक सर्व नामाचें, नपुंसक लिंगी, तृतीय पुरुषाचें, द्वितीयेचें अनेकवचन; ही कर्मणिद्वितीया; हें **करीनास** या क्रियापदाचें कर्म.

**माझ्या**— हें मीं या पुरुषवाचक, सर्वनामाचें, सामान्यलिंगी, प्रथम पुरुषाचें, एकवचनी, षष्ठीचें सामान्यरूप; **स्वाधीन** या शब्दाच्या योगानें

**स्वाधीन**— हें क्रियाविशेषण अव्यय; याचा **करी-नास** या क्रिये कडे अन्वय.

असे शब्द अर्थपरत्वें विशेषणेंहि होतात.

**का**— हें क्रियाविशेषण अव्यय याचा 'करी-नास' या क्रिये कडे अन्वय.

**करीनास**— हें क्रियापद, **कर** या सकर्मक धातूचें, अकरणरूपीं, मूलरूपभेदीं, स्वार्थी, वर्तमान काळीं, सामान्यलिंगीं, द्वितीय पुरुषाचें एकवचन.

यांत तूं हा अध्याहृत कर्त्ता, **त्यांस** हें कर्म, आणि **करीनास** हें क्रियापद; हा सकर्मकर्तरि प्रयोग.

**'दाक्षिण देशीं महिलानगरीच्या समीप एक मोठा वडाचा वृक्ष होता; त्याज वर मेघवर्णनामा कावळ्यांचा राजा सपरिवार राहत असतां तेथें उरुमर्दन उलूकाधिप समुदाया सह प्रत्यहीं रात्रीस पर्वताच्या गुहेंतून येऊन, वटवृक्षा भोंवता फिरून, जे काक सांपडत त्यांस मारून, जाऊं लागला.'**

**दाक्षिण**— हें वि०, देशाचें.

**देशीं**— हें देश या अ० पु०, सा० ना०, स० एक०.

**महिलानगरीच्या**—हें महिलानगरी या ई० स्त्री०, सामासि० वि० ना०, ष० एक० सा० रू०. **समीप** या श० अव्य० योगानें; हा कर्मधारय समास.

**समीप**— हें श० अव्य०.

**एक**— हें संख्यावि०, वृक्षाचें.

**मोठा**— हें वि०, वृक्षाचें.

वडाचा— हें वड या अ० पु०, सा० ना०, प० एक०: इचा वृक्ष या नामा कडे संबंध.

वृक्ष— हें अ० पु०, सा० ना०, प्र० एक०; ही कर्त० प्र०; हा होता या क्रि० कर्त्ता.

होता— हें क्रि०, अस या अक०धा०, क०रू० मू० भे०, स्वा० भू० का०, पु०, तृ० पुरु० एक०.

यांत वृक्ष हा कर्त्ता, होता हें क्रि०; हा अक० कर्त० प्रयोग.

त्याज— हें तो या पुरु० सर्वना०, पु०, तृ० पुरु० एक० सा० रू०. वर या श० अव्य० योगानें.

वर— हें श० अव्य०.

मेघवर्णनामा—हें सामासि० वि०, राजाचें; हा बहु० समा०.

कावळ्यांचा—हें कावळा या आ० पु०, सा० ना०, प० अने०; इचा संबंध राजा या नामा कडे.

राजा— हें आ० पु०, सा० ना०, प्र० एक०; ही कर्त० प्र०; इचा राहत असतां या धातुसा० अव्य० कडे अन्वय.

सपरिवार— हें क्रियावि० अव्य०; याचा राहत असतां या धातुसा० अव्य० कडे अन्वय.

राहत असतां-हें वर्तमानकालवाचक० धातुसा० अव्य०.

तेथें— हें क्रियावि० अव्य०; याचा येऊन या धातुसा० अव्य० कडे अन्वय.

उरुमर्दन— हें अ० पु०, वि० ना०, प्र० एक०; ही कर्त० प्र०; हा लागला या क्रि० कर्त्ता.

उलूकाधिप- हें सामासि० वि०, उरुमर्दनाचें; हा प० त० समा०.

समुदाया— हें समुदाय या अ० पु०, सा० ना०, सा० रू०; सह या श० अव्य० योगानें

सह— हें श० अव्य०.

मन्यहीं— हें क्रियावि० अव्य०; याचा येऊन, या पूर्वकालवाचक धा० अव्य० कडे अन्वय.

रात्रीस— हें रात्र या अ० स्त्री०, सा० ना०, द्वि० एक०; ही अधिकरणी द्वि०. (अथवा यास क्रियाविशेषण मानिलें तथापि प्रशस्त.)

पर्वताच्या— हें पर्वत या अ० पु०, सा० ना०, प०, एक० सा० रू०; गुहेंतून या सविभक्तिक विशेष्याच्या योगानें.

गुहेंतून— हें गुहा या आ० स्त्री० सा० ना०, पं० एक०.

येऊन— हें पूर्वकालवाचक धातुसा० अव्य०.

वटवृक्षा— हें वटवृक्ष या अ० पु०, सामासि० सा० ना०, एक० सा० रू०; भोंवता या श० अव्य० योगानें.

भोंवता— हें श० अव्य०.

फिरून— हें पूर्वकालवाचक धातुसा० अव्य०.

जे— हें जो या सं० सर्वना०, पु०, प्र० अने०; याचा काक या नामा कडे संबंध,

काक— हें काक या अ०, पु०, सा० ना०, प्र० अने०; ही कर्त० प्र०; सांपडत या क्रि० कर्त्ता.

सांपडत— हें क्रि०. सांपड या अक० धा०, क० रू०, मू० भे० स्वा०; गे० भू० का०, पु० तृ० पुरु० अने०.

यांत **काक** हा कर्त्ता; **सांपडत हें** क्रि०; हा अक० कर्त० प्र०.

**त्यांस**— हें तो या पुरु० सर्वना०, पु०, तृ०पु०, द्वि० अने०; ही कर्म० द्वि०; हें **मारून** या सक० धातुसा० अव्य० कर्म.

**मारून**— हें पूर्वकालवाचक धातुसा० अव्य०.

**जाऊं**— हें निमित्तकालवाचक धातुसा० अव्य०.

**लागला**— हें क्रि०, **लाग** या अक० धा०, क० रू०, मू० भे०, स्वा०, भू० का०, पु०, तृ० पुरु० एक०.

यांत **उरुमर्दन** हा कर्त्ता, आणि **लागला** हें क्रि०; हा अक० कर्त० प्र०.

अथवा **जाऊं लागला** हें संयुक्त क्रियापद करावें. पहा- पृ० २५६. नि०५२२.

आर्या.

'जातां परार्थ ही बहु । तापातें पावली सुरामा ती
न करील कां पिसाची । दुर्गतिचीं मावली सुरा माती

**जातां**— हें धातुसा० अव्य०.

**परार्थ**— हें क्रियावि० अव्य० याचा **जातां** या धा० अ० कडे अन्वय.

**ही**— हें शुद्ध श० अव्य०.

**बहु**— हें वि०, तापाचें.

**तापातें**— हें ताप या अ० पु०, सा० ना०, च०, एक०.

**पावली**— हें क्रि०, **पाव** या अक० धा०, क० मू०भे, स्वा०, भू० का०, स्त्री० पुरु० एक०.

**सुरामा**— हें आ० स्त्री०, सामासि० सा० ना०,

प्र० एक०, ही कर्त० प्र०; हा पावली या क्रि० कर्ता. सुरामा हा कर्मधा० स०.

ती— हें द० सर्वना०, स्त्री०, तृ० पु०, प्र० एक०; याचा संबंध सुरामा या नामा कडे.

यांत सुरामा हा कर्ता; पावली हें क्रि०; हा अक० कर्त० प्र०.

नकरील— हें क्रि०, कर या स० धा, अक० रू०, मू० भे०, स्वा०, भ० का०, स्त्री०, तृ० पुरु०, एक०.

कां— हें क्रियावि० अव्य०; याचा करील या क्रि० कडे अन्वय.

पित्याची- हें पिता या आ०, पु०, कर्तृवा० धातुसा० ना०, ष० एक०; इचा संबंध माती कडे.

दुर्गतिची- हें दुर्गति या इ० स्त्री०, सामासि० सा० ना०, ष० एक०, इचा संबंध मावली या नामा कडे. दुर्गति हा कर्मधा० स०.

मावली— हें ई० स्त्री०, सा० ना०, प्र०, एक०, ही पर्यायार्थी प्र०.

मुरा— हें आ० स्त्री०, सा० ना०, प्र०, एक०; ही कर्त० प्र०; हा करील या क्रि० कर्ता.

माती— हें ई० स्त्री०, सा० ना०, प्र०, एक०; ही कर्म० प्र०; हें करील या क्रि० कर्म.

यांत मुरा हा कर्ता, माती हें कर्म, आणि करील हें क्रि०; हा सक० कर्त० प्र०.

व्याकरणाचा उपयोग किती आहे, व कठीण कवितांचे अर्थ लावायास व्याकरणाचें साहाय्य किती लागतें,

हें विद्यार्थ्यांच्या लक्षांत आणण्या करतां हें एथें एक आर्येचें वानगी प्रमाणें प्रतीक दाखविलें आहे; त आतां ग्रंथाच्या शेवटीं आणखी एक आर्या लिहितों तिचा विद्यार्थ्यांनीं आपल्या बुद्धिचातुर्येंकरून यथा व्याकरणपदच्छेद केला ह्मणजे माझे श्रम बरेच सफ आले, असें मी समजल्या वांचून राहणार नाहीं.

## आर्या.

नलगे व्याकरणाची । न्यायादिघटपटादिखटपटती
वैकुंठपंठमोठी । नामावरहीनदीनखटपटती ॥

समाप्त.

| | | | |
|---|---|---|---|
| ९६ | १० | असें | असें- |
| ९९ | ३८ | न्त्य | उपान्त्य |
| १०६ | ५ | केकावळी | केकावलि |
| १०८ | १८ | समसखशीला स | समसखशीला- |
| ११० | ४ | सग | स्वरा |
| १११ | १ | वणाच्या | वणाच्या |
| ११६ | २ | गेऊ नये | घेऊन ये |
| ११६ | ७ | पश्नार्थक | प्रश्नार्थक |
| १२० | ९ | पष्टींचा | षष्ठींचा |
| १२२ | ११ | टष्टीस | दृष्टीस |
| १३७ | ६ | अमर्का | अमर्का |
| १३९ | २५ | योचा | यांचा |
| १४२ | ८ | वाहींत | नाहींत |
| १४४ | २३ | विकल्पें | विकल्पें |
| १५३ | ३ | कित्यक | कियक |
| १५७ | ८ | हे | हि |
| १५७ | ९ | हीर | हरि |
| १६२ | ६ | रविती | रविती, |
| १६५ | २१ | करविता | करविता, |
| १८६ | ३ | नाहीं | नाही. |
| १८९ | ४ | ८३६ | ८३६ |
| १९२ | ३ | नि०२९३पृ०१६० | नि०३९४पृ०१९९. |
| १९३ | ३ | घातम | धातम |
| १९७ | २१ | भतकाळीं | भूतकाळीं |
| १९८ | २४ | घात | धातु |
| १९९ | ३ | गेला | गेला, |
| २०१ | १ | यतों, | येतों, |
| २०३ | ३ | करून. | वरून |
| २०८ | १० | जाऊन | जाऊन, |
| २२० | ४ | कला | केला |

| | | | |
|---|---|---|---|
| २२४ | १७ | मा | मी |
| २३१ | २३ | भविष्यभाविष्य | भविष्यभविष्य |
| २५० | ७ | माकेळिक | मोकळिक |
| २५५ | १४ | येतो | येतो |
| २५७ | २ | कम | कर्म |
| २५७ | ४ | कम | कर्मे |
| २५९ | ८ | बोळण्यत | बोलण्यांत |
| २५९ | १६ | घेतलें | घेतलें |
| २६२ | ८ | पुढ | पुढें |
| २६३ | १९ | त | तें |
| २६५ | १६ | कियापद | क्रियापद |
| २६६ | ९ | काहीसें | कांहींसे |
| २८२ | १९ | हन, | हून, |
| २८७ | ५ | सर्व | सर्व |
| २९३ | ४ | नेसण | नेसण, |
| २९५ | १३ | णावळ | णावळ, |
| २९५ | १७ | मुकणावळ | मुकणावळ, |
| ३०८ | ५ | कियाविशेषणं, | क्रियाविशेषणें, |
| ३०८ | ७ | मत–मान | मंत–मान |
| ३११ | १३ | देशस्थ | देशस्थ, |
| ३१२ | १९ | पाणवठा | पाणवठा, |
| ३१२ | २३ | गवजकाढु, | गवजकाढु, |
| ३२१ | १८ | ६०५ | ६०६, |
| ३२२ | १३ | ६०७ | ६०८ |
| ३२४ | ७ | वन्मल्यावर | जन्मल्यावर |
| ३२९ | २३ | कन्येकांच्या | कन्यकांच्या |
| ३३२ | ४ | ६३ | ६२ |
| ३३८ | २२ | कत्ता | कर्ता |
| ३४७ | १९ | त्याम | त्याम |
| ३५८ | २२ | नव्हे | नव्हे |
| ३७८ | २७ | असा | असा |

| | | | |
|---|---|---|---|
| ३६९ | १२ | बून | करून |
| ३७२. | ०४ | भाषतील | आर्येतील |
| ३[illegible]२ | १९ | पूणें . | पूर्ण |
| ३८४ | १० | होत. | होतें. |
| ३८७ | ५ | कें ें | केलें |
| ३८८ | ०५ | नि० ५५६ | ५५७ |